# सुभाषितं. ॥



कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर

यांच्या

निबंधमाला मासिक पुस्तकाच्या चव्ऱ्याऐंशी अंकांत
आलेले सर्व श्लोक एकत्र करून

त्यांचें हें पुस्तक

शंकर नरहर जोशी चित्रशाळेचे मॅनेजर

यांनीं

'चित्रशाळा' छापखान्यांत, १०२६ सदाशिव पेठ, पुणे शहर
येथे छापून प्रसिद्ध केलें.

सन १९२६



किंमत १२ आणे.

॥ श्रीः ॥

# सुभाषित!



**सुभाषितेन गीतेन युवतीनां च लीलया ॥**
**यस्य न द्रवते चित्तं स वै मुक्तोऽथवा पशुः ॥ १ ॥**

" सुभाषित, गायन आणि तरुण स्त्रियांच्या लीला, या तिहींत ज्याचें मन तल्लीन होऊन जात नाहीं, तो एक जीवन्मुक्त योगी म्हणावा किंवा पशु म्हणावा ! "

---

**गीर्वाणवाणीषु विशिष्टबुद्धिस्तस्थाऽपि भाषांतरलोलुपोऽहम् ॥**
**यथा सुधायां मरुतां च सत्यां स्वर्गांगनानामधरासवे रुचि. ॥२॥**

" संस्कृत भाषेकडेच जरी माझा मोठा ओढा आहे, तरी इतर भाषाविषयींही पण मला उत्कंठा आहे, जसे स्वर्गीच्या देवास प्राशन करण्यास चंद्राचें अमृत असताही अप्सरांच्या अधराचें मद्यही त्यास आवडतें ! "

---

जिचा नवरा प्रवासास गेला आहे अशी कोणी विरहिणी नुकत्याच उगवलेल्या पौर्णिमेच्या चंद्रास बघून उन्मादावस्थेत त्यावर उत्प्रेक्षा करते—

**सायं नायमुदेति वासरमणिश्चंद्रो न चंडद्युति-**
**र्दावाग्निः कथमंबरे किमशनि. स्वच्छांतरिक्षे स्थित ॥**
**हंतेदं निरणायि पांथरमणिप्राणानिलाशाशया**
**धावद्घोरविभावरीविषधरीभोगस्य भीमो मणिः ॥ ३ ॥**

कालिदास—शृंगाररसाष्टक

" आता संध्याकाळ झाला आहे, तेव्हां हा क्वचित सूर्य उगवलेला नव्हे,—बरें, जर चंद्र म्हणावा, तर यापासून संताप होतो हे कसें ?—रानातील वणवा म्हणावा, तर तो आकाशांत का ?—अशनि* म्हणावा, तर हा

---

* ' अशनि ' म्हणजे ' वज्र ' अथवा ' वीज. ' हा दुसरा शब्द स्त्रीलिंगी असल्यामुळे तो वर घालतां आला नाहीं

स्वच्छ निरभ्र आकाशात आहे ! तेव्हा वरील कल्पना कोणतीच बसत नाहीं.—पण हां समजले ! पांथाच्या स्त्रियांच्या प्राणरूप वायूचे भक्षण करण्याच्या आशेने रात्रिरूप घोर सर्पिणी धांवत येत आहे !—तिच्या शिरावरचा हा भयंकर मणि दिसू लागला आहे ! ! ”

---

कोणी विरहिणी मदनास उद्देशून म्हणते——

**जटा नेयं वेणीकृतकचकलापो न गरलम्**
**गले कस्तूरीयं शिरसि शशिलेखा न कुसुमम् ॥**
**इयं भूतिर्नाङ्गे प्रियविरहजन्मा धवलिमा**
**पुरारातिभ्रांत्या कुसुमशर किं मां प्रहरसि ॥ ४ ॥**

“ हे मदना ! शिवाच्या भ्रांतीने मजवर का व्यर्थ प्रहार करतोस ? अरे, ही जटा नव्हे, तर केसाची बांधलेली वेणी होय, हे गळ्याभोंवतीं विष नव्हे, तर कस्तूरीचा लेप आहे, शिरीं चंद्राची कोर नव्हे, तर पांढरे फूल आहे, अंगास भस्म फांसलेलें नव्हे, तर पतीच्या विरहामुळें आलेला पांढरेपणा होय ! ”

---

एका वानराच्या हातीं सहज माणिक लागलें असता त्याशीं नाना तऱ्हेच्या चेष्टा करून त्याची त्याने दुर्दशा केली. ते पाहून कोणी त्या माणिकास उद्देशून बोलतो——

**आघ्रातं प्रतिचुंबितं प्रतिमुहुर्लीढं च यच्चर्वितम्**
**क्षिप्तं वा यदि नीरसेन कुपितेनात्र व्यथां मा कृथाः ॥**
**हे माणिक्य तवैव तच्च कुशलं यद्वानरेणामुनाऽ-**
**ऽप्यंतस्तत्त्वनिरूपणव्यसनिना चूर्णीकृतं नाश्मना ॥ ५ ॥**

“ हे माणिका ! या वानराने तुला हुंगून, तुझें पुनः पुनः चुंबन करून, तुला वारंवार चाटून, तुला चावून, तुझी योग्यता न जाणतां रागाने दूर फेंकून दिलें, याचा तू खेद मानू नकोस ! का तर, हे तुझें भाग्यच समज कीं, आत काय आहे ते पाहण्याकरितां दगड घेऊन त्याने तुझा चुराडा करून टाकिला नाहीं ! ”

ही अन्योक्ति आहे. कुपरीक्षकाशीं गांठ पडली असता धडपणीं सुटून आलो म्हणजेच मोठी मिळविली म्हणून समजावें !

**अद्यापि दुर्निवारं स्तुतिकन्या वहति कौमारम् ॥**
**सद्भ्यो न रोचते साऽसंतोप्यस्यै न रोचन्ते ॥ ६ ॥**

गोवर्धनाचार्य—सप्तशती

" स्तुति हीच कोणी कन्या, ही अद्याप कुमारीच राहिली आहे; तिचे लग्नाचेच कोठे जमत नाहीं !—जे तिला आवडतात ते तिला पत्करीत नाहींत, व ज्यांस ती आवडते ते तिला नकोत. ! "

म्हणजे जे थोर पुरुष स्तुतीस वास्तविक पात्र असतात त्यास आपली प्रशसा कोणीं केलेली आवडत नाहीं, पण अगीं काहींच योग्यता नसूनही जे आपली शेखी चोहोंकडे मिरवू पाहतात त्याची कोणीच स्तुति करीत नाहीत. उलटा त्याचा उपहास मात्र होत असतो.—थोडक्यात खुबीदार अर्थ लिहिण्याची आचार्यांची शर्थ आहे.

---

**जडास्तपोभिः शमयंति देहं बुधा मनः सर्वविकारहेतुम् ॥**
**श्वा मुक्तमस्त्रं दशतीह कोपान्मोक्तारमुद्दिश्य हिनस्ति सिंहः ॥७॥**

" जे अज्ञानी असतात ते तपश्चरण करून देहाचें शमन करतात, पण ज्ञाते पुरुष सर्व विकारांचे मूळ जे मन त्याचेच दमन करतात, यास दृष्टांत. कुत्र्यावर जर बाण टाकला तर तो त्या बाणासच रागाने चावू लागेल, पण सिंह बाण सोडणारावर झेप घालून त्यास ठार करून टाकील." सारांश, कर्ममार्ग गौण, ज्ञानमार्ग श्रेष्ठ होय !

---

**वाङ्माधुर्यान्नान्यदस्ति प्रियत्वं वाक्पारुष्याच्चोपकारोऽपि नष्ट ॥**
**किं तद्द्रव्यं कोकिलेनोपनीतं को वा लोके गर्दभस्यापराधः ॥८॥**

" मधुर भाषणाप्रमाणे लोकास वश करणारे काहीं नाहीं व कर्कश भाषणाने केलेल्या उपकारासही कोणी विचारीत नाहीं. पहा बरे, कोकिल कोणास काय द्रव्य आणून देतो ? व गाढव कोणास काय उपद्रव करते ?" पण पहिला केवळ गोड वाणीने सर्वांस प्रिय होऊन राहिला आहे, व दुसरा साऱ्या जन्मभर लोकहितार्थ खपत असताही एका द्वाड ओरडण्याने सर्वांच्या तिरस्कारास पात्र झाला आहे.

**खलसख्यं प्राङ्मधुरं वयोऽतराले निदाघदिनमंते ॥**
**एकाऽऽदिमध्यपरिणतिरमणीया साधुजनमैत्री ॥ ९ ॥**

" दुष्टाची मैत्री पहिल्याने गोड वाटते; मध्ये आयुष्याप्रमाणें चचल असते आणि शेवटीं उन्हाळ्याच्या दिवसाप्रमाणें तापदायक होते. पण आरभीं, मध्यें व शेवटीं अशा तिन्ही काळीं रमणीय अशी एक सज्जनांची मैत्री मात्र ! "

---

गावढळ लोकांस हत्ती कोठून माहीत असावा ? त्यांनीं तो नव्यानेंच पाहिला असता ते त्याचा उपहास करतात—

**ऊर्णां नैष बिभर्ति नैष विषयो दोहस्य वाहस्य वा**
**तृप्तिर्नास्य महोदरस्य बहुभिर्घासै पलालैरपि ॥**
**हा कष्टं कथमस्य पृष्ठशिखरे गोणी समारोप्यते**
**को गृण्हाति कपर्दकैरलमहो ग्राम्यैर्गजो हास्यते ॥ १० ॥**

" अहो ! काय हो विलक्षण पशु हा ! याच्यापासून लोकर सापडायाची नाहीं, दूधही मिळावयाचे नाहीं; कीं बसायाच्याही हा उपयोगीं नाहीं ! याचे केवढें हो हे पोट ! गवत कोडा याचे ढीगचे ढीगही यास पुरेसे होणार नाहींत !—असो हेंही राहू द्या, ओझयाला भक्कम म्हणून घेतला म्हटलें तरी या धुडाच्या पाटीवर गोणी हो कोणी चढवावी !—छेः !—याला घेऊन काय करा ! कोणी दोन कवड्यावारीही याला पुसणार नाहीं ! ! "

---

एका डबक्याशीं बगळयाची मडळी बसली असता तेथे एक हस आला, त्यास ते हालहवाल विचारतात—

**कस्त्वं लोहितलोचनास्यचरणो हंस कुतो मानसात्**
**किं तत्रास्ति सुवर्णपंकजवनान्यंभः सुधासन्निभम् ॥**
**रत्नानां निचयाः प्रवाललतिका वैदूर्यरोहः क्वचित्**
**शंबूका न हि संति नेति च बकैराकर्ण्य हीहीकृतम् ॥११॥**

" अरे ! तुझे डोळे, तोड व पाय तिन्ही लाल आहेत असा तू कोण पक्षी ? हस उत्तर देतो—' मी हस. ' ' कोठून आलास ? '—' मानस सरोवरापासून. ' ' तेथे काय काय असते ? ''—कोठे सोन्याचीं कमलें,

कोठें अमृतासारखे गोड पाणी, कोठें रत्नांचे समुदाय, कोठें पोवळ्याच्या वेली व कोठें पाचेचे अंकुर, असे जागोजाग आहेत !' ' बरें, पण किड्याच्या शिंपा आहेत काय ? '—' नाहींत. ' ' नाहींतना ! मग आहे काय तर तेथें ? ' असें म्हणून सर्वांनीं हा—हा—हा करून त्याचा उपहास केला ! "

---

कोणी याचक ब्रह्मदेवास म्हणतो—

**धातस्तात समस्तयाचकविधौ वैरायसे सर्वथा**
**यस्माद्विक्रमशालिवाहनमहीभृन्मुंजभोजादयः ॥**
**अत्यंतं चिरजीविनो न विहिता ये विश्वजीवातवो**
**मार्कंडध्रुवलोमशप्रभृतयः सृष्टाः प्रभूतायुषः ॥ १२ ॥**

" बापा ब्रह्मदेवा ! आमच्या याचक मंडळीशीं तुझें मोठें वैर आहेसें दिसतें ! कां तर, विक्रम, शालिवाहन, मुंज, भोज इत्यादि जे जगाचा भार वागविणारे उदार राजे त्यास चिरंजीव करायाचे टाकून मार्कंडेय, ध्रुव. लोमश, इत्यादिकांस—कीं ज्यापासून कोणास कांहीं लभ्य नाहीं, अशांस मात्र आयुष्याची रगाडी करून टेवली आहेस ! "

---

**भद्रं कृतं कृतं मौनं कोकिलैर्जलदागमे ॥**
**दर्दुरा यत्र वक्तारस्तत्र मौनं हि शोभनम् ॥ १३ ॥**

कवि म्हणतो—" पावसाळ्याच्या दिवसांत कोकिल मौन धरतात हें फार चांगलें करतात, कारण जेथें बेडूक वक्ते झाले तेथें कोकिलाची काय शोभा राहिली!" सारांश, मूर्ख लोकांच्या समाजांत पंडितास मौनच उचित होय.

---

चांदण्या रात्रीं कावळे ओरडतांना पाहून कवि त्या ओरडण्यावर उत्प्रेक्षा करतो—

**वयं काका वयं काका इति जल्पन्ति वायसाः ॥**
**तिमिरारेस्तमोहेतुः शंकातंकितमानसाः ॥ १४ ॥**

" कावळे कां—कां—कां असें ओरडताहेत ते चंद्राला असें सांगताहेत कीं, ' काकाः ! काकाः ! ' ( आम्ही कावळे ! आम्ही

कावळे ! ) आम्ही अधकार नाहीं ! नाहींतर अधकाराबरोबर आमचेंही काडात काढशील ! '

---

## सूकर-सिंह-संवाद.

सूकर —**दश व्याघ्रा जिता पूर्वं सप्त सिंहास्त्रयो गजाः**
**पश्यंतु देवताः सर्वा अद्य युद्धं त्वया मम ॥**
सिंह —**गच्छ सूकर ! भद्र ते ब्रूहि सिंहो मया जितः**
**पंडिता एव जानंति सिंहसूकरयोर्बलम् ॥ १५ ॥**

एका डुकराची आणि सिंहाची गाठ पडली. तेव्हा डुकर सिंहास म्हणतो—" अरे ! मीं पूर्वी दहा वाघ, सात सिंह आणि तीन हत्ती जिंकले. आज तुझी खरी गाठ पडली ! होऊ दे युद्ध ! सर्व देवता ते आज पाहोत!"

सिंहाने उत्तर केले—" अरे डुकरा ! तू खुशाल जा आणि सर्वास सागत फीर कीं, ' मीं सिंहास जिंकले. पडितास सिंहाचे व डुकराचे बळ किती असतें तें ठाऊक आहेच ! "

---

**विद्या विवादाय धनं मदाय शक्तिः परेषां परिपीडनाय ॥**
**खलस्य साधोर्विपरीमेतज्ज्ञानाय दानाय च रक्षणाय ॥ १६ ॥**

मूर्ख व शाहणा यामधील अतर—" मूर्खास विद्या प्राप्त झाली, कीं तो ज्यार्शी त्यार्शी वादाला उभा राहतो, धन मिळाले, कीं गर्वाने ताठून जातो; अगीं सामर्थ्य असले, कीं दुसऱ्यास पीडा करू लागतो. हा मूर्खाचा प्रकार झाला. आता शहाण्याचा ऐका; तो वरच्याच्या अगदीं उलट—म्हणजे विद्येचा उपयोग तो ज्ञान समजतो, धनाचा दान व शक्तीचा दुर्बळाचे रक्षण. "

---

**अपूर्वः कोऽपि कोषोऽय विद्यते तव भारति ॥**
**व्ययतो वृद्धिमायाति क्षयमायाति संचयात् ॥ १७ ॥**

" हे सरस्वति ! तुझे भाडार मोठें विचित्र आहे ! त्याचा जों जों खर्च करावा, तों तो ते वाढत जाते, व जो जो राखून ठेवू लागावें, तो तो ते कमी होत जातें ! "

**यस्मादासीत्कुमार· कुवलयदलवल्लीलयोवाह गंगां**
**वामा यस्यांगसंगा पिहितजनचयो यो गवीशध्वजाऽपि ॥**
**लकेशाद्येकनाथो हिमकररुचिभृद्भूविशेषाश्रयोऽसौ**
**वर्णस्याऽद्यस्य लोपादपहरतु हरिः पातकं वः स्मरारिः ॥१८॥***

या श्लोकात विष्णूचे व शिवाचे वर्णन आहे. नुसता श्लोक घेतला तर शिवाचे, व पहिले अक्षर काढून टाकले असता तेच विष्णूचे वर्णन होतेंः—

" ज्यापासून कुमार कार्तिकस्वामी, (मार—मदन) झाला; ज्याने कमलपत्राप्रमाणे भूषणार्थ सहज गंगा धारण केली आहे, ( गा—पृथ्वीते [ वराहावतारीं ] धारण केली ), ज्यानें वामा म्हणजे पार्वती अर्धांगीं धरिली आहे, ( मा—लक्ष्मी ज्याच्या जवळ आहे ), ज्याने लोकसमुदाय आच्छादित आहे—म्ह० संहार केला आहे, ( ज्याने लोकाचे कल्याण केले आहे ), ज्याचा ध्वज गवीश म्ह० नदी, ( वीश—गरुड ) आहे. जो लंकेशादिकाचा म्ह० रावण बाणासुर इत्यादिकाचा, ( महादेव शंकरादिकाचा ) एक नाथ होय, व जो चंद्रकांतीप्रमाणे शुभ्र असा भूविशेष म्हणजे कैलासाचा आश्रय करतो, ( मकर म्हणजे मगर त्याच्या प्रेमास आश्रय जो भूविशेष म्हणजे समुद्र त्याचा आश्रय करतो ) तो शिव ( आणि विष्णु ) तुमच्या पातकाचे हरण करो."

---

**स्वर्धुने तव महिमानं वक्तुमनीशः फणीशोऽपि ॥**
**वितरसि यत्पदमच्युतमच्युतपदाविच्युताऽपि त्वम् ॥ १९ ॥**

कवि गंगेस म्हणतो—" हे स्वर्गनदि तुझा महिमा सहस्रमुख जो शेष त्याच्यानेही वर्णवणार नाहीं ! का कीं, तू स्वतः अच्युतपदापासून (विष्णूच्या पायापासून ) पडली आहेस तरी अच्युतपद (अढळस्थान) देतेस !"

---

**गुरुरेक कविरेकः सदसि मघोन कलाधरोऽप्येक ॥**
**अद्भुतमत्र सभायां गुरवः कवयः कलाधराः सर्वे ॥ २० ॥**

कवि कोणा राजाची सभा वर्णितो—"इंद्राच्या सभेत गुरु ( बृहस्पति)

---

* या श्लोकातील काहीं पदें क्लिष्ट कल्पनेनें बसवावीं लागतात, त्याचा विचार रसिकानीं करावा.

एक, कवि ( शुक्राचार्य ) एक, आणि कलाधर (चंद्र) ही एकच, पण या सभेंत पहा ! सर्व पंडित, गुरु, कवि आणि कलाधर (कलांत निपुण) आहेत !"

---

भारतं चेक्षुदंडं च कलानाथं च वर्णय ॥
कालिदास कविर्ब्रूते प्रतिपर्वरसावहम् ॥ २१ ॥

भोजराजानें कालिदासास म्हटलें, " कविराज ! भारत, इक्षुदंड ( ऊंस) आणि चंद्र, या तिहींचें एकदम वर्णन करा. " कवीनें उत्तर केलें— " तिहींचा रस प्रतिपर्वी चढतो. "—' पर्व ' शब्द श्लिष्ट आहे, त्याचा पहिला अर्थ प्रसिद्ध आहेच. दुसरा ' पेर, ' आणि तिसरा ' पर्वणी. '

---

विद्यायां दुर्मदो यस्य कार्पण्य विभवे सति ॥
तेषां दैवाभिशप्तानां सलिलादग्निरुत्थितः ॥ २२ ॥

"ज्यास विद्येपासून दुर्मद म्हणजे दुष्ट गर्व आणि संपत्तीपासून कृपणपणा जडतो, त्यास दैवानें शापच दिला असें समजावें ! पाण्यापासून अग्नि निघून जसा मनुष्य भाजावा, त्याप्रमाणेंच वरील दोघा हतभाग्याची स्थिति होय. !"

---

असाधुः साधुर्वा भवति खलु जात्यैव पुरुषो
न संगाद्दौर्जन्यं न च सुजनता कस्यचिदपि ॥
प्ररूढे संसर्गे मणिभुजगयोर्जन्मजनिते
मणिर्नाहेर्दोषान्स्पृशति न च सर्पो मणिगुणान् ॥ २३ ॥

" पुरुष जो सज्जन किंवा दुष्ट होतो तो जातीनेंच म्हणजे स्वभावेंकरूनच असतो, दुसऱ्याचें दौर्जन्य किंवा सौजन्य कोणास संगतीनें लागत नाहीं. पहा कीं सर्प व त्याच्या शिरींचा मणि यांचा सहवास साऱ्या जन्मभर असतो, पण त्या रत्नास सर्पाचे दोष लागत नाहींत व सर्पासही रत्नाचे गुण लागत नाहींत. "

---

कोणी दरिद्री कवि दारिद्र्यास उद्देशून मौजेनें म्हणतोः—

हे दारिद्र्य नमस्तुभ्यं सिद्धोऽहं त्वत्प्रसादतः ॥
पश्याम्यहं जगत्सर्वं न मां पश्यति कश्चन ॥ २४ ॥

"हे दारिद्र्या ! तुझा काय प्रभाव सांगावा.! तुझ्या कृपेने मी सिद्ध झालो आहे ! कसा म्हणशील तर मी सर्व जगास पाहत असतां मला कोणी पाहत नाहीं!" तात्पर्य हे की, गरीब मनुष्यास कोणी पुसत नाहीं.

---

**इतरपापफलानि यथेच्छाया वितर तानि सहे चतुरानन ॥**
**अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख २५**

" हे ब्रह्मदेवा ! मीं जीं पातकें केलीं असतील त्याचीं इतर फलें तू मला खुशाल दे, तीं मी भोगीन. पण एक मात्र माझ्या कपाळीं नको—नकोच लिहू. ते येवढें दुःसह काय ?—अरसिकापाशीं कवित्व-निवेदन, म्हणजे कवितेचा रस समजून देणे ! " आमच्या वाचकापैकीं कोणासही वरील श्लोक न लागो म्हणजे झालें !

---

**परिचरितव्याः संतो यद्यपि कथयंतिनो सदुपदेशम् ॥**
**यास्तेषां स्वैरकथास्ता एव भवंति शास्त्राणि ॥ २६ ॥**

" सत्पुरुषांनीं साक्षात् उपदेश जरी केला नाहीं,तरी त्याच्या सहवासानें नेहमीं असावें, का कीं, त्याचें जें सहज बोलणें तें सुद्धा मोठें अर्थयुक्त असतं ! "

---

**तावन्मौनेन नीयंते कोकिलैश्चैव वासराः ॥**
**यावत्सर्वजनानंददायिनी वाक् प्रवर्तते ॥ २७ ॥**

" कोकिल तोपर्यंत मौनच धरून दिवस घालवितात, कीं जोपर्यंत सर्व जनास आनद देणारी वाणी त्यास प्राप्त झालेली नसते ! " ही अन्योक्ति आहे. जोपर्यंत लोकात मोठेपणा मिळविण्याची शक्ति आपले ठायीं आली नसते, तोपर्यंत चतुर पुरुष अप्रसिद्धच राहतात.

---

राधेच्या घरून आपणाकडे आलेल्या कृष्णास सत्यभामा म्हणते—

**परिपीय तदीयमोष्ठबिम्बं वचनानि स्खलयन्नुपागतोऽसि ॥**
**उचितं तदिदं मुकुंद मन्ये रसना बिंबफलेन जाड्यमेति ॥ २८ ॥**

"हे मुकुंदा! तिच्या अधराचे पान करून तू मजकडे आला आहेस हें मी सम
जाले ! कशावरून म्हणशील, तर तुझ्या अडखळण्यावरून, भलतेच बोलण्या
वरून ! तोंडल्याने जीभ जड होते हे सर्वांस माहीत आहे !

---

**एक वस्तु द्विधा कर्तुं बहवः संति धान्विन ॥**
**जयत्येक स्मरो धन्वी द्वैतमेकी करोति यः ॥२९॥**

कोणी कवि मदनाचा प्रभाव वर्णितोः—" एका वस्तूच्या दोन करणा
पुष्कळ धनुर्धर आहेत. पण दुजेपण मोडून दोहोंस एक करणारा अस
धनुर्धर एक कामच ! "

---

**संगमविरहविकल्पे वरमिह विरहो न संगमस्तस्या ॥**
**सगे सैव यदैका त्रिभुवनमपि तन्मय विरहे ॥ ३० ॥**

" तिच्याशी ( आवडत्या स्त्रीशीं ) सगम किंवा विरह यातून तुल
कोणतें हवे म्हणून जर मला कोणी विचारले, तर मी विरह बरा, सगम
नको असे सागेन ! का कीं, समागम झाला असता ती एकटीच मल
मिळणार; पण जर विरह घडला, तर अवघ्या त्रिभुवनात ती मला जिकडे
तिकडे दिसेल ! "

---

**बंधनानि खलु संति बहूनि प्रेमरज्जुदृढबंधनमाहुः ॥**
**दारुभेदनिपुणोऽपि षडंघ्रिर्निष्क्रियो भवति पंकजकोशे ॥३१॥**

" बधने अनेक आहेत खरीं, पण सर्वांत प्रेमरज्जूचे बधन अत्यत दृढ
होय. पहा बरे ! भ्रमर हा लाकडाची लाकडे फोडून काढतो, पण कमळाच्या
गाभ्यात त्याचे काही चालत नाहीं."

---

**जातः स्तन्य न जग्राह कंठीरवकिशोरक ॥**
**चक्षुर्व्यापारयामास कुंजे कुंजरशालिनि ॥ ३२ ॥**

" सिंहाचा बच्चा उपजताच आईचे दूध प्याला नाहीं, अगोदर
हत्तींच्या कुंजाकडे त्याने दृष्टि फेकली ! "

गृह्णात्येष रिपोः शिरः प्रजविन कर्षत्यसौ वाजिनम्
धृत्वा चर्म धनुः प्रयाति पुरतः संग्रामभूमावपि ॥
द्यूतं चौर्यकथां तथा च शपथ कुर्यान्न वामः करो
दानानुद्यमतां विलोक्य विधिना शौचाधिकारीकृत. ॥२३॥

एके समयीं कोणा एका राजाचे दोन्ही हात धरून दोघे कवी फिरत होते. तेव्हां एकेकानें आपआपल्या हाताचें वर्णन आरंभलें. डावा हात धरून जो चालला होता तो म्हणाला—

" हा हात शत्रूचें शिर धरतो, तसेंच घोड्याचा लगाम धरून त्यास अट-कावात ठेवतो, आणि रणभूमीवर ढाल किंवा धनुष्य घेऊन हाच चालतो.— इतकेंच नव्हे, तर उजव्या हाताचे अवगुणही यात नाहींत—हा डावा हात द्यूत खेळत नाहीं, चोरी करीत नाहीं, अथवा शपथही वाहात नाहीं. " दुसऱ्या कवीनें हें सर्व ऐकून घेतलें, आणि थोडेंच उत्तर केलें कीं, " हे सर्व खरें, पण दानकर्मास हा अयोग्य जाणून विधात्यानें त्याची योजना—कडे केली आहे. " हा श्लोक एरवीं फार उत्कृष्ट आहे, पण शेवटल्या पदाच्या अश्ली-लत्वानें याची थोडीशी खराबी झाली.

---

खालील श्लोकात विष्णूच्या दहा अवतारास उद्देशून कवीनें असें मौजेनें दाखविलें आहे कीं, मनुष्यापाशीं संपत्ति असली म्हणजे तिच्या आड सारे अवगुण लपून जातात.—

तिर्यक्त्वां भजतु प्रतारयतु वा धर्मक्रियाकोविदम्
हंतु स्वां जननीं पिबत्वपि सुरां शुद्धां वधमुज्झतु ॥
वेदान्निंदतु वा हिनस्तु जनतां किंवाऽनया चिंतया
लक्ष्मीर्यस्य गृहे स एव भजति प्रायो जगत्पूज्यताम् ॥२४॥

" मनुष्य पशूसारखीं कर्मे करो, धार्मिक मनुष्यास नाडून त्यास तोंड-घशीं पाडो, आपल्या आईचा वध करो, सुरापान करो, निरपराधी स्त्रीस टाकून देवो, वेदांची निंदा करो, लोकास मारो,—कांहीं करो, त्यापाशीं लक्ष्मी ( पक्षीं, संपत्ति ) असली म्हणजे जगास तो पूज्य ( पक्षीं, आद-रास पात्र ) व्हावयाचाच ! "

**गुरवो बहवः संति शिष्यवित्तापहारकाः ॥**
**दुर्लभः स गुरुर्लोके शिष्यचित्तापहारकः ॥ ३५ ॥**

" शिष्याच्या वित्ताचें अपहरण करणारे गुरु पृथ्वीच्या पाठीवर पुष्कळ आहेत, पण असा गुरु थोडा, कीं जो शिष्याच्या चित्ताचें अपहरण करतो!"

---

✓ **सुखार्थी च त्यजेद्विद्यां विद्यार्थी च त्यजेत्सुखम् ॥**
**सुखार्थिन कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम् ॥३६॥**

"ज्याला सुख म्हणजे चैन हवी असेल त्याने विद्या सोडून द्यावी; व ज्यास विद्या हवी असेल त्याने सुख सोडून द्यावें.कारण ज्यास सुख हवे त्यास विद्या कोठची ? व ज्यास विद्या पाहिजे त्यास सुख कोठचे ? "

---

**अर्थातुराणां न पिता न बंधुः कामातुराणां न भयं न लज्जा ॥**
**क्षुधातुराणां न बलं न तेजश्चिंतातुराणां न सुखं न निद्रा ॥ ३७ ॥**

" पैशाकरिता जे लोकाच्या मुड्या मुरगळणार त्यांस बाप नाहीं व भाऊही नाहीं, जे कामांध झाले त्यास भय नाहीं; व लज्जाही नाहीं; जे नेहमी बुभुक्षित असणार त्यास बल नाहीं व तेजही नाहीं, आणि जे चिंतेने व्यापले त्यास सुख नाहीं व निद्राही नाहीं. "

---

कोणी तरुण स्त्री आपल्या मनाच्या निरनिराळ्या वृत्ति आपल्या सखीस निवेदन करिते—

**कृतांतो वा कांतः समजनि न भेदः प्रथमत-**
**स्ततो छित्रैर्मासैर्मनुज इति जग्राह हृदयम् ॥**
**ततोऽसौ मत्प्रेयानहमपि तदीया प्रियतमा**
**क्रमाद्वर्षे प्राप्ते प्रियतममयं जातमखिलम् ॥ ३८ ॥**

" जेव्हा माझी पहिल्याने गाठ पडली तेव्हा कांत ( नवरा ) कीं कृतांत ( यम ) यांत मला भेद वाटत नसे, पुढे दोन तीन महिन्यांनीं तो आपल्या सारखाच मनुष्य आहे असें मला वाटू लागले; त्यानंतर तो माझा प्रियकर आणि मी त्याची आवडती स्त्री असें माझ्या

बुद्धीस वागू लागले; आणि हळू हळू वर्षे होत आले तेव्हातर सर्व त्रिभुवनात तो मला दिसू लागला ! ”

---

## राममत्स्यसंवादः—

राम —**पश्य लक्ष्मण पंपायां बक परमधार्मिक· ॥**
**शनैर्मुंचति पादाग्रं प्राणिनां वधशंकया ॥ ३९ ॥**
मत्स्य —**सहवासी विजानाति सहवासिविचेष्टितम् ॥**
**बकः किं वर्ण्यते राम येनाहं निष्कुलीकृतः ॥ ४० ॥**

राम व लक्ष्मण सीतेचा शोध करीत पपासरोवराशी आले. तेव्हा तेथील अपूर्व शोभा पहात असता राम लक्ष्मणास म्हणतो:—“हे लक्ष्मणा! पहा, या पपासरोवरात बगळेही केवढे धार्मिक आहेत ते ! तो बगळा पहा, पायाखाली एखादा जीवजंतु चिरडेल या शकेने कसे हळू हळू पाय टाकतो आहे ते ! ”

हे भाषण ऐकून एक मासा रामास म्हणतो:—“हे रामा ! कोणाची वागणूक कशी आहे हे त्याच्या शेजाऱ्यास पुसावे ! अरे, तू या बगळ्यास मोठा धार्मिक, मोठा हिसाभीरु म्हणून मानतोस ! यानेच माझे कुळ चट खाऊन टाकून मला एकटे ठेवलेना ! ”

हा सवाद ‘ रामायणा ’ तलाच आहे किवा दुसऱ्या कोणा कवीने केला आहे कोण जाणे ! पण कोठलाही असला, तरी हा फार बहारीचा आहे यात सशय नाही. यात एक तर त्या काव्यप्रसिद्ध रम्य सरोवराचे थोडक्यात मजेदार वर्णन आहे, आणि शिवाय मनुष्य आपल्याच हृदयवृत्तीवरून दुसऱ्याच्या वृत्तीचे मान नेहमी कसे करीत असतो याचेही हे खुबीदार उदाहरण होय. तसेच या पद्याची रचनाही अगदी साधी असून सुदर असल्यामुळे मागे सागितलेल्या अत्युत्तम काव्याचाच हाही आणखी एक मासला होय.

---

**अनंतरत्नप्रभवस्य यस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातम् ॥**
**एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतीदोः किरणेष्विवांकः॥४१॥**

कुमारसभव. १

कालिदास हिमालयाच्या वर्णनात म्हणतो:—" या पर्वतात अगणित रत्ने निपजतात, यास्तव यावर जरी चोहोंकडे बर्फ पडले आहे तरी येवढ्यानेच याच्या रम्यतेची हानि होत नाहीं, का तर ज्याप्रमाणे चद्राच्या प्रभेत त्याचा डाग लपून जातो, त्याप्रमाणे गुणाच्या समुदायात एक दोष लोपून जाऊन दिसेनासा होतो."

याच्यावर दुसऱ्या एका कवीने कोटी केली आहे.—

**एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतींदोरिति यो बभाषे॥**
**नूनं न दृष्टं कविनाऽपि तेन दारिद्र्यदोषो गुणराशिनाशी ॥ ४२ ॥**

हा कवि दरिद्री असावा असे दिसते. तो म्हणाला:—" गुणसमुदायात एक दोष लपून जातो " इत्यादि ज्याने लिहिले त्याच्या नजरेतून स्वत: कवि असताही * येवढे चुकलें असावे कीं, " एक दारिद्र्यदोष असला म्हणजे तो सर्व गुण लोपवून टाकतो ! " तस्मात् वरील नियम सर्वथैव खरा म्हणतां येत नाहीं.

---

**पृथ्वी तावदियं महत्सु महती तद्वेष्टनं वारिधिः**
**पीतोऽसौ कलशोद्भवेन मुनिना स व्योम्नि खद्योतवत् ॥**
**तद्विष्णो: परमं पदं कलयतः पूर्णं पदं नाभवत्**
**सोऽपि त्वद्धृदि वर्तते खलु भवंस्त्वत्त परः को महान् ॥४३॥**

कोणीं कवि कोण्या भगवत्परायण साधूस म्हणतो:—" हे महापुरुषा ! तुझ्याहून थोर कोण आहे?—कसें म्हणशील तर पहा. ही पृथ्वी अगोदर मोठ्यांत मोठी म्हणजे फार विस्तीर्ण आहे; तिचें वेष्टन समुद्र, त्या समुद्रास ज्याने पिऊन टाकिलें तो अगस्त्य मुनि ऽ आकाशात केवळ काजव्याप्रमाणें आहे, तें येवढें अवाढव्य आकाश विष्णूच्या एका पावलास पुरलें नाहीं, पण येवढा व्यापक परमेश्वर असता तो तुझ्या हृदयांत वास करतो ! तेव्हा तू

---

* ' जे न देखे रवि ते देखे कवी ॥ ' अशी मराठींत म्हण आहे.

ऽ (अगस्तीचा) तारा दक्षिणगोलार्धांत आहे. तो मार्गशीर्षापासून सहा महिने सन्ध्याकाळीं दक्षिणेकडे दिसत असतो.

केवढा मोठा ! ! " या अलकारास संस्कृतात सार व इग्रजीत Climax म्हणतात.

---

कवितेचा अर्थ कसा असावा याविषयीं पडितराय लिहितातः--—

**अर्थो गिरामपिहितः पिहितश्चकश्चित्**
**सौभाग्यमेति मरहट्टवधूस्तनाभः ॥**
**नो गुर्जरीस्तन इवातितरां निगूढो**
**नांध्रीपयोधर इवातितरां प्रकाशः ॥४४॥**

जगन्नाथराय.

" मरहट्ट ( मारवाडी ) स्त्रियाच्या स्तनाप्रमाणे जेव्हा काव्याचा अर्थ बड उघडा नाहीं बड झाकलेलाही नाहीं असा असतो, त्या वेळेस फार शोभतो, पण जेव्हा गुर्जरीस्तनाप्रमाणें ता अत्यत गूढ असतो, किंवा आंध्री *—स्तनाप्रमाणे अगदीं उघड असतो, तेव्हा तो तसा शोभत नाहीं.

---

**कल्पांतक्रूरकेलिः क्रतुकदनकरः कुंदकर्पूरकांतिः**
**क्रीडन्कैलासकूटे कलितकुमुदिनीकामुकः कांतकायः ॥**
**कंकालक्रीडनोत्कः कलितकलकलः कालकालीकलत्रः**
**कालिंदीकालकंठ कलयतु कुशलं कोऽपि कापालिको नः॥४५**

" तो योगिश्रेष्ठ आमचे कल्याण करो.—जो कल्पांतीं भयकर क्रीडा करतो, ज्याने यज्ञाचा ( दक्षाचा ) विध्वंस केला, . ज्याची काति कुदपुष्पाप्रमाणे व कापुराप्रमाणें आहे, जो कैलासाच्या शिखरावर क्रीडा करतो, ज्याने चद्र धारण केला आहे, ज्याचे शरीर सुदर आहे, जो ( स्मशानीं ) प्रेतास्थीशीं रमतो, जो अट्टाहास करतो, ज्याचे कलत्र काळी जी काली ती आणि ज्याचा गळा यमुनेप्रमाणें काळा आहे." या शब्दालकारास प्रास म्हणतात.

---

**क्वचिद्वीणावाद्य क्वचिदपि च हाहेति रुदितम्**
**क्वचिद्विद्वद्गोष्ठी क्वचिदपि सुरामत्तकलह ॥**

* आध्रदेश दक्षिण हिंदुस्थानात आहे. त्याचे आताचे नाव तेलंगण आहे

**क्वचिद्रम्या रामा क्वचिदपि गलत्कुष्ठवपुषो**
**न जाने संसारः किममृतमयः किं विषमयः ॥ ४६ ॥**

कवि संसाराची सुखदुःखविचित्रता वर्णितो:—" अहो! हा संसार विषमय आहे, की अमृतमय आहे याचा मला निश्चय होत नाहीं! कोठे पहावें तो सतार झडते, कोठे विलापाचा स्वर कानीं येतो; कोठे विद्वज्जनांचा समुदाय विनोदात रमलेला दिसतो; कोठे दारू पिऊन मस्त झालेल्यांचा कल्ला ऐकू येतो, कोठे रम्य स्त्रिया असतात, आणि कोठे त्याच रोगग्रस्त दृष्टीस पडतात. तस्मात् संसार मोठा विचित्र आहे!"

---

या एकाच श्लोकात श्लेषद्वारा कृष्णाचे व रामाचे वर्णन केले आहे: —

**य पूतनामारणलब्धकीर्तिः काकोदरो येन विनीतदर्पः ॥**
**यशोदयालंकृतमूर्तिरव्यात्पतिर्यदूनामथवा रघूणाम् ॥४७॥**

( रामपक्षीं ) " ज्याचे नाव पुण्यप्रद आहे, ज्याने रणांत कीर्ति मिळविली, ज्याने काकोदराचा ( विशेषनाम आहे की, काय कोण जाणे! ) गर्व शमविला, ज्याची मूर्ति यश व दया याहीं अलंकृत आहे, तो रघुपति तुमचे रक्षण करो.

( कृष्णपक्षीं ) " जो पूतनेच्या वधाने प्रसिद्ध झाला आहे, ज्याने सर्पाची ( कालियाची ) खोड मोडली, ज्यास यशोदेने नटवला आहे, असा यदुपति—" अशा श्लेषास सभंगश्लेष म्हणतात.

---

**करवालकरालवारिधारा यमुना दिव्यतरंगिणी च कीर्तिः ॥**
**तव कामद तीर्थराज दूरादनुबध्नाति सरस्वती कवीनाम् ॥४८॥**

कोणी कवि राजास उद्देशून म्हणतो:—" हे उदार राजा! तुझ्या तरवारीची तीव्र धार हीच ( काळेपणामुळें ) यमुना होय, तुझी कीर्ति ही ( शुभ्रत्वास्तव ) भागीरथी होय, व यास्तवच कवींची सरस्वती ( वाणी—पक्षीं, या नावाची नदी ) ही दुरून तुजकडे येऊ पाहते, का तर, तू तीर्थराज म्हणजे प्रयागक्षेत्र आहेस!"

---

**खद्योतो द्योतते तावद्यावन्नोदयते शशी ॥**
**उदिते तु सहस्रांशौ न खद्योतो न चंद्रमाः ॥ ४९ ॥**

" जोपर्यंत चद्र उगवला नाहीं तोंपर्यंत काजव्याची चमक, आणि सहस्त्रकिरण जो सूर्य तो उगवला म्हणजे तर काजवाही एकीकडे राहतो व चंद्रही एकीकडे राहतो." ही अन्योक्ति आहे. एकाहून एक वरचढ गुणी आले असतां मागले निस्तेज होऊन जातात !

---

**वदनं प्रसादसदनं सदयं हृदयं सुधामुचो वाचः ॥**
**करणं परोपकरणं येषां केषां न ते वंद्याः ॥ ५० ॥**

सज्जन पुरुषाचें यात पूर्ण वर्णन आहे —" ज्यांचें मुख नेहमीं प्रफुल्लित, हृदय कोमळ, वाणी अमृत स्त्रवणारी, शरीर परोपकारार्थ सतत झिजणारे, असे जे पुरुष असतील ते कोणास वंद्य नव्हेत ! " या आर्येत सर्वत्र अनुप्रास आहे.

---

कोणी कवि विक्रम राजाच्या सभेस जाऊन त्यानें हीं सुभाषितें त्या राजापुढे म्हटलीं:—

**सर्वदा सर्वदोऽसीति त्वं मिथ्या स्तूयसे बुधैः ॥**
**नारयो लेभिरे पृष्ठं न वक्षः परयोषितः ॥ ५१ ॥**

" हे राजा ! तूं सर्वकाळ सर्वांचें दान करीत असतोस ही तुझी मिथ्या स्तुति कवि गातात ! का तर, आजपर्यंत शत्रूस तूं कधीं पाठ दिली नाहींस, व परस्त्रियास तुझें वक्षस्थळही कधीं लाधलें नाहीं " हा व्याजनिंदा अलंकार होय.

**अपूर्वेयं धनुर्विद्या भवता शिक्षिता कुतः ॥**
**मार्गणौघः समभ्येति गुणो याति दिगंतरं ॥ ५२ ॥**

" हे राजा ! तू ही अपूर्व धनुर्विद्या कोणापाशीं शिकलास ? चमत्कार काय कीं, मार्गणाचा ( बाणाचा, पक्षीं याचकांचा ) समुदाय तुजकडे येतो, आणि गुण ( धनुष्याची दोरी, पक्षीं कीर्ति ) दिगंतरास जातो ! " तेव्हा हा व्यापार धनुष्याच्या नेहेमींच्या व्यापाराहून अगदीं उलट झाला !—श्लेष काढला असता अर्थात् सर्व ठीकच आहे.

**सरस्वती स्थिता कंठे लक्ष्मीः करसरोरुहे ॥**
**राजेंद्र कुपिता कीर्तिस्तेन देशांतरं गता ॥ ५३ ॥**

"'हे राजा! सरस्वती तुझ्या कंठाशीं वास करते आहे, (पक्षीं कंठालिंगन करते आहे; आणि लक्ष्मी तुझ्या हस्तकमलाच्या ठायीं आहे— म्हणजे तू मोठा दानशूर आहेस, (पक्षीं, लक्ष्मीचे करांनी लालन करितो आहेस), यास्तव कीर्तीस (सवतीमत्सरास्तव) राग येऊन ती (झिट काऱ्यानें तुला टाकून) देशांतरास म्पून गेली!' काय चमत्कारिक अर्थ वर्णिला आहे!'

हे तिन्ही श्लोक विक्रमचरित्रांत आहेत. तींत असे लिहिलें आहे कीं, या श्लोकांनीं राजा इतका प्रसन्न होऊन गेला कीं, प्रत्येक श्लोकाबरोबर एकेक दिशेचे राज्य त्याने त्या कवीस बक्षीस केले.—वस्तुतः पहाता त्याची योग्यता खरोखरच तशी आहे!!

---

न नीतमुपनासिकं परिमलव्ययाशंकया
न हंत विनिवेशितं विरहवन्हिकुंडे हृदि ॥
दृशोर्बहिरिति श्रुतौ न निहितं प्रियप्रेषितम्
करे कमलमर्पितं मृगदृशा दृशा पीयते ॥ ५४ ॥

एका स्त्रीस तिच्या प्रियकराने एक कमल पाठवून दिले. तेव्हा तिने त्याची याप्रमाणे व्यवस्था केली:—" ते तिने नाकाशीं नेऊन त्याचा वास घेतला नाहीं. का तर तशानें त्याचा सुगंध कमी होईल या भयानें: ते तिने आपल्या हृदयांत खोवले नाहीं, का तर विरहाग्नीच्या धगीनें ते न जाणों कोमेजून जाईल म्हणून, तसेच ते तिने आपल्या कानावरही ठेविले नाहीं,—डोळ्याआड होतें म्हणून. तर केले काय?—ते त्या मृगनयनेन आपल्या हातांत घेऊन त्याचें दृष्टीने प्राशन करीत राहिली." नाजुक शृंगाराचा हा एक उत्कृष्ट मासला होय!

---

गुणानामज्ञाता प्रचुरधनदाताऽपि न मुदे
मुदे विद्याज्ञाता भवति मितदाताऽपि गुणिनाम
दशौ ग्राम्या दत्त न पुनरवधत्ते च चतुरो
दश प्रांतं दत्त्वा वशयाति नितांतं पुरवधू ॥ ५५॥

"पुष्कळ धन देतो खरा, पण ज्यास गुण कळत नाहीं तो धनी गुणिजनांस आनंदप्रद होत नाहीं, आणि बक्षीस थोडेंच का देईना, पण

ल्यास मनुष्याच्या आगांतली करामत समजते त्याच घन्याम ते राजी होतात. कसें ?—तर जशी ग्राम्य स्त्री ही जाणाऱ्या पुरुषाकडे डाळे भरून पहाते, पण चतुर पुरुष तिजकडे लक्षसुद्धां देत नाहीं; पण नगरांतील स्त्री डोळ्याचा किंचित् कोंपरा त्याकडे वरते, पण मन वेधूनच टाकत ! " सारांश, खरा परीक्षक भेटला म्हणजे गुणाचें चीज होतें.

---

कोणी कामी आपल्या मनांत भरलेल्या स्त्रीस उद्देशून म्हणतो:—

**मम प्रेम तवौदास्यं स्पर्धया वर्धते द्वयम् ॥**
**जेतव्यमनयो कन न जाने पंकजानन ॥ ५६ ॥**

" हे कमलानने ! माझें तुजवरचें प्रेम आणि तुझें मजविषयीं औदासिन्य हीं जणा काय चढाओढीनें वाढताहेत. आता या दोहोंतून कोणाची सरशी होईल ते मला समजत नाहीं ! "

---

कोणी कवी पेशव्याच्या दरबारीं आला असता गादीस उद्देशून म्हणतो—

**श्रीविर्धनकरो राजा मंत्री तु पटवर्धनः ॥**
**तथाऽपि श्रीः पटो नास्ति वाग्वर्धनकरस्य मे ॥ ५७ ॥**

" राजा श्रीवर्धनकर, ( लक्ष्मीचे वर्धन करणारा, पक्षीं, श्रीवर्धनचा मूळचा राहणारा, ) आणि मंत्री पटवर्धन ( वस्त्राची वृद्धि करणारा, पक्षीं, आडनाव ), तरी वाग्वर्धनकरास ( बहुभाषण करणारास, पक्षीं वावधनकरास ) मला श्री ( संपत्ति ) नाहीं व पट ( वस्त्र ) ही नाहीं ! "

---

विवाहसमयीं निरनिराळ्या पक्षाचे कसकसे मनोरथ असतात ते खालील श्लोकांत दाखविले आहेतः—

**कन्या वरयते रूपं माता वित्तं पिता श्रुतम् ॥**
**बांधवाः कुलमिच्छंति मिष्टान्नमितरे जनाः ॥ ५८ ॥**

" कन्येस नवरा रूपवान् असावा येवढीच इच्छा असते; तिच्या आईस तो घरचा संपन्न असला म्हणजे झालें, बापाचें पाहणे त्याच्या केवळ विद्येवर असतें; आप्ताच्या मनांत तो कुलीन असावा इतकेच असते; आणि बाकीच्या लोकांस चार दिवस चमचमीत भोजन असलें म्हणजे झालें. "

पांडवांतला चौथा नकुळ अश्वविद्येत मोठा निपुण होता. तो विराट-राजाच्या पदरीं ग्रंथिक नाम धारण करून राहिला होता, हें सर्वत्र प्रसिद्ध आहेच. त्याच्या कौशल्याविषयीं कोणी कवि म्हणतोः—

**मंडले मंडलाकारो रेखा वाजिमयी जवे ॥**
**सव्यापसव्ये द्विमुखा नकुलाधिष्ठिता हयः ॥ ५९ ॥**

" नकुळानें घोड्याकडून जेव्हां रगण वेववावें तेव्हां तो घोडा वर्तुलच आहे काय असा भास होई, जेव्हां समोर सारखा काढावा, तेव्हां घोड्याची एक लांबच लांब रेघ दिसे; डावी उजवीकडे फिरवी तेव्हां घोड्यास दोन तोंडें आहेत काय असा भास व्हावा ! "

---

कवि नूतन वधूचा प्रकार वर्णितोः—

**असंमुखालोकनमाभिमुख्यं निषेध एवानुमतिप्रकारः ॥**
**प्रत्युत्तरं मुद्रणमेव वाचो नवांगनानां नव एव पंथाः ॥ ६० ॥**

" नुकताच ज्यांचा विवाह झाला अशा नूतन स्त्रियांची रीतही नवीन म्हणजे मोठी विचित्र असते ! ती अशी कीं, त्यांचें दुसरीकडे बघणें म्हणजेच नवऱ्याकडे बघणें, नको म्हणणें म्हणजेच रुकार देणें, आणि मुकस्तंभ राहणें म्हणजेच प्रत्युत्तर देणें ! " अशाच अर्थाचे एक दोन श्लोक ' शाकुंतल ' नाटकाच्या पहिल्यादुसऱ्या अंकांत आहेत ते आमच्या संस्कृतज्ञ वाचकांस माहीत असतीलच.

---

कोणी कवि राजास आशीर्वाद करतोः—

**कमलभूतनया वदनांबुजे वसतु ते कमला करपल्लवे ॥**
**वपुषि ते रमतां कमलागजः प्रतिदिनं हृदये कमलापतिः ॥ ६१ ॥**

" हे राजा, तुझ्या मुखाचे ठायीं कमलभूतनया ( सरस्वती ) वास करो; हस्ताचे ठायीं कमला ( लक्ष्मी ) वास करो; तुझ्या शरीराचे ठायीं कमलागज ( मदन ) विहार करो, आणि हृदयाचे ठायीं नेहमीं कमलापति ( विष्णु ) वास करो. " सारांश, वक्तृत्व, दातृत्व, सौंदर्य आणि भक्ति हीं तुझे ठायीं नांदोत.

---

**त्यजंति शूर्पवद्दोषान्गुणान्गृह्णन्ति साधवः ॥**
**दोषग्राही गुणत्यागी चालनीरिव दुर्जनः ॥ ६२ ॥**

" सज्जन रसिक जे असतात ते सुपाप्रमाणे ग्रथातील दोष टाकून गुण तेवढे ग्रहण करतात; आणि दुर्जन असतात ते चाळणीप्रमाणें गुण गाळून टाकून दोष तेवढे घेतात. "

---

**मीनः स्नानरतः फणी पवनभुङ् मेषस्तु पर्णाशनो**
**नीराशः खलु चातकः प्रतिदिनं शेते बिले मूषकः ॥**
**भस्मोद्धुलनतत्परः खलु खरो ध्यानाधिरूढो बकः**
**सर्वे किं ननु यांति मोक्षपदवीं ज्ञानप्रधानं तपः ॥ ६३ ॥**

" मासा नेहमीं पाण्यात डुबतो, साप वारा पितो, मेंढा पानें खाऊन राहतो, चातक नुसतें पाणी पितो,उंदीर नेहमीं बिळात एकांतवासी असतो, गाढव राखेनें भरलेला असतो, आणि बगळा ध्यान लावून बसतो,—मग हे सर्व मोक्षास जातात काय ? तेव्हां तपश्चरण ज्ञानाशिवाय व्यर्थ होतें.

---

बाप आपल्या मुलास व्याकरणाचा उपयोग सांगतोः—

**यद्यपि बहु नाधीषे तथाऽपि पठ पुत्र व्याकरणम् ॥**
**स्वजन श्वजनो मा भूत्सकलं शकलं सकृच्छकृत् ॥ ६४ ॥**

" हे पुत्रा ! तू दुसरें कांहीं पढला नाहींस तरी निदान व्याकरण तरी म्हण. म्हणजे ' स्वजनाच्या ' ठिकाणीं ' श्वजन ' ( कुत्र्यांचा समुदाय ) ' सकला ' बद्दल ' शकल ' ( तुकडा ) ' सकृत ' ( एकदा ) त्याच्या जागीं ' शकृत् ' ( विष्ठा ) असे हास्यास्पद दोष तुझ्या भाषणात येणार नाहींत. '

---

**सकृज्जल्पंति राजानः सकृज्जल्पंति पंडिताः ॥**
**सकृत्कन्याः प्रदीयते त्रीण्येतानि सकृत्सकृत् ॥ ६५ ॥**

" राजे ( म्हणजे जे खरे थोर असतात ते ) एक वार भाषण करतात, तसे पंडित, त्याप्रमाणेच कन्यादान एकदाच होतें,—ह्या तीन गोष्टी एकदा झाल्या म्हणजे झाल्या मग माघारी येत नाहींत. "

**सज्जनस्य हृदयं नवनीतं यद्वदंति कवयस्तदलीकम् ॥**
**अन्यदेहविलसत्परितापात्सज्जनो द्रवति नो नवनीतम् ॥६६॥**

" सज्जनाचें हृदय लोण्यासारखें असतें असें जे कवि म्हणतात तें खोटें आहे. का तर, सज्जन दुसऱ्यास झालेल्या तापानें द्रवतात, आणि लोणी केवळ आपल्याच तापानें विरघळतें, " या स्थलीं व्यतिरेकालंकार आहे.

---

**अपूर्वेयं धनुर्विद्या मदनस्य महात्मनः ॥**
**शरीरमक्षतं कृत्वा भिनत्त्यंतर्गतं मनः ॥ ६७ ॥**

" पराक्रमी जो मदन त्याचें हस्तकौशल्य कांहीं विलक्षण आहे ! कसें तर शरीरास क्षत न पडतां तो आपल्या हृदयास विंधतो. " येथेंही वरचाच अलंकार आहे.

---

सर्वगुणसंपन्न पुरुषही कधीं कधीं दरिद्री असतात, या गोष्टीवरून कोणी चतुर कवि उत्प्रेक्षा करतोः—

**परीक्ष्य सत्कुलं विद्या शीलं शौर्यं स्वरूपताम् * ॥**
**विधिर्ददाति निपुणः कन्यामिव दरिद्रताम् ॥ ६८ ॥**

" उत्तम कुल, शील, विद्या, शौर्य, रूप इत्यादि सर्व गुण पाहून नवऱ्यामुलास शाहणा बाप जशी आपली मुलगी देतो, त्याप्रमाणे वरील

---

* या खेपस ' सुभाषितरत्नाकर ' नावाच्या अलीकडे प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांतून कांहीं श्लोक वर घेतले आहेत, व तसे पुढेंही मधून मधून घेतले जातील. हा उल्लेख येथ दोन कारणावरून केला आहे एक तर तसे करणें रास्त आहे म्हणून, आणि दुसरें कारण हा उत्कृष्ट ग्रंथ आमच्या वाचकांपैकीं कोणास ठाऊक नसेल तर तो माहीत व्हावा. हा ग्रंथ सर्व संस्कृतज्ञांच्या आश्रयास पात्र असतां त्याच्या योग्यतेप्रमाणे त्याचा प्रसार झाला असेलसें वाटत नाहीं. याचें कारण उघडच आहे जर एकाद्या शर्मण्यदेशीय पाचतात्रिक महापंडितानें तो रचला असता तर तो पांडित्याचें शिखर होऊन सगळें जग त्याच्या प्रसारास थोडें होतें ! एकीकडे यूरोप व दुसरीकडे अमेरिका खंड त्यानें पाहिले असतें. पण कर्ता पडला एतद्देशीय संस्कृतज्ञ, तेव्हां सगळी मसलत अंगवार न येतां छापण्याचा सर्व खर्च भागला म्हणजे परमभाग्य !

सर्व उत्कृष्ट गुणांची परीक्षा करून ब्रह्मदेव तेथे दरिद्रतेची योजना करतो ! ''

यद्यपि बहुगुणगम्यं जीवनमेतस्य कूपमुख्यस्य ॥
जयति तथाऽपि विवेको दानं पात्रानुमानेन ॥ ६९ ॥

" या मोठ्या कूपाचें ( विहिरीचें ) पाणी काढण्यास जरी मोठी दोरी लागते, तरी याचा विवेक म्हणजे तारतम्यविचार माठा प्रशंसनीय होय की पात्राच्या मानानेंच दान. '' ही अन्योक्ति आहे. एखादा मोठा धनिक, की ज्यापाशीं प्रवेश होण्यास मोठाच गुण अर्गी लागतो, आणि जो पात्रत्वाचा विचार करून त्या मानानेंच दान करतो, त्याकडे हिचे अनुसंधान आहे. कूपपक्षीं, तो खोल असल्यामुळें बहुगुण ( श्लिष्टशब्द आहे ) लागतो, आणि जवढें भाडें असेल तेवढेंच अर्थात् पाणी निघेल.

दृढतरनिबद्धमुष्टेः कोशनिषण्णस्य सहजमलिनस्य ॥
कृपणस्य कृपाणस्य च केवलमाकारतो भेदः ॥ ७० ॥

कवि, कृपण व कृपाण ( खड्ग ) याचें सादृश्य वर्णितो.—" दोहोंची मूठ बळकट घातलेली असते ( म्ह० कृपणाच्या हातून कवडी सुटायाची नाहीं, आणि तरवारीची मूठ अर्थातच बळकट केलेली असते ), दोघे कोशांत ( पैसा ठेवण्याच्या खोलींत; म्यानात ) पडून राहिलेले असतात, आणि दोघे स्वभावतःच मलीन ( मळकट वस्त्रे वापरल्यामुळे, निळ्या रंगामुळें ) असतात. भेद म्हणून काय तो एका आकारात ( दिसण्यात. कारण एक मनुष्य आणि दुसरें शस्त्र, पक्षीं, ' आ ' या अक्षरांत ) मात्र आहे ! ''

कथेच्या, पुराणाच्या वेळीं हटकून झोप येते, यावर कोणी एक नोशी कवि कल्पना बांधतो:—

निद्राप्रियो यः खलु कुंभकर्णो हतः समीके स रघूत्तमेन ॥
वैधव्यमापद्यत तस्य कांता श्रोतुं समायाति कथां पुराणम् ॥७१॥

" कुंभकर्ण जो निद्राप्रिय होता, त्याला रामचंद्रांनी रणात खपविला, तेव्हा ती निद्रा विधवा होऊन कथा पुराणें वगैरे ऐकण्यास येते ! ''

शेवटला पेशवा इंग्रजासमोर पळत होता त्यावर कोणीं * लिहिलें आहे:—

**आल्पिष्टोऽपि खलीनं दत्वाऽऽस्येऽपुच्छ? बाजिराजस्य ॥**
**आरूढस्तत्पृष्ठे भूमौ बभ्राम मडलाकारम् ॥ ७२ ॥**

" स्वतः अल्पिष्ट † (अत्यंत लहान) असताही ‡ बाजिराजाच्या (बाजिरावाच्या; मोठ्या घोड्याच्या) पाठीवर चढून त्याच्या तोंडात खलिन (वायु; लगाम) देऊन त्यानें त्यास भूमीवर मडळाकार फिरविलें." या आर्येत बाजिरावाचा थोड्या फौजेनें पराभव व पळता पळता जे त्याचे हाल झाले (खावयास खलीन म्ह० वायु) ते, हीं दोन्ही सुचविलीं आहेत.

---

**उपकर्तुं प्रियं वक्तुं कर्तुं स्नेहमकृत्रिमम् ॥**
**सज्जनानां स्वभावोऽयं केनेंदुः शिशिरीकृत ॥ ७३ ॥**

" दुसऱ्यावर उपकार करावा, गोड बोलावें, निष्कपट स्नेहाने वागावें, हा सज्जनाचा स्वभावच होय ! चद्रास कोणीं थड केला ? "

---

**भक्ते द्वेषा जडे प्रीतिररुचिर्गुरुलंघनम् ॥**
**मुखे च कटुकता नित्यं धनिनां ज्वरिणामिव ॥ ७४ ॥**

" धनवान आणि ज्वरी म्हणजे तापकरी याची स्थिति एक असते कशी कीं, भक्त. निष्ठेनें चाकरी करणारे लोक, (पक्षीं) भात, याविषयीं दोघांसही द्वेष असतो; जड म्हणजे मूर्खलोक, (पक्षीं) पाणी यावर दोघांची

---

* पेशव्याच्या पदरीं त्र्यावकमशास्त्री म्हणून कोणी होते, त्यानीं केलेल्यापैकी ही आर्या होय असें ऐकण्यात आहे

† एलफिन्स्टन् पुण्यास रेसिडेंट असता त्यास येथील लोक आल्पिष्टन् किंवा अलिप्ष्ट असे म्हणत असत या दुसऱ्या नावावर वरील आर्येत श्लेष केला आहे

‡ बवयोरभेद —यावरून ' बाजीराज ' म्हणजे ' उत्तम घोडा '—'अपुच्छ' याचा अर्थ बाजिराज पुच्छशून्य व घोडा पुच्छयुक्त असा कवीनें येथे व्यतिरेक सूचित केला आहे, अथवा युरोपियन लोक घोड्याच्या शेपटाचे लाब केंस कापून ना ताकडी करतात त्यास उद्देशून हे वर्णन असावें.

प्रीति; दोघांसही अरुचि प्राप्त होते, दोघांसही गुरुलंघन म्हणजे वडील माण-सांची अमर्यादा करणे ( पक्षी ) अन्नाशिवाय राहणे, हे आवडते. दोघा-चींही तोंडे कडू ( दोन्ही अर्थ उघडच आहेत ) होतात.

---

**शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पंडित ॥**
**वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा ॥ ७५ ॥**

" शंभरात एक शूर सापडेल; हजारात पंडित सापडेल, दहा हजारात वक्ता सापडेल, पण दाता असा होईल किंवा न होईल ! " यावरून दातृत्व किती कठीण आहे व याचे कारण जो पैशाचा लोभ तो मनुष्यात किती प्रबळ आहे याची कवीची खात्री होती असे दिसून येते.

---

**इंदीवरेण नयनं मुखमंबुजेन कुंदेन दंतमधरं नवपल्लवेन ॥**
**अंगानि चंपकदलैः स विधाय धाता कांते कथं घटितवानुपलेन चेतः**

कालिदास—शृंगारतिलक.

" हे कांते ! तुझे डोळे इंदीवराचे, तोंड कमळाचें, दांत कुंदाच्या कळ्याचे, अधरोष्ठ नव्या पल्लवाचा, याप्रमाणें कोमळ कोमळ पदार्थांनीं तुझे बाकीचें सर्व शरीर घडून तुझे हृदय मात्र विधात्याने कसे दगडाचें घडलें ? "

---

कवि कवितेचें आणि संजीवनी विद्येचें साम्य वर्णितोः—

**शब्दशक्त्यैव कुर्वाणा सर्वदानवनिर्वृतिम् ॥**
**काव्यविद्या श्रुतिगता स्यान्मृतस्यापि जीवनी ॥ ७७ ॥**

" ( कवितापक्षीं ) कविता ही केवळ शब्दांच्याच सामर्थ्यानें नेहमीं नवा नवा आनंद मनास देते, आणि कानीं पडताच मेलेल्यासही उठवून बसवील ! ( येथे शेवटीं अमळ अत्युक्तीचा दोष येतो. )

( संजीवनी पक्षीं ) शुक्राचार्यांची श्रुति-( वेद )-प्रसिद्ध विद्या केवळ उच्चारमात्रेंकरून मेलेल्यास उठवून सर्व दानवास आनंददायक झाली. "

---

√ **दयिताबाहुपाशस्य कुतोऽयमपरो विधिः ॥**
**जीवयत्यर्पितः कंठे मारयत्यपवर्जितः ॥ ७८ ॥**

" स्त्रियांच्या बाहुपाशाचा काय विपरीत प्रकार आहे हा ! तो कंठीं पडला असता जीव येतो ( आनंद होतो ), आणि निघाला म्हणजे मरण येतें ( त्यासारखें दुःख होतें ) ! "

---

( प्राचीन काळची स्वयंवराची चाल सर्वांस माहीतच आहे की, कन्येनें आपणास मागणी घालण्यास आलेल्या वरांतून आपला नवरा आपल्या खुषीनें निवडावा अशा प्रसंगीं आलेल्या वराचें कुलशीलादि वर्णन करण्यास कन्ये-बरोबर दासी किंवा तिचा भाऊ असें कोणी तरी असे. पुढील श्लोकांत स्वयंवरकाळीं तिचा भाऊ धन्वंतरि हा स्वयंवरास आलेल्या देवांचें वर्णन करतो आहे. या श्लोकांत कवीनें खुबी काय केली आहे, कीं बाहेरून त्याचें बोलणें आलेल्या देवास व लक्ष्मीस उद्देशून आहे असें दाखवून खरा अर्थ सगळा विष्णूकडेस लागेसा केला आहे. )

**मुग्धे मुंच विषादमत्र बलभित्कंपो गुरुस्त्यज्यताम्**
**सद्भावं भज पुंडरीकनयने मान्यानिमान्मानय ॥**
**इत्थं शिक्षयतः स्वयंवरविधौ धन्वंतरेर्वाक्छला-**
**दन्यत्र प्रतिषिद्धमात्मविहितं जानन् हरिः पातु वः ॥७९॥**

" हे वेडे ! गोंधळूं नको, धैर्य नाहींसें करणारें हें कापणें सोडून दे, चांगली स्वस्थ हो; आणि हे कमलनयने ! या मान्य देवांचा चांगला सत्कार कर "—हा वरवरचा सकृद्दर्शनीं दिसणारा अर्थ झाला; पण विवक्षित अर्थ श्लेषानें असा होतो—

" हे वेडे ! या विषादास ( शंकरास ) सोड, हा येथें इंद्र बसला आहे त्यास टाकून दे, तसाच वरुण व बृहस्पति हेही राहूं दे; विष्णूच्या ठायीं प्रेम धरून या बाकींच्या कोणासही मानूं नको. याप्रमाणें स्वयंवराचे वेळीं धन्वं-तरीनें लक्ष्मीस वक्रोक्तीनें आपल्या पक्षाचा अभिप्राय सांगितला असतां तो जाणणारा विष्णु तुमचें रक्षण करो. "

---

कोणी चतुर व विनोदी कवि खलाचें आणि डांसाचें साम्य वर्णितो:—

**प्राक्पादयोः पतति खादति पृष्ठमांसम्**
**कर्णे कलं किमपि रौति शनैर्विचित्रम् ॥**

**छिद्रं निरूप्य सहसा प्रविशत्यशङ्कः**
**सर्वं खलस्य चरितं मशकः करोति ॥ ८० ॥**

" मशक हा खलाची सर्व कृति करून दाखवितो. कशी? तर पहिल्यानें पायां पडतो ( पायाशीं घुटमळतो; आर्जव करतो ); मग पाठीचें मांस खातो ( पाठीला चावतो, न कळत कांहीं उपद्रव करतो ), नंतर कांहीं वेळ कानाशीं विचित्र गायन करतो ( कानाशीं गुणगुणतो; लाडीगोडीची गोड गोड बोलणीं बोलतो ); आणि शेवटा छिद्र रेखून ठेवून बेधडक आंत शिरतो ( नाकाकानांत वगैरे भमकन् जातो, व्यंग पाहून ठेवून निःशंकपणें पीडा देऊं लागतो ); " हा बहागीचा श्लोक ' हितोपदेशा 'त आरंभीं आहे; पण कोठला काय तें कांहीं माहीत नाहीं !

---

**धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे भार्या गृहद्वारि जनः श्मशाने ॥**
**देहश्चितायां परलोकमार्गे कर्मानुगो गच्छति जीव एकः ॥ ८१ ॥**

" मरणसमयीं पैसा भुईंत, गाईम्हशी गोठ्यांतल्या गाठ्यांत, स्त्री घराच्या द्वारापर्यंत, इष्टमित्र स्मशानापर्यंत आणि शरीर चितेवर राहतें; परलोकास जीव एकटाच जाणारा असून त्याबरोबर त्याचें एक कर्म मात्र येतें ! सर्व वैराग्याचें तत्त्व या एका पद्यांत आहे !

---

**अकृत्वा परसंतापमगत्वा खलनम्रताम् ॥**
**अनुसृत्य सतां वर्त्म यत्स्वल्पमपि तद्बहु ॥ ८२ ॥**

" दुसऱ्यास ताप न करता, दुष्टाशीं नमन न वागता आणि सज्जनांच्या मार्गास अनुसरून, जे मिळेल ते थोडें असले तरी लाखाच्या जागीं होय !"

---

थोरांत व हलक्यांत अंतर:—

**सकृत्कंदुकपातेनोत्पतत्यार्यः पतन्नपि ॥**
**तथा पतति मूर्खस्तु मृत्पिंडपतनं यथा ॥ ८३ ॥**

" थोर आहे तो पडला तरी चेंडूसारखा पडून वर उडतो; आणि मूर्ख आहे तो मातीच्या गोळ्यासारखा पडतो. " म्हणजे पहिल्याच्या अंगीं स्थितिस्थापकत्वाचा गुण असल्यामुळें तो जसा पुनः वर उसळतो तसा

बुद्धिमान् पुरुष पुनः अभ्यास चढतो; आणि दुसऱ्याच्या अंगीं तो गुण मुळींच नसल्यामुळे तो जसा फतकन् खालीं पडला कीं पडला, तसा मंदबुद्धि मनुष्य एकदा घसरला कीं घसरला !

---

तवैष विद्रुमच्छायो मरुमार्ग इवाधरः
करोति कस्य नो बाल पिपासाकुलितं मनः ॥ ८४ ॥

" हे कुमारिके ! तुझा अधरोष्ठ मारवाड देशातील मार्गाप्रमाणे विद्रुमच्छाय ( ज्यावर झाडांची सावली नाहीं असा ) आहे, यास्तव त्याच्या योगानें कोणास पान करण्याची इच्छा होत नाहीं ? पक्षीं, विद्रुमच्छाय म्हणजे पोंवळ्याची लाली ज्यावर मारते आहे असा तुझा अधरोष्ठ आहे, तेव्हा तो कोणास पानाविषयीं उत्कंठित करीत नाहीं ? अर्थात् सर्व सहृदय जनास उत्सुक करतो ! "

---

निर्वाणदीपे किमु तैलदानं चौरे गते वा किमु सावधानम् ॥
वयो गते किं वनिताविलासः पया गते किं खलु सेतुबंधः ॥८५॥
वेतालभट्ट.

" दिवा विझाल्यावर आत तेल घालून काय उपयोग ? चोर गल्यावर ' सावधरे सावध ! ' म्हणून ह काटी करून काय फळ ? वय गेल्यावर विषयोपभोगात काय मौज ? पाणी ओसरून गेल्यावर मग पूल तो कशाला ? "

---

युद्धात एकाचे शिर वर उडाले असता हसले, त्यावर कोणी कवि उत्प्रेक्षा करतो—

कंधरां समपहाय कंधरां प्राप्य संयति जहास कस्यचित् ॥
मां किलानमयत स्वपूर्तये दुर्भरात्किमुदराद्वियोगतः ॥ ८६ ॥

" एका पुरुषाचें शिर मानेपासून उडून भुईवर पडलें असता हसले. का ? तर त्यास असे वाटले कीं, आपली भर करण्याकरता जे मला नेहमीं वाकवीत होतें, त्या या दुर्भर उदरापासून माझा आज वियोग झाला. यात काय वाईट झालें ? "

---

**गवीशपत्रो नगजार्तिहारी कुमारतातः शशिखंडमौलि ॥**
**लंकेशसंपूजितपादपद्म पायादनादिः परमेश्वरो नः ॥ ८७ ॥**

" या श्लोकात शिवाचें व विष्णूचेंही वर्णन आहे—" (शिवपक्षीं) बैल ज्याचें वाहन आहे, ज्यानें पार्वतीचे दुःख हरण केलें, जो कार्तिकयाचा बाप. ज्यानें चंद्राची कोर मस्तकावर धारण केली आहे. रावणाने ज्याच्या पद्-कमलाची पूजा केली, असा अनादि शिव आमचे रक्षण करो. "

( दुसरा अर्थ करताना वरील प्रत्येक पदाचें पहिलें पहिलें अक्षर काढायाचें हें शेवटल्या चरणातील ' अनादि ' पदानें सुचविलें आहे. )

" ( विष्णुपक्षीं ) गरुड ज्याचें वाहन आहे. ज्यानें गजेंद्राला ( नक्राच्या नांडातून) सोडविला अथवा कंसाच्या कुवलयापीड हत्तीला मारला, जो मदनाचा पिता, ज्याच्या मुकुटावर मोराचें पीस खोवले आहे, ब्रह्मदेव आणि शिव ज्याच्या पदकमलाची पूजा करतात, असा रमेचा पति—"

---

**चत्वारो धनदायादा धर्माग्निनृपतस्कराः ॥**
**तत्र ज्येष्ठावमानेन त्रय कुप्यंति बांधवाः ॥ ८८ ॥**

" धर्म ( दान करणे ), अग्नि, राजा आणि चोर हे धनाचे चार वाटकरी आहेत. यास्तव याच्या वडील भावाचा ( धर्माचा ) जेव्हां अवमान करावा, तेव्हां बाकचे तिन्ही बंधु कोपतात ! "

---

**दूरेऽपि श्रुत्वा भवदीयकीर्तिं कर्णौ हि तृप्तौ न च चक्षुषी मे ॥**
**तयोर्विवादं परिहर्तुकामः समागतोऽहं तव दर्शनाय ॥ ८९ ॥**

" आपली कीर्ति दूरपासून ऐकली असता माझे कान तृप्त झाले, पण डोळे झाले नाहींत. यास्तव त्याचा तंटा मिटविण्याकरता आपल्या दर्शनार्थ आलों आहे. "

---

**मणिः शाणोल्लीढः समरविजयी हेतिनिहतो**
**मदक्षीणो नागः शरदि सरितः श्यानपुलिनाः ॥**
**कलाशेषचंद्रः सुरतमृदिता बालवनिता**
**तनिम्ना शोभंते गलितविभवाश्चार्थिषु नृपाः ॥ ९० ॥**

भर्तृहरि.

" साहाणेवर घासलेले रत्न, रणात जय पावून आलेला असा घायाळ शूर पुरुष, गंडस्थळापासून होणाऱ्या मदस्रावानें क्षीण झालेला हत्ती, शरदृतूंत ज्यांची वाळवटें सुकलेलीं आहेत अशा नद्या, ज्याची नुसती कोर मात्र उरली आहे असा चंद्र, संभोगानें श्रांत झालेली तरुण स्त्री, आणि अर्थीजनांस दान करून निःस्व झालेले राजे, हीं सर्व आपल्या क्षीणत्वाने अत्यंत रमणीय दिसतात !

---

कोणी भटजी आपल्या पुत्रास उपदेश करतातः—

**परान्नं प्राप्य दुर्बुद्धे मा प्राणेषु दयां कुरु ॥**
**परान्नं दुर्लभं लोके प्राणा जन्मनि जन्मनि ॥ ९१ ॥**

" मुला ! परान्न प्राप्त झालें असतां प्राणावर अगदीं लोभ ठेवीत जाऊं नको, सडकून जेवीत जा ! का तर हे प्राण बऱ्या फुकाचे आहेत, जन्मो-जन्मीं ठेवलेच आहेत पण परान्न तरीक परम दुर्लभ आहे ! "

---

**बालत्वे च मृता माता वृद्धत्वे च मृताः सुताः ॥**
**यौवने च मृता भार्या पातकं किमतः परम् ॥ ९२ ॥**

" जन्म झाला तो आई मेली, तरुणपण आले तो बायको मेली, आणि म्हातारपण झाले तो मुलगे अटपले—यापरते पातक कोणतें ? "

---

**काकः कृष्णः पिकः कृष्णस्त्वभेदः पिककाकयोः ॥**
**वसंते समुपायाते काकः काकः पिकः पिकः ॥ ९३ ॥**

" कावळा काळा आणि कोकिळही काळा, तेव्हां दोघे सारखेच; पण वसंत ऋतु आला कीं, कावळा तो कावळा, आणि कोकिळ तो कोकिळ! " ही अन्योक्ति आहे. समयास मनुष्या मनुष्यांची पारख होते !

---

* वरील श्लोकाचे वामनानें भाषांतर केलें आहे ते येणप्रमाणें.—

शाणोल्लेख जया असा मणि रणीं जो वीर घायाळला ।
संभोगें शिणली अशी नववधू हस्ती न मस्तावला ॥
ज्याची स्वच्छ शरदृतूंत पुलिनें त्या निम्नगा चंद्रही—।
बीजेचा प्रभु पात्रदत्तधन जो हे शोभती सर्वही ॥

इतर नायिकांच्या घरून मध्यरात्रीं कृष्ण आला असता राधेचा व त्याचा संवाद:—

✓ अंगुल्या कः कपाटं प्रहरति कुटिले माधवः किं वसंतो
नो चक्री किं कुलालो न हि धरणिधरः किं द्विजिह्वः फणींद्रः
नाहं घोराहिमर्दी त्वमसि खगपतिर्नो हरिः किं कपींद्रः
इत्येवं गोपकन्याप्रतिवचनजितः पातु वश्चक्रपाणिः ॥ ९४ ॥

" दार कोण बोटांनी वाजवते ?—हे कुटिले ( वरकरे ! ), मी माधव आहे—कोण, वसंत ?—नाहीं, मी चक्री आहे—कोण, कुंभार ?—नाहीं, मी धरणीधर आहें—कोण, द्विजिह्व ( दुसऱ्या अर्थी, चहाड ) सर्प ?—नव्हे, मी घोर सर्पांचें मर्दन करणारा आहें--कोण, तू गरुड आहेस काय?—नाहीं, नाहीं, मी हरि आहे—कोण वानर ?—याप्रमाणे त्या गोपकन्येच्या उत्तरांनीं ज्यास हार खावी लागली, तो चक्रपाणि तुमचें रक्षण करो ! "

---

व्याघ्रे च महदालस्यं सर्पे चैव महद्भयम् ॥
पिशुने चैव दारिद्र्यं तेन तिष्ठंति जंतवः ॥ ९५ ॥

' वाघाचे ठायीं मोठा आळस, सापाचे ठायीं भय, आणि चहाडास दारिद्र्य, ह्या तीन गोष्टी सुदैवेकरून एकेकाचे ठिकाणीं आहेत म्हणूनच सगळ्या जगाचा बचाव आहे ! "

---

कोणा पुरुषास दोन बायका होत्या. त्या दोघीही त्याच्या आवडत्या होत्या. एके समयीं असे झालें. त्या दोघी महालात एकेच जागीं बसल्या असतां हा न कळत आत गेला. तेव्हां आपणावरच विशेष प्रीति आहे असे दोघींस वाटण्याकरता त्या चतुर पुरुषानें ही युक्ति केली:—

दृष्ट्वैकासनसंस्थिते प्रियतमे पश्चादुपेत्यादरा-
देकस्या नयने पिधाय विहितक्रीडानुबंधच्छलः ॥
ईषद्वक्रिमकंधरः सपुलकः प्रेमोल्लसन्मानसा—
मंतर्हासलसत्कपोलफलकां धूर्तोऽपरां चुंबति ॥ ९६ ॥

अमरुशतक.

" दोघींही अत्यंत प्रिय अशा आपल्या स्त्रिया एकेच ठिकाणीं बसल्या आहेत असे पाहून तो मागें गुपचुप गेला, आणि विनोदाच्या मिषानें त्यानें एकीचे डोळे आपल्या हातानीं गपकन् झाकले, आणि अमळ वाकडी मान करून हर्षरोमांचित होत्साता त्या धूर्तानें, प्रेमानें जिचें हृदय उचंबळतें आहे, आणि आतल्या आत हंसल्यानें जिचे गाल प्रफुल्लित झाले आहेत अशा दुसऱ्या स्त्रीचें वळून चुंबन केलें ! "—याप्रमाणें दोघींसही आपापल्या मनांत वाटलें कीं, मीच नवऱ्याची ज्यास्त आवडती आहे !

---

कवि नावेचें आणि चहाडाच्या जिभेचें श्लेषानें वर्णन करतोः—

**नौर्दुर्जनजिव्हा च प्रतिकूलं विसर्पिणी ॥**
**परप्रतारणायैव दारुणा केन निर्मिता ॥ ९७ ॥**

" ( नौकापक्षीं ) प्रत्येक नीराला लागणारी आणि दुसऱ्यास तारून नेण्याकरता लाकडाची केलेली. "

" ( जिव्हापक्षीं ) ज्याच्या त्याच्या मर्माचा उच्चार करत्यानें नहमीं विरुद्ध वागणारी आणि दुसऱ्यास फसवण्याकरता दारुण म्हणजे भयंकर अशी विधात्यानें निर्माण केलेली.

---

**रे रे कोकिल मा भज मौनं किंचिदुदञ्चय पंचमरागम् ॥**
**नो चेत्त्वामिह को जानीते काककदम्बकपिहिते चूते ॥ ९८ ॥**

" रे कोकिळा ! असें मौन धरून बसू नको, पंचमस्वर किंचित् तरी काढ. नाहीं तर कावळ्याच्या मंडळींत या आंब्याच्या झाडावर तुला कोण ओळखतो ! "

---

**करावित्र शरीरस्य नेत्रयोरिव पक्ष्मणी ॥**
**अप्रोक्तमपि कुर्वंति तन्मित्रं मित्रलक्षणम् ॥ ९९ ॥**

" तोच खरा मित्र कीं जो, हात जसे शरिरास, किंवा पापण्या डोळ्यास त्याप्रमाणें केवळ स्वतःच्या प्रेरणेनेंच जो सर्व कामीं उपयोगी पडतो ! "

---

**रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातम्**
**भास्वानुदेष्यति हसिष्यति पद्मजालम् ॥**

**इत्थं विचिंतयति कोशगते द्विरेफे**
**हा हंत हंत नलिनीं गज उज्जहार ॥१००॥**

" रात्र जाईल, चांगली पहाट होईल, सूर्य उगवेल, आणि सर्व कमळे विकसतील,—याप्रमाणे कमळात गुंतलेला भ्रमर जों मनाचे संकल्प करतो आहे तोंच हत्तीने देठासकट ते पार उपटून टाकले ! "

---

**गर्जसि मेघ न यच्छसि तोयं चातकपक्षी व्याकुलितोऽहम् ॥**
**दैवादिह यदि दक्षिणवातः क्व त्वं क्वाहं क्व च जलपातः ॥ १०१**

चातकपक्षी मेघास उद्देशून बोलतो—" हे मेघा ! तू नुसता गर्जतोस मात्र पण वृष्टि करीत नाहींस, हा मी चातकपक्षी पहा कसा तान्हेने व्याकुळ होऊन गेलो आहे ! अरे, विचार कर कीं, जर दैवेकरून इतक्यात दक्षिणेचा वारा सुटला, तर तू कोठें, मी कोठें आणि जलवृष्टि कोठें अशी गत होऊन जाईल ! ही अन्योक्ति आहे. जोवर हाताश आहे तोवर सत्पात्रीं दान केल्याचे श्रेय पदरात घेऊन ठेवावें, का कीं, वैभव केव्हा जाईल याचा काय नेम सांगावा !"

---

**वार्ता च कौतुकवती विमला च विद्या**
**लोकोत्तरः परिमलश्च कुरंगनाभेः ॥**
**तैलस्य बिंदुरिव वारिणि दुर्निवार—**
**मेतत्त्रयं प्रसरति स्वयमेव लोके ॥ १०२ ॥**

" अद्भुतवार्ता, उत्कृष्ट विद्वत्ता, आणि मृगनाभीचा ( कस्तूरीचा ) लोकोत्तर परिमळ, हीं तीन तेलाचा बिंदु जसा पाण्यांत त्याप्रमाणें आपो-आप चोहोंकडे पसरतात ! "

---

**मारस्य मित्रमसि किंच सुधामयूख**
**शंभावपि प्रणयितां प्रकटीकरोषि ॥**
**विश्वासपात्रमसि यद्द्विषतोस्तयोर-**
**प्येतत्तव प्रकृतिशुद्धतनोश्चरित्रम् ॥ १०३ ॥**

" हे चंद्रा ! तूं मदनाचा मित्र आहेस, व तसाच शिवाचाही आव-

डता आहेस. ते परस्पर शत्रु असतांही तूं दोघांचे स्नेहपात्र झाला आहेस हा तुझ्या स्वभावसिद्ध शुद्धपणाचा ( शुभ्रपणाचा पक्षीं, मनाच्या सरळपणाचा ) महिमा होय ! ''

---

**को न याति वशं लोके मुखे पिंडेन पूरितः ॥**
**मृदंगो मुखलेपेन करोति मधुरध्वनिम् ॥ १०४ ॥**

'' तोंड भरले असता कोण या जगांत वश होत नाहीं, पहा. मृदंगसुद्धां तस केल्याने मधुर ध्वनि करायाला लागतो ! ''

---

**काचं मणिं कांचनमेकसूत्रे मुग्धा निबध्नन्ति किमत्र चित्रम् ॥**
**विचारवान्पाणिनिरेकसूत्रे श्वानं युवानं मघवानमाह ॥ १०५ ॥**

'' स्वभावतःच मुग्ध अशा ज्या स्त्रिया त्या काच व सोन्याचे मणी एकाच सूत्रात ( गळसरींत ) ओंवतात त्यात काय आश्चर्य आहे ? पहा कीं. एवढा बुद्धिमान पाणिनि, पण त्यानें सुद्धा एकाच सूत्रात श्वा ( कुत्रा ), युवा ( तरुण ), आणि मघवा ( इंद्र ) या तिघास ओवून दिले ! '' ' श्वयुवमघोनामतद्धिते ' असे पाणिनीचे सूत्र आहे.

---

धनतृष्णेमुळ आपली झालेली विटंबना कोणी याचक वर्णितोः—

**जनस्थाने भ्रांत कनकमृगतृष्णाकुलधिया**
**वचो वैदेहीति प्रतिपदमुदश्रुप्रलपितम् ॥**
**कृतालंकाभर्तुर्वदनपरिपाटीषु रचना**
**मयाऽऽप्तं रामत्व कुशलवसुता नत्वधिगता ॥ १०६ ॥**

'' अहो ! माझ्यात व रामचद्रात काय उणें आहे ? मी त्याची सर्व कृति केली ! कशी ?—( रामपक्षीं ) तो सुवर्णमृगानें लोभावला जाऊन जनस्थानात * त्याच्या मागे फिरला, पुढें सीता नाहींशी झालीसे पाहून खिन्नांतःकरण होत्साता पावलोंपावलीं ' हे जानकी ' असा डोळ्यांत अश्रु

---

* साप्रत ज्यास नाशिक म्हणतात तेथल्या प्रदेशाचें नाव ' जनस्थान.' यथेच सुवर्णमृगाचा वृत्तात घडला हे लोकविश्रुत आहे—या शब्दाचा श्लेषार्थ ' जन–स्थान ' ( लोकांची वस्ती ) हा उघडच आहे

आणून तिचा ध्यासच त्याने घेतला, शेवटीं रावणाची बातमी लागल्यावर त्या लंकापतीशीं घोर संग्राम करून त्याची मस्तकपंक्ति बाणानीं उडविली,—

( कविपक्षीं ) मीही धनाशारूप जे मृगजळ त्याच्या पाठीस लागून धनिकाच्या दारोदार हिंडलों; पावलोपावलीं 'मला द्या' असे दैन्यपूर्वक सद्गद स्वराने ज्या त्यापाशीं म्हटले; आणि दुष्ट व अदत्त अशा धनिकांच्या कपाळावर आपल्या त्रासरूप दर्शनाने आठ्या पाडविल्या,—पण रामास सरतेशेवटीं कुशलवांची माता सीता प्राप्त झाली त्याप्रमाणें मला कुशल-वसुता-( धनसंपन्नता ) मात्र प्राप्त झाली नाहीं ! '

---

राजा कदाचित्संध्यामालोक्य प्राह—

**परिपतति पयोनिधौ पतंगः**

ततो बाणः प्राह—**सरसिरुहामुदरेषु मत्तभृंगः ॥**

ततो महेश्वरः कविः प्राह—**उपवनतरुकोटरे विहगो**

ततः कालिदासः प्राह—**युवतिजनेषु शनैः शनैरनंगः ॥ १०७ ॥**

—भोजप्रबंध.

" एके समयीं भोजराजा संध्याकाळची शोभा पहात असतां म्हणाला—पहा ! पतंग ( सूर्य ) समुद्रात बुडतो आहे—

तेव्हां बाण म्हणाला—कमलाच्या गाभ्यांत मधास लोभावलेला भृंग ( भुंगा ) गुंतून पडतो आहे—

नंतर महेश्वर म्हणतो—बागातील झाडाच्या कोठ्यात विहग ( पक्षी ) जाऊन दडतो आहे—

शेवटीं कालिदास—तरुण स्त्रियाच्या ठायीं अनंग ( मदन ) हळुहळू संचार करतो आहे—"

---

**धनुः पौष्पं मौर्वी मधुकरमयी चंचलदृशाम्**
**दृशां कोणो बाणः सुहृदपि जडात्मा हिमकरः ॥**
**स्वयं चैकोऽनंगः सकलभुवनं व्याकुलयति**
**क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥ १०८ ॥**

" पहा ! मदनाचें धनुष्य काय तर पुष्प,—धनुष्याची दोरी तरी

कशाची ? तर भ्रमरांची;—बाण कोणता ? तर चंचलनेत्री ज्या तरुण स्त्रिया त्यांच्या डोळ्याचा कोपरा ( कटाक्ष ),—साह्यकारी तरी कोणी मोठा समर्थ ?—तो तर जडात्मा ( मंदबुद्धि; पक्षीं, जलमय ) असा चंद्र,—आणि स्वतः काय तो एकटा,—पण इतकें असताही हा अनंग ( ज्याला शरीरही नाहीं ! ) सगळ्या विश्वास व्याकूळ करून सोडतो. तेव्हां थोर जे आहेत त्यांची क्रियासिद्धि त्यांच्या अंगच्या सामर्थ्यावरच केवळ घडते, उपकरणांत म्हणजे त्यांच्या जवळ असणाऱ्या साहित्यांत—( सैन्यांत शस्त्रांत वगैरे ) काय जीव आहे ! ”

---

हाही श्लोक वरच्याच तात्पर्यावर आहे:—

**रथस्यैकं चक्रं भुजगयमिता सप्त तुरगा**
**निरालम्बो मार्गश्चरणविकलः सारथिरपि ॥**
**रविर्यात्येवांतं प्रतिदिनमपारस्य नभसः**
**क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥ १०९ ॥**

“ सूर्याची सामग्री पहा ! रथाला चाक एक; घोडे आडनीडे सात. त्यांचे दोर सुळसुळीत असे साप, मार्ग निराधार, आणि सारथि पाहिला तर व्यंग ( ज्याला माड्या नाहींत असा—थोटा ); पण येवढ्या अडचणी असताही अपरंपार जें आकाश ते प्रतिदिवशीं लंघून सूर्य जातो ! तेव्हां क्रियासिद्धि साधनावर नाहीं, तर मनुष्याच्या अंगच्या हिंमतीवर होत असते ! ”

---

**नपुंसकमिति ज्ञात्वा प्रियायै प्रेषितं मनः ॥**
**तत्तु तत्रैव रमते हताः पाणिनिना वयम् ॥ ११० ॥**

“ मन हे नपुंसक जाणून प्रियेकडे पाठविलें; पण तें कसलें लबाड ! तें तिचे ठायीं रममाण झाले !—तेव्हां पाणिनीनें आम्हांस फसविलें ! ”

---

**दोषाकरोऽपि कुटिलोऽपि कलंकितोऽपि**
**मित्रावसानसमये विहितोदयोऽपि ॥**

चंद्रस्तथाऽपि हरवल्लभतामुपैति
नैवाऽऽश्रितेषु गुणदोषविचारणा स्यात् ॥ १११ ॥

" चद्र हा दोषाकर ( दोषांची खाण; प्रदोषसमयीं ह्म० सध्याकाळीं प्रकाश करणारा ), कुटिल ( दुष्ट; वाकडा ), कलंकित ( दोन्ही अर्थ स्पष्टच आहेत ), आणि मित्राच्या ( पक्षीं, सूर्याच्या ) अंतकाळीं उदय पावणारा, असा आहे; तरी तो शिवास अत्यंत प्रिय आहे. तस्मात् प्रभु जे आहेत ते आपल्या आश्रितांचे गुणदोष पहात नसतात ! "

---

आश्वास्य पर्वतकुलं तपणोष्णतप्त—
मुद्दामदावविधुराणि च काननानि ॥
नानानदीनदशतानि च पूरयित्वा
रिक्तोऽसि यज्जलद सैव तवोत्तमश्रीः ॥ ११२ ॥

" हे मेघा ! सूर्याच्या उन्हानं तापलेले पर्वत व वणव्याने पेटलेलीं रानें यांची पीडा हरण करून आणि शेंकडों नद्या न नदही भरून टाकून तू रिक्त झालास, हेच तुझ्या वैभवास अत्यंत भूषण झालें ! " ही अन्योक्ति आहे; व हिचा गर्भित अर्थही उघड आहे.

---

पोपट राजाची स्तुति करतो:—

स्तनयुगमश्रुस्नातं समीपतरवर्तिहृदयशोकाग्नेः ॥
चरति विमुक्ताहारं व्रतमिव भवतो रिपुस्त्रीणाम् ११३ ॥

कादंबरी.

" हे राजा ! तुझ्या शत्रूच्या स्त्रियांचे स्तनयुग अश्रूंनीं स्नात होत्साते व विमुक्ताहार ( त्यक्त भोजन; पक्षीं मुक्ताहाररहित ) होऊन शोकाग्नीच्या जवळ व्रताचरणच करतें आहे काय असं वाटतं ! "

---

साधारणतरुबुद्ध्या न मया रचितस्तवाऽऽलवालोऽपि ॥
लज्जयसि मामिदानीं चंपक भुवनाधिवासितैं कुसुमैः ॥ ११४ ॥

" हे चाफ्या ! तू कोणी यःकश्चित् वृक्ष असशील अशा समजुतीनें मीं

तुला नुसते आळेही रचले नाहीं. पण तोच तू आतां घरभर वास भर-णाऱ्या फुलांनीं मला लाजवतो आहेस ! " ही अन्योक्ति आहे. मंद दिस-ल्यावरून वगैरे ज्याची आपण अवगणना केली असतां जो पुढे नांवलौकि-कास आला अशा चाकरास, शिष्यास वगैरेही लागते.

---

कोणी पांथ एका पाणपोईवर पाणी प्यावयास आला असता तेथे एका तरुणीस पाहून म्हणतो:—

कस्येयं तरुणि प्रपा पथिक नः किं पेयमस्यां पयो
धेनोर्वा उत माहिषं बधिर रे वारः कथं मंगल. ॥
सोमो वाऽथ शनैश्चरोऽमृतमिदं तत्तेऽधरं दृश्यते
श्रीमत्पांथ विलाससुंदर सखे यद्रोचते तत्पिब ॥ ११५ ॥

" हे तरुणी ! ही पोई कोणाची आहे ?—हे पांथा, आमची.— हींत पिण्यास काय आहे ?—पय.—गाईचें कीं म्हशीचें ?—रे बहिऱ्या, वार: ( उदक ).—मंगळवार का सोमवार कीं शनवार ?—नाहीं नाहीं, हें अमृत आहे.—कोणते ? तुझ्या अधराचे ठायीं दिसत आहे तें काय ?—हे चतुर व सुंदर पांथा, तुला जे हवे ते पी ! "

---

अमंत्रमक्षरं नास्ति नास्ति मूलमनौषधम् ॥
अयोग्य पुरुषो नास्ति योजकस्तत्र दुर्लभः ॥ ११६ ॥

" कोणतेही अक्षर मंत्राखेरीज नाहीं, मुळी औषधाखेरीज नाहीं, किंवा पुरुष योग्यतेखेरीज नाहीं ! योजक मात्र पाहिजे ! "

---

कमलासन-कमलेक्षण कमलारिकिरीट-कमलभृद्वाहै ।
नुतपदकमला कमला करधृतकमला करोतु मे कमलम् ॥११७॥

" महादेव, विष्णु, शिव आणि वरुण ( ? ) हे जिच्या पदकमलाची स्तुति करतात, आणि जिच्या हातांत कमल आहे, अशी लक्ष्मी माझें पुष्कळ कल्याण करो." या आर्येत सर्वत्र अनुप्रास आहे."

---

कवि रामायणाचें आणि दीपदिनाचें ( दिवाळीचें ) साम्य वर्णन करतो:—

**उपशमितमेघनादं प्रज्वलितदशाननं रमितरामम् ॥**
**रामायणमिव सुभगं दीपदिनं हरतु वो दुरितम् ॥ ॥११८**

"( रामायणपक्षीं ) ज्या काव्यांत मेघनादाचा ( इंद्रजिताचा ) उपशम ( अंत ) आहे, रावण क्रोधायमान झाला आहे, आणि राम आनंदित झाला आहे:—

( दीपदिनपक्षीं ) पावसाळा नुकताच गेल्यामुळें मेघाचा गडगडाट ज्यांत नाहींसा झाला आहे, वातींच्या दशा ( टोकें ) ज्यांत प्रज्वलित झाल्या आहेत. स्त्रियांस ज्यांत मोठा उत्सव प्राप्त होतो,—असा हा सण तुमच्या पातकाचें हरण करो !"

---

पतीच्या विरहामुळें उदास झालेल्या एका स्त्रीस तिची सखी विचारते:—

**आहारे विरतिः समस्तविषयग्रासे निवृत्तिः परा**
**नासाग्रे नयनं तदेतदपरं यच्चैकतानं मनः ॥**
**मौनं चेदमिदं च शून्यमधुना यद्विश्वमाभाति ते**
**तद् ब्रूयाः सखि योगिनी किमसि भो किंवा वियोगिन्यसि ॥११९॥**

"हे सखी ! तू जेवण टाकलेंस, सर्व विषयापासून अत्यंत पराङ्मुख झालीस, नाकावर दृष्टि लावून बसली आहेस, तसेंच तुझें मन केवळ एकाग्र झालेसें दिसत आहे मौन धारण केलें आहेस, सर्व विश्व तुला शून्य भासतें आहे,—तेव्हां सांग तू योगिनी ( योगधारण केलेली ) आहेस कीं वियोगिनी ( विरहिणी ) आहेस !"

---

कवि कोण्या रूपवतीचें वर्णन करतो:—

**किमिंदुः किं पद्मं किमु मुकुरबिंबं किमु मुखम्**
**किमब्जे किं मीनौ किमु मदनबाणौ किमु दृशौ ॥**
**खगौ वा गुच्छौ वा कनककलशौ वा किमु कुचौ**
**तडिद्वा तारा वा कनकलतिका वा किमबला १२० ॥**

"हा चंद्र आहे, कीं कमल आहे, कीं आरसा आहे, कीं तोंड आहे ?

हीं कमलं आहेत, कीं मासे आहेत, का मदनाचे बाण आहेत, कां डोळे आहेत !—तसेंच हे कोण ?

चक्रवाक, फुलांचे झेडे, सुवर्णाचे कलश, कीं कुच, !—तशीच ही वीज आहे काय ! कीं चांदणी, कीं सोन्याची वेली, कां स्त्री ! ''

---

**श्रुतिलंघकृतप्रयासयोर्मलिनाभ्यंतरयोरधीरयोः ॥**
**स्मृतिलोपपरत्वमेतयोरुचितं लोचनयोर्मृगीदृशः ॥ १२१ ॥**

" जे डोळे श्रुतिलंघनाविषयीं ( कर्णप्रदेशापर्यंत पोचण्याविषयीं; वेदोल्लंघनाविषयीं ) उद्युक्त आहेत, ज्यांचे अभ्यंतर मलीन आहे ( एके अर्थी-काजळानें; दुसऱ्या अर्थी जे मलिनान्तःकरण आहेत ), जे अधीर आहेत ( चंचल, विवेकशून्य ), ते स्मृतीचा ( स्मरणाचा शास्त्रादिकांचा ) लोप करतात हे ठीकच आहे '

---

**विद्वज्जनसभामध्ये नारीप्रथमसंगमे ॥**
**रणे रिपुसमाकीर्णे को न कातरतां व्रजेत् ॥ १२२ ॥**

' पंडिताच्या समाजात, स्त्रीच्या प्राथमिक समागमाचे वेळीं, आणि रणांगणांत शत्रूशीं पहिल्यानें गाठ पडली असता कोणाचा ऊर धडधडत नाहीं ! '

---

कोणी कवि स्वानुभूत एक चमत्कारिक वृत्तांत वर्णितो:—

**अकस्मादागारे रहसि मिलिताऽपि प्रियतमा**
**समाश्लिष्टा नागंतुकपिशुनभीतेन मनसा ॥**
**अथैषा मामज्ञं निपुणमथ सावज्ञमथवा**
**न जाने किं मेने प्रतिपलमतस्ताम्यति मनः ॥ १२३ ॥**

" माझ्या प्रियेची आणि माझी अकस्मात् एकीकडे गाठ पडली असताही मीं तीस आलिंगिली नाही, का कीं न जाणों इतक्यात कोणी आलें तर तें सर्वांस कळेल असा मला धाक वाटला ! पण आता माझ्या मनाला मारखी चुरचुर लागून गेली आहे कीं, त्या माझ्या कृतीवरून ती मला अज्ञान समजली, पक्का समजली, कीं तिची मीं अवज्ञा केली असें तीस वाटलें, कोण जाणे ! ''

**पातु वो निकषग्रावा मतिहेम्नः सरस्वती ॥**
**प्राज्ञेतरपरिच्छेदं वचसैव करोति या ॥ १२४ ॥**

' मति हेच कोणी सोनें हें जिच्यावर तेंव्हांच कसले जाऊन एका वचनांतच जी शाहाणा व मूर्ख याचा भेद कळवते. त्या सरस्वतीस नमन असो ! ''

---

कोणी कवि वेणीवर उत्प्रेक्षा करतो:—

**वेणी श्यामा भुजंगीयं नितंबान्मस्तकं गता ॥**
**वक्त्रचंद्रसुधां लेढुं सांद्रसिंदूरजिह्वया ॥ १२५ ॥**

'' मला वाटते, ही वेणी काळी सर्पीण आहे ! आणि ही मुखचंद्राच्या ठायीं असणारें जे अमृत तें आपल्या सिंदूररूप लाल जिभेनें चाटण्याकरनाच नितंबस्थलापासून वर गेली आहे काय ! '' वेणीचा शेवटाशीं निमुळता होत गेलेला आकार, पेडाची वीण, आणि दुसऱ्या शेवटाशीं होत जाणारा पसरटपणा, तसाच काळा रंग, हे सर्व वरील उत्प्रेक्षेचे अवयव होत; आणि बायका भांगांत शेंदूर घालतात यावरही वरील श्लोकांत लक्ष्य आहे.

---

कोणी भक्त परमेश्वरास म्हणतो:—

**भूमौ स्खलितपादानां भूमिरेवावलंबनम् ॥**
**त्वयि जातापराधानां त्वमेव शरणं मम ॥ १२६ ॥**

हे देवा ! भूमीवर पदस्खलन झालें असतां म्हणजे पाय अडखळला असतां त्या मनुष्यास सावरणारी पुन: भूमीच, त्याचप्रमाणें आम्हां मनुष्याच्या हातून अपराध झाले तरी तुझ्याकडेच पुन: आम्हास येणें आहे, कारण तुजशिवाय दुसरा कोण त्राता आहे ? ''

---

कोणी विषयलंपट पुरुष वृद्धत्वावस्था आली असतां खेद प्रदर्शित करतो:—

**दंतावलिर्विगलिता गलितं शरीरम्**
**केशाश्च फेनधवला नहि मे विषादः ॥**

**एणीदृशो युवतय पथि मां विलोक्य**
**तातेति भाषणपरा शतकुंतघातः ॥१२७॥**

" माझे दात पडले, शरीर थकले, केस फेसाप्रमाणे पांढरे झाले; इत्यादि गोष्टींचा मला खेद वाटत नाहीं.—परंतु हरिणनयना ज्या तरुण स्त्रिया त्या मला वाटेत आड आल्या असता ' बाबा ' शब्दानें मला दूर होण्यास वगैरे सांगतात, तो शब्द मला शंभर भाल्याप्रमाणें टोंचतो ! "

---

**ज्वलति चलितेंधनोऽग्निर्विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते ॥**
**प्राय स्वं महिमानं क्षोभात्प्रतिपद्यते हि जनः ॥ १२८ ॥**

शाकुंतलम्.

" सर्पण चाळवले असता अग्नि पेट घेतो, सांप डवचल्याबरोबर फडा काढतो. सारांश; तेजस्वी जे असतात त्यांस राग आणला असतां ते आपला प्रभाव तत्क्षणीं प्रगट करतात. "

---

कोणी नायिका नायकावर रुसून तिनें गळ्यातील हारचीर पार तोडून फेकून दिले. तेव्हा तिची एक सखी तिच्या पायाशीं पडलेल्या हारास बाह्यात्कारी उद्देशून बोलून श्लेषोक्तीनें तिच्या वल्लभाविषयीं तीस सांगतेः—

**असद्वृत्तो नायं न च वरगुणैरेष रहितः**
**प्रियो मुक्ताहारस्तव चरणमूले निपतितः ॥**
**गृहाणैनं भद्रे व्रजतु तव कंठप्रणयिता-**
**मुपायो नास्त्यन्यस्तव हृदयतापोपशमने ॥ १२९॥**

" अगे सखि ! हा सद्वृत्त ( वाटोळा, पक्षीं, सुशील ) नाहींसा नाहीं; तसाच वरगुणानीं ( चांगल्या दोऱ्यानीं; पक्षीं, वरास जे गुण असावे त्यानीं )हीं हा कमी नाहीं, हा तुझा मुक्ताहार तुझ्या पायाशीं पडला आहे ( पक्षीं, तुझा प्रिय त्यक्तभोजन होत्साता तुझ्या पाया पडतो आहे ); तर हे गडे, याला जवळ घे, आणि हा तुझ्या गळा पडो; कारण तुझ्या हृदयाचा ताप शमण्यास दुसरा उपाय नाहीं ! "

---

कोणी कवि वर्षाकाळीं फुगलेल्या नदीस उद्देशून म्हणतोः—

**यास्यति जलधरसमयस्तव च समृद्धिर्लघीयसी भविता ॥**
**तटिनि तटद्रुमपातनपातकमेकं चिरस्थायी ॥ १३० ॥**

" हे नदि ! वर्षाकाळ निघून जाईल, व तसेंच तुझें हे वैभवही फार टिकेलसें नाहीं, पण तीरावरील झाडास तू उपटून टाकिलेस हें पातक मात्र तुला चिरकाळ जडले ! " ही अर्थातच अन्योक्ति आहे.

---

**केशाः संयमिनः श्रुतेरपि परं पारं गते लोचने**
**अंतर्वक्त्रमपि स्वभावशुचिभिः कीर्णं द्विजानां गणैः ॥**
**मुक्तानां सतताधिवाससरुचिरं वक्षोजकुंभद्वय-**
**मित्थं तन्वि वपुः प्रशांतमपि ते क्षोभं करोत्येव नः ॥ १३१ ॥**

भर्तृहरिः

" हे तन्वि ! तुझे केस संयमी ( बांधलेले, पक्षीं, जितेंद्रिय ) आहेत, तुझे डोळे श्रुतींच्या ( कर्णांच्या; वेदांच्या )ही पार गेले आहेत, तुझ्या मुखाचे ठायीं स्वभावतःच स्वच्छ ( शुभ्र, निष्पाप ) अशी द्विजपंक्ति ( दोन्ही अर्थ प्रसिद्धच आहेत ) आहे; आणि तुझें स्तनद्वय मुक्तांच्या ( मोत्यांच्या पक्षीं, जीवन्मुक्त योग्यांच्या ) निरंतर सहवासानें पवित्र झालेलें आहे,— मग यवढी शांतीची सामग्री जवळ असताही तुझें शरीर आमच्या मनास क्षुब्ध का बरें करतें ? " *

---

* वरील श्लोकाचें प्राकृत भाषांतर पंडितांनीं असें केलें आहे —

मोठे संयमशील केश नयन श्रुत्यंतही पावले ।
अंतर्वक्त्र सुनिर्मल द्विजगणीं जे सर्वदा सेविले ॥
मुक्तांचा सतताधिवास हृदयीं सद्वृत्तनाही स्तनीं ।
ऐसें शांत शरीर ताप करितें कां सांग वो कामिनी ॥

तिसऱ्या चरणाच्या शेवटीं भाषांतरकारानें नवाच श्लेष आपण जोडून चातुर्यानें घालून दिला आहे हें मार्मिक वाचणाराच्या लक्षांत येईलच !

**श्रीरामे मृगयां गतेऽपि धनुषा बाणे समारोपितेऽ-**
**प्याकर्णांतगतेऽपि मुष्टिगलितेऽप्येनांगलग्नेऽपि च ॥**
**न त्रस्तं न पलायितं न चकितं नोत्कंपितं नोद्धुतम्**
**मृग्या मद्वशगं करोति दयितं कामोऽयमित्याशया ॥ १३२ ॥**

" राम मृगयेस गेला असता त्यानें धनुष्यावर बाण ठेवला, कर्णप्रदेशापर्यंत ओढला, आणि एका मृगावर लक्ष्य धरून तो त्याच्या अंगावर सोडून दिला;—पण इतके केले तरी ही त्याची स्त्री हरिणी भ्याली नाहीं, पळाली नाहीं, चकित झाली नाहीं, आणि कंपही पावली नाहीं. का ? तर तीस अशी भ्रांति झाली कीं, हा मदनच आहे; व माझ्या स्वाधीन यास करण्याकरितां हा यावर बाण टाकतो आहे ! '

---

कोणी कवि लक्ष्मीच्या दोषास अनुलक्षून म्हणतो:---

**चांचल्यमुच्चैः श्रवसस्तुरगा-**
**त्कौटिल्यमिंदोर्विषतो विमोहः ॥**
**इति श्रियाऽशिक्षि सहोदरेभ्यो**
**न वेद्मि कस्माद् गुणवद्विरोधः ॥ १३३ ॥**

" लक्ष्मीनें आपल्या भावडांपासून एक एक गुण घेतला---उच्चैःश्रवा नामक अश्वापासून चापल्य, चंद्रापासून कुटिलपणा, आणि विषापासून उन्मादपणा पण गुणिजनाशीं विरोध करण्याचा गुण ती कोणापासून शिकली हे कळत नाहीं ! '

---

**विलासिनीं कांचनपट्टिकायां पाटीरपंकैर्विरही विलिख्य ॥**
**तस्याः कपोले व्यलिखत् पवर्गं ओष्ठे तवर्गं चरणे टवर्गम् १३४**

" कोणी विरही पुरुषानें सोन्याच्या चित्रफलावर चंदनाच्या रसानें आपल्या प्रियेची तजबीर काढून तिच्या गालावर पवर्ग, अधरोष्ठावर तवर्ग आणि पायावर टवर्ग याप्रमाणे वर्ण लिहिले.'

अभिप्राय स्पष्टच आहे कीं तिन्ही स्थाने अनुक्रमे करून ओष्ठ्य, दंत्य आणि मूर्धन्य होत! अर्थात ते ते अवयव त्या त्या ठिकाणीं अर्पण केल्याचें सुचवतो.

राम विरहातुर होत्साता पूर्वस्थिति आठवून म्हणतो:--

**हारो नारोपितः कंठे मया विश्लेषभीरुणा ॥**
**इदानीमंतरे जाताः सरित्सागरदुर्गमा ॥ १३५ ॥**

हनुमन्नाटक.

ज्या मला पूर्वी विरह इतका सहन होत नसे की गळ्यातला हार देखील मला शत्रूसारखा वाटे त्याच माझ्यामध्ये आणि सीतेमध्ये आता नद्या, सागर, पर्वत इत्यादि झाले आहेत !

---

**मनस्वी म्रियते काम कार्पण्य न तु गच्छति ॥**
**अपि निर्वाणमायाति नानलो याति शीतताम् ॥ १३६ ॥**

" मनस्वी म्हणजे थोर मनाचे जे असतात ते मरून जातात, पण दैन्य कधींही पत्करीत नाहींत. पहा ! अग्नि विझून जातो, पण कधीं थंड झाला आहे काय ? "

---

**न सध्यां संधत्ते नियमितनिमाजां न कुरुते**
**न वा मौंजीबंधं कलयति न वा सौनतविधिम् ॥**
**न रोजां जानीते व्रतमपि हरेर्नैव कुरुते**
**न काशी मक्का वा शिव शिव न हिंदुर्न यवनः ॥ १३७ ॥**

सध्या करित नाहीं व निमाजही पढत नाहीं, ज्याला मुंजही नको व सुंतेचीही गरज नाहीं; रोजा माहीत नाहीं व एकादशीही करीत नाहीं; जो काशीलाही मानीत नाहीं आणि मक्केलाही विचारीत नाहीं;--एकूण हर हर ! जो धड हिंदूही नाहीं आणि मुसलमानही नाहीं !*

---

* वरील पद्यावरून हल्लीं प्रमाणेच गेल्या शतकांत धर्माच्या संबधानें वरील चलबिचल झाली असावी असें दिसतें. म्हणजे अलीकडे तीस चाळीस वर्षे ख्रिस्त प्रभूचा प्रभाव जसा गाजत आहे, तसाच यापूर्वी मक्केच्या पैगंबराचाही चोहोंकडे गाजत असावा असें अनुमान होतें. वरील श्लोकांतील वर्णन सध्याच्या काळीं शेकडो मनुष्यास थोडासा फरक केला असता पुरतेपणीं लागेल. कित्येकांची तर आत्म्याच्या तारणाविषयीं अशी जबरदस्त आतुरता दृष्टीस पडते की, सकाळीं विकच्छ होऊन मुल्लासाहेबाबरोबर निमाजाचें पठण, दुपारीं पढरीच्या पताकेसमोर तुकाराम महाराजाचा गाथा, तिसरे प्रहरीं योगाभ्यास, सायंकाळीं पाळंध्यांची सुरस पदें, आणि रात्रीं वेळेनुसार ईश्वरपुत्रशरीरभोजन ! तेव्हा एकंदर मतलब काय की, सरतेशेवटीं ईश्वर ज्या द्वारानें हांक मारील तिकडून आत घुसायला तयार !

दुर्योधनमित्र कर्ण आणि शीत यांवर श्लेषः—

**कन्याप्रसूतस्य धनुष्प्रसंगादगाधिकासादितविक्रमस्य ॥**
**धनंजयाधीनपराभवस्य शीतस्य कर्णस्य च को विशेषः १३८**

" कर्णात आणि शीतात काय भेद आहे? दोघाचाही जन्म कन्येपासून ( कुंतीपासून—कन्याराशीपासून ), दोघे धनुःप्रसंगाने ( धनुष्याच्या योगाने—धनुराशीमुळे ) अगाधिकासादितविक्रम ( अगाच्या ठिकाणी म्ह० शरिराच्या ठिकाणी मिळविला आहे पराक्रम ज्यानीं व अंगदेशात मिळविला आहे पराक्रम ज्यानीं ) असे आहेत. आणि दोघाचाही पराजय धनंजयाच्या ( अर्जुनाच्या—अग्नीच्या ) अधीन ! "

---

**परवादे दशवदनः पररन्ध्रनिरीक्षणे सहस्राक्ष ॥**
**सद्वृत्तवृत्तिहरणे बाहुसहस्रार्जुनः पिशुनः ॥ १३९ ॥**

"खल हा दुसऱ्याची निंदा करताना दहा मुखाचा रावण बनतो, दुसऱ्याचें उणे पाहण्यात सहस्रनेत्र इंद्र होतो, आणि सज्जनाचे द्रव्यहरण करतांना कार्तवीर्याप्रमाणें हजार बाहु धारण करतो ! "

---

कोणी विनोदी कवि जावयाचे आणि ग्रहाचें साम्य वर्णितोः—

**सदा वक्रः सदा क्रूरः सदा पूजामपेक्षते ॥**
**कन्याराशिस्थितो नित्यं जामाता दशमो ग्रहः ॥ १४० ॥**

" जामात हा दहावा ग्रहच होय. कसा? नेहमीं वक्र म्हणजे आपल्या कुर्यात असणारा, नेहमीं रुसलला, नेहमीं समजाविला पाहिजे! आता दोहोंत एक मात्र मोठा भेद आहे:—ग्रह नेहमीं राशीवरून चळतो, पण हे बोवा कन्याराशीस धरून जे एकदा बसतात ते मग हालत नाहींत ! "

---

**जले तैलं खले गुह्यं पात्रे दानं मनागपि ॥**
**प्राज्ञे शास्त्रं स्वयं याति विस्तारं वस्तुशक्तितः ॥ १४१ ॥**

" पाण्याचे ठायीं तेल, खलाचे ठायीं एकादी गुप्त गोष्ट, सत्पात्राचे ठायीं केलेलें अल्पही दान, विचक्षण शिष्यास शिकविलेले शास्त्र, हीं सर्व केवळ स्वभावतःच वस्तुमाहात्म्यास्तव विस्तार पावतात ! "

---

**वरं दरिद्रः श्रुतिशास्त्रपारगो**
**न चापि मूर्खो बहुरत्नसंयुतः ॥**
**सुलोचना जीर्णपटाऽपि शोभते**
**न नेत्रहीना कनकैरलंकृता ॥ १४२ ॥**

" वेदशास्त्रात पारंगत झालेला असा दरिद्री असला तरी बरा, पण जडावाचे दागिने घातलेलाही मूर्ख नको; पहा कीं, जिचे डोळे सुरेख आहेत अशी सुंदर स्त्री जीर्ण वस्त्र नेसली असताही शोभते, पण जिला डोळे नाहींत ती सोन्यानें मढवून टाकली असताहीं शोभत नाहीं. "

---

**आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यशृंखला ॥**
**यया बद्धा प्रधावंति मुक्तास्तिष्ठंति पंगुवत् ॥ १४३ ॥**

" आशा ही कोणी आश्चर्यकारक शृंखला होय ! कशी ? तर तिने जे बद्ध होतात ते धावूं लागतात, आणि तिजपासून मुक्त जे झाले ते पांगळ्यासारखे जागच्या जागीं बसतात ! " म्हणजे जे द्रव्याच्या आशेला गुतलेले असतात त्यांस नेहमीं यातायात करावी लागते आणि जे निरिच्छ असतात ते खुशाल स्वातन्त्र्याने वागतात.

---

कवि लक्ष्मीचा प्रभाव वर्णन करतोः—

**आलस्यं स्थिरतामुपैति भजते चापल्यमुद्योगिताम्**
**मूकत्वं मितभाषितां वितनुते मौढ्यं भवेदार्जवम् ॥**
**पात्रापात्रविचारणाविरहिता यच्छत्युदारात्मताम्**
**मातर्लक्ष्मि तव प्रसादवशतो दोषा अपि स्युर्गुणाः ॥ १४४ ॥**

" श्रीमंताचे ठायीं आळस असला तर तो स्थैर्य म्ह० गंभीरपणा हे नांव पावतो; चापल्य म्हणजे रिकाम्या उलाढाली करण्याचा असला, तर त्यास उद्योग हें नांव प्राप्त होतें; मुखदुर्बळपणा मितभाषीपणा होतो; मूर्खत्व सरळवृत्ति जाणून गणलें जातें; आणि पात्रापात्रविचारशून्यता या दोषास मनाचें औदार्य असें रूप लोक देतात. साराश, हे माते लक्ष्मि ! तुझ्या प्रसादेंकरून दोषांचेही गुण होत आहेत ! "

---

**युक्तोऽसि भुवनभारे मा वक्रां वितनु कंधरां शेष ॥**
**त्वय्येकास्मिन्कष्ट सुखितानि भवति भुवनानि ॥ १४५ ॥**

" हे शेषा ! तुझ्यावर अवघ्या भुवनाचा भार आहे, तर तू आपली मान भारावल्याचे दु:ख मानून ती वांकडी करू नको. का तर, तुला एकट्याला कष्ट होऊन त्यावर सगळ्या जगतास सुख होत आहे !" ही अन्योक्ति होय.

---

**रविरपि न दहति तादृग्यादृक्संतपति वालुकानिकरः ॥**
**अन्यस्माल्लब्धपद प्रायो नीचोऽपि दुःसहो भवति ॥ १४६ ॥**

" पहा काय चमत्कार आहे ! प्रत्यक्ष सूर्यापासूनही इतका ताप होत नाहीं, पण या वाळूत पायाला चटके बसताहेत ! तस्मात् नीच ( व्यर्थी ) जो आहे त्यास दुसऱ्यापासून अधिकार मिळाला असतां मूळच्या धन्याहूनही तो दुःसह होतो ! "

---

ज्यास कोणाशीं निरंतर स्नेह ठेवावयाचा असेल त्यानें त्याशीं पुढील तीन गोष्टी करू नयेत---

**वाग्वादश्चार्थसंबधः परोक्षे दारभाषणम् ॥**
**यदिच्छेद्विपुलां मैत्रीं त्रीणि तत्र न कारयेत् ॥ १४७ ॥**

एक वाग्वाद म्हणजे वाद घेऊन भांडत बसणें;दुसरी,---अर्थसबंध म्हणजे पैशाचें देणेंघेणें करणे, आणि तिसरी त्याच्या अपरोक्ष त्याच्या बायकोशीं बोलणे !

---

कोणी भाट राजाचा स्तव करतो:-

**त्वत्कीर्तिमौक्तिकफलानि गुणैस्त्वदीयैः**
**संदर्भितु विबुधवामदृशः प्रवृत्ताः ॥**
**नांतो गुणेषु न च कीर्तिषु रंध्रलेशो**
**हारो न जात इति ताश्च मिथो हसंति ॥ १४८॥**

" हे राजा ! तुझी कीर्ति हींच कोणी मुक्ताफळें तीं तुझ्या गुणाशीं ( दोन्हीं अर्थ प्रसिद्ध आहेत ) ओंवण्यास देवांगना लागल्या. पण गुण हातीं

घेऊन पहातात तो त्यास अंतच नाहीं, आणि कीर्तिस लहानही रध्र नाहीं, हें पाहून हार करावा तरी कसा असें म्हणून आपल्या आपल्यांतच त्या हसू लागल्या !"

---

विरही राम चद्राची निर्भर्त्सना करतोः—

**मंदरेण मथितोऽसि न पापिन्ग्रासितोऽसि तमसा न दुरात्मन् ॥**
**त्वां शरेण शतधा परिनिन्ये जानकीमुखसमो यदि न स्या ॥१४९॥**

" हनुमन्नाटकम्"

" हे दुष्टा ! तुला मदरपर्वतानें घुसळून कसा टाकला नाहीं व राहूने कसा गिळला नाहीं ! अरे, जर तूं जानकीच्या मुखासारखा नसतास तर तुला या क्षणीं शराने शतधा विदीर्ण करून टाकला असता ! "

---

**कांतं वक्ति कपोतिकाऽऽकुलतया नाथांतकालोऽद्य वाम्**
**व्याधोऽधो धृतचापसज्जितशरः श्येन. परिभ्राम्यति ॥**
**इत्थं सत्यहिना स दुष्ट इषुणा श्येनोऽपि तेनाऽऽहत**
**स्तूर्णं तौ तु यमालय प्रति गतौ दैवी विचित्रा गति ॥ १५० ॥**

" कपोतिका आपल्या नवऱ्यास म्हणते, ' हे प्रिया ! आतां या सकटातून आपण वाचत नाहीं. पहा तो पारधी धनुष्यास बाण लावून खालीं उभा आहे; आणि उडून जावे तर ससाणा भोंवताली भरा‍या मारतो आहे ! ' असें ती बोलते आहे तो व्याधास सर्पदश झाला आणि त्यामुळें त्याचा नेम चुकून ससाण्यासच बाण लागला. याप्रमाणें ते दोघे तत्क्षणीं यमसदनास जाऊन तो पक्ष्याचा बिचारा जोडा भयमुक्त होऊन आनदाने उडून गेला ! तस्मात् दैवगति विचित्र !"

---

**हृदयानि सतामेव कठिनानीति मे मतिः ॥**
**खलवाग्विशिखैस्तीक्ष्णैर्भिद्यंते न मनाग्यत ॥ १५१ ॥**

" सज्जनाचींच अंतःकरणें अत्यंत कठोर असें मला वाटते, कां तर दुष्टांच्या तीक्ष्ण वाग्बाणांनींही जीं यत्किंचितही भग पावत नाहींत !"

---

**गंगा पापं शशी तापं दैन्यं कल्पतरुस्तथा ॥**
**पापं तापं च दैन्यं च सद्यः साधुसमागमात् ॥ १५२ ॥**

"सज्जनाच्या समागमाचे माहात्म्यः—" गंगा पातकाचे हरण करते, चंद्र ताप घालवितो, आणि कल्पवृक्ष दारिद्र्य नाहींसे करतो; पण साधूंचा समागम होताच पाप, ताप आणि दैन्य हीं तिन्ही दूर होतात !"

---

कोणी कवि बाह्यात्कारी उसास बोलून अन्योक्तीने राजास म्हणतोः—

**कांतोऽसि नित्यमधुरोऽसि रसाकुलोऽसि**
**किंचासि पंचशरकार्मुकमद्वितीयम् ॥**
**इक्षो तवास्ति सकलं परमेकमूनम्**
**यत्सेवितो भजसि नीरसतां क्रमेण ॥ १५३ ॥**

" हे उसा ! तूं देखणा, नेहमीं मधुर व रसानें परिपूर्ण असा असतोस, फार काय सांगावें, तूच कामदेवाचें एक धनुष्य होस. पण तुझे ठायीं एक मात्र उणें आहे कीं, उत्तरोत्तर नीरस (रसहीन–आदरशून्य) होत जातोस!"

---

नायक नायिकेस म्हणतोः—

**अनधिगतमनोरथस्य पूर्वं शतगुणितेव गता मम त्रियामा॥**
**यदि तु तव समागमे तथैव प्रसरति सुभ्रु तत कृती भवेयम् ॥१५४॥**

विक्रमोर्वशीय.

" हे सुभ्रु ! अप्राप्त मनोरथ असता माझी रात्र जशी शतगुणित झाल्याप्रमाणे जात असे, त्याचप्रमाणें तुझ्या समागमातही ती जाईल, तर मग माझ्यासारखा धन्य कोण ! "

---

**रे रे घरट्ट मा रोदीः कं कं न भ्रामयंत्यमूः ॥**
**कटाक्षवीक्षणादेव कराकृष्टस्य का कथा ॥ १५५ ॥**

" रे रहाटा ! या स्त्रिया केवळ कटाक्षप्रेक्षणानेही कोणास भ्रमण करायास लावीत नाहींत ? मग तुला तर ही करानीं ओढते आहे; तेव्हा तुझी दुर्दशा तर काय पुसावी ! तूं उगीच कशाला दीनवाणा आक्रोश करतोस!"

मूर्खस्य पंच चिन्हानि गर्वी दुर्वचनी तथा ॥
हठी चाप्रियवादी च परोक्तं नैव मन्यते ॥ १५६ ॥

" मूर्खाची ही पाच चिन्हे आहेतः—गर्व, दुर्भाषण, हटवाद, कटु-
ालाप, आणि कोणाचे ऐकायाचे म्हणून नाही ! "

---

ंदीवराक्ष्या. स्फुटविद्रुमौष्ठ्याः संकेतमुद्दिश्य वने चरंत्या. ॥
चौरा. समस्ताभरणानि हृत्वा नासामणिं नापहरंति चित्रम् ॥१५७॥

" कोणी स्त्री वनात भेटण्याविषयी आपल्या वल्लभाशी सकेत करून
तेकडे जात होती. या स्त्रीचे डोळे नीलकमलासारखे काळे भोर होते व
ओठावर पोवळ्याची लाली होती. फिरता फिरता एकदम तिला चोरांनी
ाठले, आणि तिचे सर्व दागिने बुचाडून नेल, पण एक नथ मात्र नेली
ाही ! काय चमत्कार आहे ! " वरील दागिनाच तेवढा चोरांनी का
वला याचा हेतु कवीने पहिल्या चरणात गर्भित केला आहे. तो हा की,
थेच्या मोत्यांवर वरून डोळ्याची नीळसर प्रभा व खालून ओठाचा रक्त-
र्ण पडून ते त्याच्यात प्रतिबिंबित झाल्यामुळे गुजाफलाचा भ्रम होऊन
ोरांनी त्यास हात घातला नाही ! कल्पना मोठ्या मौजेची आहे खरी पण
रील श्लोकावर अमळ अतिशयोक्तीचा दोप राहतो.

---

ाणी ममैव सरसा यदि रंजयित्री न प्रार्थये रसविदामवधानदानम्
ायंतनीषु मकरंदवतीषु भृंगा किं मल्लिकासु परमंत्रणमारभंते१५८

" माझी वाणीच जर सरस व रजन करणारी आहे, तर रसिकास
नवधान देण्याविषयी मला प्रार्थना करणे नलगे, पहा की, सायकाळी प्रफु-
ल्लित व मकरदयुक्त अशा मल्लिका झाल्या असताना भृगे त्यांच्या आम-
णाची वाट पाहतात काय ? "

---

प्रहारितोऽपि मार्जारस्तमाखु नैव मुंचति ॥
बहुधा बोधितो मूर्खस्तमार्खु नैव मुंचति ॥ १५९ ॥

" माजर उदरावर टपून बसले असतां त्यास मारले तरी तें त्याम

सोडीत नाहीं; तसाच मूर्खास कितीही पढविला तरी तो तमाखु सोडीत नाहीं ! ”

---

मुख्यमेकं पुरस्कृत्य शून्यात्मानोऽपि साधका ॥
भवंति तं विना नैव यथा संख्यांकबिंदव ॥ १६० ॥

“ कोणी चांगला मनुष्य पुढारी झाला असतां बाकीचे लोक नुसते खोगीर भरतीला असले तरी ते कार्य साधक होतात, तो नसेल तर त्यांच्या हातून कांहीं व्हावयाचे नाहीं. जसे अंकगणितातील आंकडे आणि शून्यें. शून्यास जी किंमत येते ती मागील आंकड्यानीं. ते नसतील तर तीं शून्येंच ! ”

---

आघ्रातं कमलं प्रियेण सुदृशा स्मित्वाऽपनीतं मुखम्
दत्तं विभ्रमकुंदुके नखपदं सीत्कृत्य गूढौ स्तनौ ॥
दत्ता चंपकमालिकोरसि तया प्रोद्भिन्नरोमांचया
मीलल्लोचनया स्थितं प्रणयिनोर्दूरेऽपि पूर्ण रस ॥ १६१ ॥

“ प्रियानें कमलाचा वास घेतला असता, स्त्रीनें त्याचा भाव समजून हसून एकीकडे तोंड केलें; त्यानें लीलाकंदुकावर नखपदाचें चिन्ह केलें असतां तिनें दंतसीत्कार करून पदर नीट सरसावून घेतला, आणि शेवटीं जेव्हां चंपकपुष्पाची माला त्यानें आपल्या उराशी धरली, तेव्हां रोमांचित होऊन व डोळे मिटून ती उभी राहिली. याप्रमाणें उभयतां दूर असतां रसाचा पूर्ण विकास झाला. ”

---

गुणदोषौ बुधो गृह्णन्निदुक्ष्वेडाविवेश्वर ॥
शिरसा श्लाघते पूर्वं परं कंठे नियच्छति ॥ १६२ ॥

“ जो सुज्ञ आहे तो दुसऱ्याच्या कृतींतील गुण व दोष दोन्हीही घेतो, कीं ज्याप्रमाणें शंकरानें चंद्र व विष हीं दोन्हीही ग्रहण केलीं, पण ज्याप्रमाणें शिवानें एकाला मस्तकीं धारण केला व दुसऱ्याला आपल्या कंठाचे ठायीं ठाव दिला, त्याचप्रमाणें वरील सुज्ञजन गुणाची श्लाघा करून दोष मनांत ठेवतो. ”

**अथं मे वाग्गुंफो विशदपदवैदग्ध्यमधुर**
**स्फुरद्बंधो वध्यः पशुहृदि कृतार्थं कविहृदि ॥**
**कटाक्षो वामाक्ष्या दरदलितनेत्रांतकलितः**
**कुमारे निःसारः स तु किमपि यूनः सुखयति ॥ १६३ ॥**

" प्रसन्नार्थ पदांच्या रचनाचातुर्येकरून युक्त व मनास चमत्कार देणार सा काव्यप्रबंध पशु म्हणजे जो अरसिक आहे त्याच्या हृदयात निष्फळ ईल, पण तोच कवीच्या म्हणजे रसिकाच्या हृदयात सफलता पावेल. रा ! की जसा सुंदरीचा नेत्रान्त किंचित् आकुंचित करून फेकलेला टाक्ष अर्भकाचे ठायीं निःसार होऊन तरुणास अतिशयेकरून सुख- होतो ! "

---

नायकाची नायिकेशीं गांठ पडली असता तो तीस उद्देशून म्हणतोः—

**शीतांशुर्मुखमुत्पले तव दृशौ पद्मानुकारौ करौ**
**रंभागर्भनिभं तवोरुयुगुलं बाहू मृणालोपमौ ॥**
**इत्याह्लादकराखिलांगि रभसान्निःशंकमालिंग मा-**
**मंगानि त्वमनंगतापविधुराण्येह्येहि निर्वापय ॥ १६४ ॥**

रत्नावली.

" हे वल्लभे तुझे मुख चंद्र होय, डोळे कमळे होत, तुझे हात रक्त-मलासारखे आहेत, तुझे उरुयुगुल केळीच्या गाभ्यासारखे आहे, आणि हु कमळाच्या ततूंप्रमाणे आहेत. तर याप्रमाणे सर्वांगांनी आल्हाद कर-री अशी जी तू ती मला निःशंकपणे सत्वर आलिंगन दे, आणि मदन-पाने पीडिलेल्या माझ्या गात्रास शीतळ कर, चल ये लौकर !"

---

**घृष्टं घृष्टं पुनरपि पुनश्चंदनं चारुगंधम्**
**छिन्नं छिन्नं पुनरपि पुनः स्वादु चैवेक्षुदंडम् ॥**
**दग्धं दग्धं पुनरपि पुनः कांचनं कांतवर्णम्**
**न प्राणांते प्रकृतिविकृतिर्जायते चोत्तमानाम् ॥ १६५ ॥**

" चंदन पुनः पुनः घासले तरी त्याचा मनोहर गंध येतो, ऊस पुनः नः तोडला तरी त्याचीं कांडीं गोडच लागतात, तसेच सोनेंही वारवार

तापविलें तरी त्याचा सुंदर वर्ण जात नाहीं; तेव्हां तात्पर्य काय कीं, जे उत्तम पुरुष असतात त्यांच्या प्रकृतींस प्राणांतींही विकार होत नसतो ! "

---

**वदनं दशनविहीनं वाचो न परिस्फुटा गता शक्तिः ॥**
**अव्यक्तेंद्रियशक्ति पुनरपिबाल्यं कृतं जरया ॥ १६६ ॥**

" जरेनें पुनः बाल्यावस्था प्राप्त केली. कशी ? तर मुख दंतविरहित झाले, वाणी अस्पष्ट झाली, शक्ति गेली, आणि सगळ्या इंद्रियांचें सामर्थ्य अव्यक्त झाले ! "

---

**यथा चित्तं तथा वाचो यथा वाचस्तथा क्रिया ॥**
**चित्ते वाचि क्रियायां च साधूनामेकरूपता ॥ १६७ ॥**

" जसे मन तशीच वाणी, आणि जशी वाणी तशीच कृति, याप्रमाणे जे सज्जन असतात त्यांचें चित्त, वाणी आणि क्रिया हीं तिन्ही एकरूप असतात ! "

---

**दंपत्योर्निशि जल्पतोर्गृहशुकेनाऽऽकर्णितं यद्वच-**
**स्तत्प्रातर्गुरुसंनिधौ निगदतस्तस्योपहारं वधू ॥**
**कर्णालंबितपद्मरागशकलं विन्यस्य चंचूपुटे**
**व्रीडार्ता प्रकरोति दाडिमफलव्याजेन वाग्बंधनम् ॥ १६८ ॥**

अमरुशतक.

" स्त्रीपुरुषाचे रात्रीचें बोलणे चालले असता ते घरांतील राघूनें ऐकून ते दुसऱ्या दिवशीं सकाळीं वडील माणसांदेखत तो बोलू लागला. तेव्हां स्त्रीस लज्जा प्राप्त होऊन तिने आपल्या कानांतील माणकाचा दागिना काढून डाळिंबाच्या मिषाने पोपटाच्या तोंडात दिला आणि त्याचे तोंड बंद करून टाकिले ! "

---

**एको देवः केशवो वा शिवो वा एकं मित्रं भूपतिर्वा यतिर्वा ॥**
**एको वासः पत्तने वा वने वा एका भार्या सुंदरी वा दरी वा१६९**

" कोणता तरी एक देव असावा, केशव कीं शिव, एक मित्र असावा

राजा किंवा यति; राहावें, तर एक शहरात किंवा वनात, आणि स्त्री म्हटली तर एक सुंदरी तरी असावी, किंवा आपली दरी पतकरावी (म्हणजे अरण्यवास करावा ) ! ”

---

मेघावर परचक्राचें रूपकः—

**पवनचपलवेगः स्थूलधाराशरौघः स्तनितपटहनादः स्पष्टविद्युत्पताकः हरति करसमूहं खे शशांकस्य मेघो नृप इव पुरमध्ये मंदवीर्यस्य शत्रोः ॥ १७० ॥**

मृच्छकटिकम्.

“ वाऱ्यानें ज्याचा वेग तीव्र झाला आहे, मोठाल्या धारा हीच ज्याची शरपंक्ति आहे, गर्जना हाच ज्याचा पटहनाद होय, विजेचें स्फुरण हीच ज्याची पताका फडाडते आहे, असा मेघ आकाशाचे ठायीं चंद्राच्या करसमूहाचें ( किरणसमुदायाचें, पक्षीं करभाराचें ) हरण करीत आहे, कीं ज्याप्रमाणें दुर्बळ झालेल्या शत्रूस त्याच्या नगरींत गांठून एखादा राजा त्याची दुर्दशा करून त्याच्यापासून कारभार घेतो तद्वत्. ”

---

**माघश्चोरो मयूरो मुररिपुरपरो भारविः सारविद्यः**
**श्रीहर्षः कालिदासः कविरथ भवभूत्याह्वयो भोजराजः**
**श्रीदंडी डिंडिमाख्यः श्रुतिमुकुटगुरुर्भल्लटो भट्टबाणः**
**ख्यातांश्चान्ये सुबंध्वादय इह कृतिभिर्विश्वमाह्लादयंति॥१७१॥**

विश्वगुणादर्श.

संस्कृत कवींची मालाः—“ माघ, चोरकवि, मयूर, मुरारी, उत्तम विद्या पढलेला असा भारवी, श्रीहर्ष, कालिदास, भवभूति, भोजराजा, दंडी, डिंडिम, वेदविशारद असा भल्लट, बाणभट्ट, आणि सुबंधु आदिकरून इतर दुसरे कविही आपल्या कृतींनी विश्वास आल्हाद देतात. ”

---

**यस्याश्चोरश्चिकुरनिकरः कर्णपूरो मयूरो**
**भासो हासः कविकुलगुरुः कालिदासो विलासः ॥**
**हर्षो हर्षो हृदयवसतिः पंचबाणस्तु बाणः**
**केषां नैषा कथय कविताकामिनी कौतुकाय ॥ १७२ ॥**

1108

जयदेव.

" ज्या कवितावधूचा चोर हा चिकुरनिकर ( केशपाश ), मयूर हा पूर ( कर्णभूषण ), भास हा हास ( हास्य ), कविकुलाचा केवळ गुरुच जे कविश्रेष्ठ जो कालिदास तो जिव्हा विलास, हर्ष हा हर्ष ( चित्ताचा ास ) आणि बाण हा जिव्हा हृदयात सचार करणारा साक्षात् पंच- ( मदन ) होय, ती कोणाच्या चित्तास स्त्रीरूपाच्या कौतुकाला कारण ार नाहीं ! "

---

कोणी विरही पुरुषाने आपल्या स्त्रीचे काही सांत्वन करण्याकरितां तिज- आपली आगठी पाठविली. तिजकडे पाहत असता तिच्या सखीने ारल्यावरून ती सागते:—

साक्षी पाणिनिपीडनस्य कुचयोराजन्मबंधुश्च मे
मुद्रांकोऽयमनगलेखविधिषु द्यूतग्लहे बधक ॥
अंतः शून्यमिव प्रियेण हृदय मूर्तं मयि प्रेषितम्
चक्षुर्मंगलमगुलीयकमणि सोऽय चिराद्वीक्ष्यते ॥ १७३ ॥

ा अगुलीयमणि उरोजनिपीडनाचा साक्षी होय, याची आणि माझी ाहापासून आजपर्यंत सारखी प्रीति जडली आहे, मदनलेखाचे प्रसगीं मु- करण्यास हाच उपयोगी पडे. आणि द्यूताच प्रसगीं हा पणाचे जागीं तर माझ्या प्रियाने विरहोत्कीर्ण आपले हृदयच जणो काय असा जो ाझ्या नेत्राला मगलप्रद अगुलीयक मणि माझ्याकडे पाठविला आहे. ाडे केव्हापासून मी मोठ्या प्रमाने बघते आहे ! "

---

विकृतिं नैव गच्छांति दुष्टसंगेन साधवः
आवेष्टितो महासर्पैश्चंदनः किं विषायते॥ १७४ ॥

" दुष्टाची निरतर सगति असताही साधु विकृतीते पावत नसतात. मोठ्या मोठ्या सर्पांनीं सदा वेष्टिलेला असताही चदन विषारी होतो ? "

---

वचस्तत्रैव वक्तव्य यत्रोक्त सफलं भवेत् ॥
स्थायीभवति चात्यंतं रंगः शुक्लपटे यथा ॥१७५॥

" त्याच ठिकाणीं भाषण करावे कीं जेथे त्याची सफलता होईल, आणि तें पूर्णपणे ठसून राहील; कीं जसा पांढऱ्या कापडावर रंग चांगला उमटतो ! "

---

✓ कवि मुग्धावस्थेचे विलास वर्णितो.—

**क्षण सरलवीक्षणं क्षणमपांगसंवीक्षणम्**
**क्षणं रजासि खेलनं क्षणमतीव भूषादर**
**क्षणं द्रुततरा गति क्षणमतीव मंदा गतिः**
**क्षणक्षणविलक्षणं जयति चेष्टितं सुभ्रुव ॥ १७६ ॥**

" क्षणभर सरळ पाहणें क्षणभर चोरून पाहणें, क्षणभर धुळींत खेळणे क्षणभर दागदागिन्याची हौस करणे, क्षणभर सत्वर चालणें, क्षणभर मंदगति दाखविणे, याप्रमाणे यौवनात येऊं लागणाऱ्या स्त्रीचे विलास क्षणोक्षणीं विलक्षण दिसून येतात ! "

---

**मार्तंडमंडलनिभं भवत. प्रतापं ये वर्णयंति न हि ते कवयः प्रवीणा अंभोनिधौ विलयमेति परं पतंगः पारं प्रयाति जलधेश्च भवत्प्रताप ॥ १७७ ॥**

" हे राजा ! तुझा प्रताप सूर्यमंडलासारखा आहे असे जे कवि वर्णन करतात ते मूढ होत, का कीं, सूर्याचें तेज तो समुद्रात बुडाला म्हणजे विलयास पावते, आणि तुझा प्रताप तर समुद्राच्याही पलीकडे जातो !"

---

**गुणवानपि नोपयाति पूजां पुरुष सत्पुरुषैरकथ्यमानः**
**नहि सौरमणि स्वभावकांतिं रविपादैरनाधिष्ठित. करोति ॥ १७८ ॥**

" पुरुष स्वतः जरी मोठा गुणवान् असला, तरी थोरानीं जोवर त्याची प्रशसा केली नाहीं तोंपर्यंत तो लोकमान्यतेस पात्र होत नाहीं. पहा कीं, सूर्यकात स्वभावतः तेजस्वी असताही सूर्यकिरणाच्या अधिष्ठानाशिवाय त्याचे तेज बाहेर पडत नाहीं ! "

---

**पात्रापात्रविवेकोऽस्ति धेनुपन्नगयोरिव ॥**
**तृणात्संजायते क्षीरं क्षीरात्संजायते विषम् ॥ १७९ ॥**

" दान करते समयीं पात्रापात्र विचार जो करावा लागतो त्याचा प्रकार असा आहे,—पहा, गाईला गवत घातलें तर त्यापासून दूध उत्पन्न होतें; आणि सर्पाला दूध घातलें तर त्याचें विष होतें ! "

---

**आशाया ये दासास्ते दासा सर्वलोकस्य ॥**
**आशा येषां दासी तेषां दासायते लोक ॥ १८० ॥**

" जे धनतृष्णेचे दास ते साऱ्या लोकांचे दास होतात, आणि आशा ज्यांची दासी म्हणजे धनप्राप्तीविषयीं जे केवळ उदासीन असतात त्यांचे दास्य सर्व लोक करतात. "

---

कोणी भक्त शिवास म्हणतो:—

**दोषाकरः शिरसि तेऽस्ति गले द्विजिह्व**
**पाषाणजा सहचरी पशुरंतरंगः ॥**
**दुःखं निवेदयति को मम दीनबंधो**
**त्वं चेत्त्रिलोचन निमीलितलोचनोऽसि ॥ १८१ ॥**

" हे त्रिलोचना ! दोषाकर ( चंद्रपक्षीं, दोषामय ) तर तुझ्या शिरीं आहे, कंठभागीं द्विजिव्ह ( सर्प, चहाडखोर ) आहे, तुझी सखी पाषाणजा ( पर्वतकन्या; व यास्तव अर्थातच कठोरहृदयाची ) होय, आणि घरचा मोठा विश्वासुक सेवक तो पशु ( नंदी ) आहे; मग असे असून तूंही जर डोळे मिटून राहशील ( ध्यानस्थ असशील, ) तर हे दीनबंधो ! माझें दुःख तुला कोण येऊन सांगेल ? "

---

**असद्भिः शपथेनोक्तं जले लिखितमक्षरम् ॥**
**सद्भिस्तु लीलया प्रोक्तं शिलालिखितमक्षरम् ॥ १८२ ॥**

" दुष्ट मनुष्यांनीं शपथपूर्वक सांगितलेले अक्षरही पाण्यावरच्या रेघेसारखे होय, पण सज्जनांनीं सहज बोललेलें वचन शिळेवर लिहिल्याप्रमाणे ! "

---

**उद्योग कलह कंडुर्द्यूतं मद्यं परस्त्रिय ॥**
**आहारो मैथुनं निद्रा सेव्यमानं तु वर्धते ॥ १८३ ॥**

" उद्योग, कलह, खरूज, जुवा, मद्य, परस्त्री, भोजन, सुरत, निद्रा,— हीं सर्व जितकीं सेवावीं तितकीं वाढतात."

नक्षत्राणि बहुनि संति परित पूर्णोदयान्यंबरे
तै किं शांतिमुपैति दीर्घतिमिरं किं वार्धिरुज्जृंभते ॥
किं स्यादार्तचकोरपारणविधिर्भ्रातः सुधादीधिते
तन्नूनं भुवनैकतापशमनः श्लाघ्यस्तवैवोदयः ॥ १८४ ॥

" आकाशांत चोहोंकडे पुष्कळ नक्षत्रें पूर्ण उदयास पावून लकाकताहेत पण त्यांच्या योगानें रात्रीचा निबिड अंधकार लयास जाईल काय ? समुद्र वर उचबळेल काय ? व तृषित जे चकोर त्यांचें समाधान होईल काय ?—यास्तव हे मित्रा चंद्रा ! केवळ तुझाच उदय भुवनाच्या तापशमनार्थ अपेक्षित आहे, व तोच श्लाघ्य होय ! "

---

निद्रामीलितलोचनो मृगपतिर्यावद् गुहां सेवते
तावत्स्वैरममी चरंतु हरिणाः स्वच्छंदसंचारिणः ॥
उन्निद्रस्य विधूतकेसरसटाभारस्य निर्गच्छतो
नादे श्रोत्रपथं गते गतधियः सन्त्वेव दीर्घायुषः ॥१८५॥

" जोपर्यंत सिंह हा निद्रिस्त असता गुहेचा आश्रय करून आहे, तोंवर हे स्वच्छंद संचार करणारे हरिण चोहोंकडे फिरोत, पण तो जागा होऊन आपले आयाळ झाडून बाहेर निघाला असतां व त्याची गर्जना कानीं पडली असतां हे मूढ मृग दीर्घायु असोत म्हणजे झालें ! "

---

विरहिणीचें वर्णनः—

हस्तांभोजे वदनमलकानायतान्बाहुमूले
द्वारे स्वैरं नयनमधरे तर्जनीं संनिधाय ॥
दीर्घोच्छ्वासं विरतविषयास्वादमुत्कंठितोष्णम्
मुग्धाक्षी त्वां हृदि विदधती बाष्पमाविष्करोति ॥ १८६ ॥

" हातावर तोंड टेकून, केश खांद्यावरून मोकळे सोडून, अधरोष्ठावर तर्जनी ठेवून उत्कंठितत्वामुळें दीर्घ व उष्ण निःश्वास टाकणारी, व विरक्त

झालेली, अशी ती सुदरी केवळ तुझा निदिध्यास घेऊन अश्रुयुक्त होऊन वारंवार दाराकडे पहात आहे व नेत्रांतून पाणी टाकीत आहे ! ”

---

सीतेने तिरस्कार केला असता अस्वस्थहृदय झालेला असा रावण विरहशय्येवर मदनपीडित होऊन तळमळत होता. तेव्हा त्याचे द्वारपाळ बाहेर जाऊन देवास धमकावितातः—

**ब्रह्मन्नध्ययनस्य नैष समयस्तूष्णीं बहिः स्थीयताम्**
**स्वल्पं जल्प बृहस्पते जडमते नैषा सभा वज्रिण ॥**
**वीणां संहर नारद स्तुतिकथालापैरलं तुंबरो**
**सीतारल्लकभल्लभग्नहृदयः स्वस्थो न लंकेश्वरः ॥ १८७ ॥**

“ ब्रह्मदेवा ही अध्ययनाची वेळ नव्हे, बाहेर मुकाट्याने बसावे, बृहस्पते मूर्खासारखी बडबड किती करतोस, ही काहीं इंद्राची सभा नव्हे, आपले पांडित्य अमळ पुरे कर, नारदा ! तू आपली विणा आटोप,—हे तुंबरो ! स्तुतिपाठ सध्या बंद कर. का तर, महाराजाची स्वारी सीतेच्या पद्मरूप भाल्याने विद्धहृदय झाली असून त्यास आज चैन नाहीं ! ”

---

**आवृणोति यदि सा मृगीदृशी स्वांचलेन कुचकांचनाचलम्**
**भूय एव बहिरेति गौरवादुन्नतो न सहते तिरस्क्रियाम् ॥ १८८ ॥**

“ ही मृगनयना आपल्या कुचरूप कांचनपर्वतास जरी पदराने झाकीत आहे तरी तो गौरवास्तव पुनः प्रकट होऊ पहातोच. सारांश, स्वभावेकरूनच जो उन्नत असतो त्यास अपमान कधीं सहन होत नसतो ! ”

---

**यत्पादाः शिरसा न केन विधृताः पृथ्वीभृतां मध्यत-**
**स्तस्मिन्भास्वति राहुणा कवलिते लोकत्रयीचक्षुषि ॥**
**खद्योतैः स्फुरितं तमोभिरुदितं ताराभिरुज्जृंभितम्**
**घूकैरुत्थितमाः किमत्र करवै किं केन नो चेष्टितम् ॥ १८९ ॥**

“ जगत्त्रयाचा चक्षु जो तेजस्वी सूर्य, कीं ज्याचे पाद ( पाय–किरण ) पर्वतश्रेष्ठानींही शिरसा वंद्य केलें, त्याचा राहूनें क्षणमात्र ग्रास केला असता काय काय चमत्कार झाले पहा !—काजवे चमकू लागले, गिरिकंदरात दडलेला

अधकार पुनः पुढें सरसावला, तारे उदय पावले; फार काय मांगावें, क्षुद्र वैरी जे घूक ते सुद्धां उठले ! " ही अर्थातच अन्योक्ति होय.

---

**दातुरुन्नतावित्तस्य गुणयुक्तस्य चार्थिनः ॥**
**दुर्लभः खलु संयोग सद्बीजक्षेत्रयोरिव ॥ १९० ॥**

" मोठा श्रीमत दाता आणि सत्पात्र अर्थी याचा सयोग उत्तम बीज आणि उत्तम क्षेत्र याच्याप्रमाणें मोठा दुर्लभ होय. "

---

**दिगते खेलंती सरसदहृदयानंदजननी**
**मया नीता भोजक्षितिपनगरीमंब कविते ॥**
**अकस्मादुन्मीलत्खलवदनवल्मीकरसना-**
**भुजंगीदष्टांगी शिव शिव समाप्तिं गतवती ॥ १९१ ॥**

" हे माते कविते ! तु जी दिगतीं भ्रमण करणारी व रासिकाच्या हृदयास आनद देणारी, त्या तुला मीं भोजराजाच्या नगरास नेली, पण तेथे अक- स्मात् खलवदनरूप वारुळातून जिव्हारूप नागीण निघून तिनें तुला दश केला आणि तुझा अत झाला ! हर हर ! "

---

**पिंडे पिंडे मतिर्भिन्ना कुंडे कुंडे नवं पय ॥**
**जातौ जातौ नवाचारा नवा वाणी मुखे मुखे ॥ १९२ ॥**

" मनुष्या मनुष्याची बुद्धि निराळी असते, कुडा कुडांत निरनिराळ्या प्रकारचे पाणी असतें; दर एक जातीचे निरानिराळे आचार असतात; आणि निरनिराळ्या लोकांची निरनिराळी भाषा असते. "

---

**नहि ज्येष्ठस्य ज्येष्ठत्वं गुणैर्ज्येष्ठत्वमुच्यते ॥**
**केतकीवरपत्रेषु लघुपत्रस्य गौरवम् ॥ १९३ ॥**

"श्रेष्ठत्व जे गाणिलें जातें ते वयावरून नव्हे,तर गुणावरून गणतात. पहा ! केवड्याच्या पानांत जें अत्यत लहान असतं त्याची योग्यता विशेष ! "

---

कोणी विरही पुरुष म्हणतोः—

**यदि स्मरामि तन्वंगीं जीविताशा कुतो मम ॥**
**अथ विस्मृत्य जीवामि जीवितव्यमनेन किम् ॥ १९४ ॥**

"प्रियतमेचे स्मरण जर माझ्या ठायीं राहील, तर मग वाचण्याची आशा नकोच, आणि तिचें विस्मरण पडून जर मी जिवत राहीन, तर मग तें जिणे केवळ भारवत् होय !"

---

ऋषीणां च नदीनां च कुलानां च महात्मनाम् ॥
प्रभवो नाधिगंतव्यः स्त्रीणां दुश्चरितस्य च ॥ १९५ ॥

" ऋषि, नद्या, आणि थोर पुरुषाचे कूळ याचे मूळ शोधीत बसू नये, त्याचप्रमाणे स्त्रियाच्या दुराचरणाचेही. " *

---

नैव व्याकरणज्ञमेव पितरं न भ्रातरं तार्किकं
मीमांसानिपुणं नपुंसकमिति ज्ञात्वा निरस्तादरा ॥
दूरात्संकुचितेव गच्छति पुनश्चांडालवच्छांदसम् ।
काव्यालंकरणज्ञमेव कविताकांता वृणीते स्वयम् ॥ १९६ ॥

" कविताकांता ही वैयाकरणास पित्यासमान व तर्कज्ञास भ्रात्यासमान मानून त्याचा अगीकार करीत नाही, मीमासाकार तर षढ समजून त्याचा तिरस्कार करते, आणि वैदिकाचा तर चाडालाप्रमाणे विटाळ मानून त्यापासून सकोच पावून दूर निघून जाते, परतु काव्यालकार जाणणारास मात्र आपण होऊन वरते ! "

---

उद्दंडे भुजदंडे तव कोदंडे परिस्फुरति ॥
अरिमंडलरविमंडलरंभाकुचमंडलानि वेपंते ॥ १९७ ॥

" हे राजा, तुझ्या प्रबळ भुजदंडावर धनुष्य चढलें असता शत्रूचे मडळ, सूर्यमडळ, आणि रभेचे कुचमडळ हीं तिन्ही कपायमान होतात. " म्हणजे शत्रूचा थरकाप होतो, सूर्यास आपले मडल भेदून वीर गमन करतील म्हणून धाक पडतो, आणि रभादि अप्सरा भावी वीरालिंगनाची अपेक्षा करून हर्षकपित होतात.

---

* लोकात म्हण आहे, ' नदीचें मूळ आणि ऋषीचें कूळ हीं पाहूं नयेत. "

किं जन्मना महति किं पितृपौरुषेण
शक्त्यैव याति निजया पुरुष प्रतिष्ठाम् ॥
कुंभो हि कूपमपि शोषयितु न शक्त·
कुंभोद्भवेन मुनिनांऽबुधिरेव पीत· १९८ ॥

" मोठ्या कुलात जन्म पावून काय उपयोग आहे ? व बापाचा पराक्रम मुलाच्या काय कामाचा ? पुरुष जो प्रतिष्ठा पावतो तो स्वतःच्याच सामर्थ्यावर पावतो. पहा कीं, मातीच्या घड्यास विहीर सुद्धा शोषून टाकण्याची शक्ति नसते, पण त्यापासून जन्म पावलेला जो मुनि ( अगस्त्य ) त्याने समुद्राचेंही प्राशन करून टाकले ! "

---

वेश्यानामिव विद्यानां मुखं कैः कैर्न चुंबितम् ॥
हृदयग्राहिणस्तासां द्वित्राः संति न संति वा ॥ १९९ ॥

" वेश्याप्रमाणे विद्याचे नुसते मुखचुंबन कोण करीत नाहीं ? परंतु त्याचे हृदय ज्यांच्या हातीं लागले आहे असे दोन तीनच असतात किंवा नसतात ! "

---

स्वस्त्यतु विद्रुमवनाय नमो मणिभ्य·
कल्याणिनी भवतु मौक्तिकशुक्तिमाला ॥
प्राप्त मया सकलमेव फलं पयोधे
यद्दारुणैर्जलचरैर्न विदारितोऽस्मि ॥ २०० ॥

" हे समुद्रा ! तुझीं पोवळ्याचीं वने सुखानें असोत, तुझ्या रत्नास माझा नमस्कार असो; व मोतींशिंपाचेंही निरंतर कल्याण असो, मला सगळें येवढ्यानेच पावले कीं, तुझ्या पोटातल्या क्रूर जलचराच्या तडाक्यातून मी धडपणीं वर निघून आलो ! " ही अर्थात् अन्योक्ति होय.

---

✓ताते सुतानां सुरतेऽगनानां स्तुतौ कवीनां समरे भटानाम् ॥
त्वंकारयुक्ता हि गिरः प्रयुक्ता रसाधिकाश्चारुतरा भवंति ॥२०१

" बापाशीं मुलगा लडिवाळपणाने बोलत असता, स्त्रियाच्या रतिप्रसगीं, कवि राजाचें स्तोत्र गात असतां, तसेंच योद्धयाच्या समरप्रसगीं, ' तू '

या शब्दाने बोललेली भाषणे रसाधिक होऊन अधिक रम्य होतात !"

ते वंद्यस्ते महात्मानस्तेषां लोके स्थिरं यशः ॥
यैर्निबद्धानि काव्यानि ये वा काव्ये प्रतिष्ठिताः ॥ २०२ ॥

" तेच वंद्य, तेच महात्मे, आणि त्याचेच यश लोकांचें ठायीं चिरकाल राहणारें आहे, कीं ज्यानीं काव्यें रचलीं, किंवा जे त्यांत प्रतिष्ठित झाले आहेत, म्हणजे ज्याचे त्यात यशोवर्णन केलेले आहे."

रूपं सुदर्शनं ते वदनं पद्मं च नंदको हास ॥
वससि न हरे करे किं त्वं किल कौमोदकी गोपि ॥२०३॥

" हे गोपि ! तुझें रूप सुदर्शन (दिसण्यास सुरेख, पक्षीं, कृष्णाचे चक्र) आहे, तोंड पद्म आहे, हास्य नंदक ( आनंदविणारें, पक्षीं, विष्णूचा खड्ग ) आहे, आणि तू स्वतः कौमोदकी ( पृथ्वीवर आनंद देणारी, पक्षीं, विष्णूची गदा ) आहेस, मग हरीच्या करीं का रहात नाहींस ? "

✓अविवेकात्पीडयतां स्थितमन्योन्यमंडलम् ॥
कुनृपाणां कुचाना च पतनाय समुच्छ्रय. ॥ २०४ ॥

" विवेकशून्यत्वास्तव एकमेकांच्या मंडलास पीडा करणारे ( पक्षांतरीं, निरंतरत्वास्तव परस्पर संलग्न असणारे ) असे दुष्ट राजे व कुच याची उन्नति झाली असता त्यांस पतन घडणारच ! "

अकर्णमकरोच्छेषं विधिर्ब्रह्मांडभंगधी ॥
श्रुत्वा रामकथां रम्यां शिरः कस्य न कंपते ॥ २०५ ॥

" ब्रह्मदेवाने शेषास कर्णहीन उत्पन्न केलें कीं ब्रह्मांडाचा भंग होऊं नये, कारण रम्य जी रामकथा ती कानीं पडली असता कोणाचे शिर आनंदानें कंपायमान होत नाहीं ? "

आरोग्यं विद्वत्ता सज्जनमैत्री महाकुले जन्म ॥
स्वाधीनता च पुंसां महदैश्वर्यं विनाप्यर्थैं ॥ २०६ ॥

" आरोग्य, विद्वत्ता, सज्जन पुरुषाचा समागम, मोठ्या कुलात जन्म आणि स्वतंत्रता, हीं पांच संपत्तीशिवाय पुरुषास मोठीं ऐश्वर्ये होत. '

---

कोणी एका कवीनें राजापुढें आपलें दैन्य भाकलें असतांही त्यानें द्वारपालाकडून त्यास घालवून दिलें, तेव्हां तो उलटून राजास म्हणतो:—

**शूली जातः कदशनवशाद्भैक्ष्ययोगात्कपाली**
**वस्त्राभावाद्गगनवसनः स्नेहशून्याज्जटावान् ॥**
**इत्थं राजन्तव परिचयादीश्वरत्व मयाऽप्तम्**
**तस्मान्मह्यं किमिती कृपया नार्धचंद्र ददासि ॥ २०७ ॥**

हे राजा! मी कदन्नाच्या भक्षणेकरून शूली ( शूलधारी–शूलव्यथित ) झालों, भिक्षा मागण्यानें कपाली ( कपालधारी शिव ) झालों, वस्त्रे नेसण्यास व पांघरण्यास नसल्यानें दिगंबर ( दोन्ही अर्थ प्रसिद्धच आहेत ) झालों, स्नेहाच्या ( तेलाच्या ) शून्यत्वास्तव जटाधर झालों.— मग याप्रमाणें तुझ्या परिचयास्तव मला ईश्वरत्व (राजत्व—शिवत्व) प्राप्त झालें असतां तूं कृपायुक्त होऊन मला अर्धचंद्र ( पक्षीं, गचांडी ) देतोस, यांत नवल कमच! "

---

कोणी स्त्री आपल्या सखीस सांगते:—

**न जाने संमुखायाते प्रियाणि वदति प्रिये ॥**
**सर्वाण्यंगानि मे यांति नेत्रतां किमु कर्णताम् ॥ २०८ ॥**

" प्रिय जवळ येऊन गोड गोष्टी सांगू लागला असतां माझे सर्व अंगावयव नेत्र होतात कीं कर्ण होतात, हे मला कळत नाहीं. " म्हणजे दोन्ही इंद्रियांच्या शक्ति सारख्याच वेधून जातात

---

**मारात्परः शूरतरो न कश्चित्पराभवः स्त्रीहरणान्न चान्यः ॥**
**तथाऽपि नाब्धिं प्रविवेश रामो बबंध सेतुं विजयी सहिष्णु ॥२०९॥**

' मदनाहून दुसरा कोणी अधिक वीर नाहीं, व स्त्रीहरणाहून दुसरी अपमानकारक गोष्ट नाहीं, तरी रामानें उतावळेपणानें समुद्रांत उडी घातली नाहीं, तर सेतूचें बंधन केलें. विजयी जनानें सहिष्णु असावें. '

**अदृष्टमुखभंगस्य युक्तमन्धस्य याचितुम् ॥**
**अहो बत महत्कष्टं चक्षुष्मानपि याचते ॥ २१० ॥**

" आंधळेपणामुळे ज्यास मनुष्याची क्षोधचर्या दिसत नाहीं अशानें याचना केली असता एक वेळ चालेल, पण ज्याला डोळे आहेत अशानें दैन्य भाकणें हे केवढे दुःखास्पद आहे ! "

---

**पयोधेः सर्वस्वं शिरसि धृतवान्यं नृपगण**
**पणो यस्य क्षोणी चतुरुदधिसीमावधिरभूत् ॥**
**स एवायं दैवाच्छबरवनितापाणिपतितो**
**मणिर्मेषग्रीवाद्विगुणगुणबद्धो विहरति ॥ २११ ॥**

' जे रत्न समुद्राचें सर्वस्वभूत असून ज्यास मोठमोठे राजे मस्तकाचे ठायीं धारण करते झाले, आणि ज्याचें मोल समुद्रवलयांकित सकल पृथ्वी होती, तो दुर्दैवानें भिल्लिणीच्या हातीं लागला असता मेंढ्याच्या गळ्यांत दुहेरी दोऱ्यानें बांधला जाऊन आतां विहार करीत आहे ! '

---

**आपातालगभीरे मज्जति नीरे निदाघसंतप्तः ॥**
**न स्पृशति पल्वलांभः पंजरशेषोऽपि कुंजरः क्वापि ॥ २१२ ॥**

" हत्ती रोड होऊन अस्थिपंजररूप जरी झाला, तरी पाताळापर्यंत खोल अशा डोहांतच ग्रीष्मकाळाच्या शरीरदाहास शमविण्याकरितां बुडी मारतो; डबक्याच्या पाण्यास शिवतही नाहीं ! "

---

वर्षाकालांतील रात्रीचें वर्णनः—

**क्षपाः क्षामीकृत्य प्रसभमपहृत्यांबु सरिताम्**
**प्रताप्योर्वीं सर्वां तरुगहनमुच्छोष्य सकलम् ॥**
**क्व संप्रत्युष्णांशुर्गत इति तदालोकनपरा-**
**स्तडिद्दीपालोकं दिशि दिशि चरंतीव जलदाः ॥ २१३ ॥**

" रात्रीस कृश करून टाकून, नद्यांचें पाणी बळेंच हरण करून, साऱ्या पृथ्वीस अत्यंत तप्त करून, झाडांचे कुंज सारे वाळवून टाकून, सूर्य कोणी-

कडे नाहींसा झाला म्हणून विद्युल्लतारूप दीपिका घेऊन साऱ्या दिशा मेघ जणू काय शोधीत आहेत ! ''

---

गौरीहर संवादः—

**स्वेदस्ते कथमीदृशः प्रियतमे त्वन्नेत्रवह्नेर्विभो**
**कस्माद्वेपितमेतदिंदुवदने भोगींद्रभीतेर्भवम् ॥**
**रोमांच कथमेष देवि भगवन्गंगांभसः शीकरै-**
**रित्थं भर्तरि भावगोपनपरा गौरी चिरं पातु वः ॥ २१४ ॥**

" हे प्रियतमे ! तुझ्या अंगावर हे स्वेदबिंदु कशामुळे दिसतात ? हे विभो ! तुझ्या नेत्राग्नीच्या योगाने, हे इंदुवदने ! हा कंप कशामुळे उत्पन्न झाला आहे ? महासर्पाच्या भीतीने, हे देवि ! रोमांचाचे कारण काय ? हे भगवन् गंगेचे तुषार,—याप्रमाणे प्रणयाने उत्पन्न झालेल्या वृत्ति जिने शिवापाशीं लपविल्या ती पार्वती तुमचे रक्षण करो ! " हा छेकापन्हुति अलंकार होय.

---

**तमस्तोम भृश सोममंडलोपरि राजसे ॥**
**धूमपानेन किं नाम धाम गम्यमत. परम् ॥ २१५ ॥**

" हे अंधकारसमूहा ! तू चंद्रमंडलाच्या वर फार शोभा पावत आहेस. धूमपानरूप तपश्चरणाने याहून उत्तम स्थान तुला कोणतें प्राप्त व्हावे ? " या श्लोकात अंधकारसमूह हा केशकलाप होय, चंद्रमंडल मुख होय व धूमपान सुगंधी द्रव्याची धुरी होय.

---

**करेवेणीमेणीसदृशनयना स्नानविरतौ**
**दधाना हर्म्याग्रे हरनयनतेजोहतमपि ॥**
**इयं मुग्धा दुग्धांबुधिबहलकल्लोलसदृशा**
**दृशा वारं वारं मनसिजतरुं पल्लवयति ॥ २१६ ॥**

" नाहणे होऊन गच्चीवर हातात केश धरून उभी राहिलेली ही मृगनयना क्षीरसागराच्या कल्लोलाप्रमाणें धवल अशा दृष्टीने शिवाच्या नेत्राग्नीने दग्ध झालेल्या मदनवृक्षास वारंवार पालवीत आहे ! "

**किं छत्रं किं नु रत्नं तिलकमथ तथा कुंडल कौस्तुभ वा**
**चक्रं वा वारिजं वेत्यमरयुवतिभिर्यद्बलिद्धेषि देहे ॥**
**उर्ध्वं मौलौ ललाटे श्रवसि हृदि करे नाभिदेशे च दृष्टम्**
**पायात्तद्वोऽर्कबिंबं स च दनुजरिपुर्वर्धमान क्रमेण ॥ २१७ ॥**

" वामनावतारीं विष्णूने आपले प्रचड रूप एकदम प्रगट केले असता देवागनास सूर्य हा प्रथम त्याच्या डोक्यावरील छत्र, नतर शिरोभागींचे रत्न, नतर कपाळावरचा टिळा, नतर कानातील कुडल, नतर हृदयावरील कौस्तुभ, नतर हातातील चक्र, आणि शेवटीं नाभिस्थानाचे कमल, असें क्रमाक्रमाने वाटले,—असा तो दैत्यरिपु व ते सूर्यबिंब तुमचे रक्षण करो ! "

---

**दामोदरस्य मुरली कथ न भवति प्रिया ॥**
**विप्रयोगे गतप्राणा सप्राणाऽधरयोगतः ॥ २१८ ॥**

" मुरली ही कृष्णास अत्यत प्रियकर का वाटणार नाहीं ?—जी त्याचा वियोग झाला असता गतप्राण ( वायुशून्य व निर्जीव ) व अधराचा सयोग झाला असता प्राणवती ( वायुपूर्ण व सजीव ) होते. "

---

**यो न संचरते देशान्यो न सेवेत पडितान् ॥**
**तस्य सकुचिता बुद्धिर्घृतबिदुरिवांभसि ॥ २१९ ॥**

" जो देशाटन करीत नाहीं, व पडिताचा समागम करीत नाहीं, त्याची बुद्धि पाण्यात जसा तुपाचा थेब त्याप्रमाणे सकुचितच राहते. "

---

**यस्तु संचरते देशान्यस्तु सेवेत पंडितान् ॥**
**तस्य विस्तारिता बुद्धिस्तैलबिंदुरिवांभसि ॥ २२० ॥**

" जो निरनिराळया देशात फिरतो व पडिताच्या समागमे राहतो, त्याची बुद्धि पाण्यात जसा तेलाचा बिदु त्याप्रमाणे विस्तार पावत जाते ! "

---

**घटीयत्रायते हारो नाभिकूपे मृगीदृशः ॥**
**संसेक्तुमिव लावण्यपयसा यौवनद्रुमम् ॥ २२१ ॥**

" मृगनयनेच्या यौवनरूप वृक्षास लावण्यरूप उदकाने सिंचन करण्यास्तवच जणू काय हा मौक्तिकहार नाभिकूपावर घटीयंत्राप्रमाणे ( रहाटगाडग्याप्रमाणे ) लोंबत आहे ! " हे सावयव रूपक होय.

---

कोणी पुरुषाने आपल्या प्रियतमेचा कोप दूर करण्याकरिता तीस उद्देशून परोपरीची अनुनयपूर्वक भाषणे केली, तरी तिची समजावणी होईना शेवटी रात्र सरत आली तेव्हा तो तीस म्हणतो:—

**कृशोदरि निशा कृशा तदपि ते न मानः कृश**
**पुरोदिगनुरागिणी तदपि नानुरागोदयः**
**प्रसन्नमिदमंबरं तदपि न प्रसन्नं मनो**
**नदंति चरणायुधास्तदपि मौननालबसे ॥ २२२ ॥**

" हे मानिनी ! रात्र कृश झाली तरी तुझा मान कृश होत नाही, प्राची दिशा अनुरागयुक्त (किंचित आरक्त) झाली तरी तुझ्या अनुरागाचा ( प्रेमाचा ) अद्याप उदय होत नाही; हे आकाश प्रसन्न ( स्वच्छ ) झाले तरी तुझे मन प्रसन्न ( प्रसादयुक्त ) होत नाही, पहा ! चरणायुध ( कुक्कुट ) शब्द करू लागले तरी तू अद्याप दृढ मौन धारण करून बसली आहेस ! "

---

कोणी कवि राजाच्या प्रतापाचे वर्णन करतो:—

**द्वारं खड्गिभिरावृत्तं बहिरपि प्रस्विन्नगंडैर्गजै-**
**रंत कंचुकिभिः स्फुरन्माणिधरैरासादिता भूमयः ॥**
**आक्रांतं महिषीभिरेव शयनं त्वद्विद्विषां मंदिरे**
**राजन्सैव चिरंतनप्रणयिनी शून्येऽपि राज्यस्थिति.॥२२३**

हे राजा ! तुझ्या शत्रूच्या मंदिराच्या द्वारभागी अद्याप खड्गी ( गेंडे, पक्षी, द्वाररक्षक ) आहेत, बाहेर मदोदकानें स्रवणारे हत्ती आहेत ( म्हणजे आता चोहोकडे अरण्य झाल्यामुळे वनचर हत्ती तेथ दृष्टीस पडतात, ) आता तेजस्वी रत्ने धारण करणारे कंचुकी ( सर्प, पक्षी, अंतःपुररक्षक ) इकडून तिकडे वावरत आहेत, त्याप्रमाणेच त्यांचे शय्यास्थानही महिषींनी

( म्हशींनीं, पक्षी, राजास्त्रियांनीं ) अधिष्ठित आहे. सारांश, फार दिवस राहिल्याने तेथे रमलेली राज्यस्थिति अद्याप त्या शून्यस्थलीं नांदत आहे!''

---

कविता वनिता चैव स्वयमेवागता वरा ॥
बलादाकृष्यमाणा सा सरसा विरसा भवेत् ।। २२४ ॥

" कविता व तरुण स्त्री ही स्वतः होऊन आली असता त्यांत मजा आहे, पण जर दोहोंचे बलाने आकर्षण केलें, तर दोघी मूळच्या सरस असल्या तरी वरील घर्षणाच्या योगाने अत्यंत विरस होतात !''

---

अभिसारिकेचें वर्णनः—

मुक्तं मौक्तिकदाम हेमवलयश्रेणी समुत्सारिता
वासो नीलमुरीकृतं नियमितो मंजीरकोलाहलः ॥
गच्छन्त्यास्तव साहसं न सहते तन्वांगि संगोपनम्
धाम्मिल्लच्युतमल्लिकापरिमलप्रौढो निशीथानिल ॥ २२५ ॥

हे तन्वंगि ! तू कोणाच्या दृष्टीस पडू नये म्हणून मोत्यांचा हार टाकून दिलास सुवर्णकंकणे काढून टाकलीस, नील वस्त्र पांघरली आहेस पैंजणांचा नाद बंद केला आहेस, याप्रमाणें तू आपणाकडून सारा बंदोबस्त केला आहेस पण तुझ्या शिरींच्या नवमल्लिकेच्या सुगंधाने भरलेल्या मध्य-रात्रसमयींच्या वायूस तुझें साहस सहन न होऊन तो तुला प्रकट करू पाहत आहे ! '' ※

---

नोष्णश्वासं कलयति न वा गंडयो पांडिमानम्
दृष्टे वस्तुन्यपि च भजसि प्रत्यभिज्ञामभिज्ञा ॥

---

※' मृच्छकटिक ' नाटकात प्रथम प्रवेशांत विटाचें वसंतसेनेस अशाच प्रकारचें भाषण आहे —

कामं प्रदोषतिमिरेण न दृश्यसे त्वम्
सौदामिनीव जलदोदरसंविलीना ॥
त्वां सूचयिष्यति तु माल्यसमुद्भवोऽयम्
गंधश्च भीरु मुखराणि च नूपुराणि ॥

कौल धर्मं वहसि बहलं तद्ध्रुवं नंदसूनो-
र्वंशीनादस्तवन सरले श्रोत्रदेशं विवेश ॥ २२६ ॥

" तू उष्ण श्वास टाकीत नाहींस, तुझ्या गालावर पांढुरकी आली नाहीं, पुढें असलेल्या पदार्थाविषयीं तुला भ्रांति न पडून तू तो ओळखतेस, आणि कुलांगनाची रीत तू अजून अस्खलित चालविली आहेस, या सर्व चिन्हावरून मला वाटतें कीं हे सरले ! नंदपुत्राचा वेणुनाद तुझ्या कर्णपथावर अद्याप आला नाहीं ! "

---

मुहुः स्खलति नीविका पुलकिता च गंडस्थली
दृशोरपि कृशोदरि स्फुरति रीतिरन्यादृशी ॥
वचोऽपि तव गद्गदं स्फुरदमंदचंद्रानने !
मुरारिमुरलीरवः कथय किं समाकर्णितः ॥ २२७ ॥

" तुझी निरगाठ वारवार सरकते, तुझ्या गालावर रोमांच उठले आहेत, नेत्रांची स्थितिही कांहीं चमत्कारिक झाली आहे आणि तुझा कंठ दाटून येऊन शब्द उमटेनासा झाला आहे, तर रे मंदोदरि ! हे पूर्णचंद्रानने ! मुरारीच्या मुरलीचा नाद तू ऐकलास कीं काय ? "

---

चंद्रमंडलावर उत्प्रेक्षाः—

भ्रांत्वा दिग्वलयं दशास्यदमन त्वत्कीर्तिहंसी दिवम्
याता ब्रह्ममरालसंगमवशात्तत्रैव गर्भिण्यभूत् ॥
पश्य स्वर्गतरंगिणीपरिसरे कुंदावदातं तया
मुक्तं भाति विशालमंडकमिदं शीतत्विषो मंडलम् ॥२२८ ॥

" हे दशाननांतका ! तुझी कीर्तिहंसी सगळ्या दिशा फिरतां फिरतां स्वर्गास गेली. तेथें ब्रह्मदेवाच्या हंसाशीं तिचा संगम होऊन तेथेंच तिनें कुंदपुष्पाप्रमाणे धवल असें मोठें अंडें टाकून दिलें. तें हे चंद्रमंडल दिसत आहे ! "

---

साक्षीकृत्य महेश्वरं सगिरिजं स्वर्गापगायास्तटे
प्राणानां शरणं कलेवरधनं न्यासीकृतं सज्जनैः ॥

**भूयो भूरितरैरुपायनितरैः संप्रार्थ्यमाना तु या**
**दातुं नेच्छति सा नु किं मुनिवरैर्धन्येति काशीयते ॥ २२९**

शिव व पार्वती यास साक्षी ठेऊन गंगेच्या काठीं प्राणाचे वसतिस्थान जें शरीर तेंच धन सज्जनांनीं ठेव म्हणून काशीपाशीं ठेवले असता व नंतर अनेक उपायांनीं तें पुनः मागितलें असता ते ती पुनः परत देऊं इच्छीत नाहीं, तर अशीस मोठमोठे मुनि धन्य म्हणून तिचे ठिकाणीं गमन कां करितात ? " या श्लोकांत व्याजनिंदा अलंकार आहे.

---

**कस्तूरीयंति भाले तदनु नयनयोः कज्जलीयंति कर्ण-**
**प्रांते नीलोत्पलीयंत्युरसि मरकतालंकृतीयंति देव्याः ॥**
**रोमालीयंति नाभेरुपरि हरिमणीमेखलीयंति मध्ये**
**कल्याणं कुर्युरेते त्रिजगति पुरजित्कंठभासां विलासाः ॥२३०**

" त्रिपुरारी जो शिव त्याच्या कंठाच्या कांतीचे विलास त्रिजगताचें कल्याण करोत. ते विलास कसे ? तर पार्वतीच्या कपाळावर वरील प्रभा कस्तूरीसारखी शोभते, डोळ्यांस कज्जलाप्रमाणे होते. कर्णाचे ठायीं नीलोत्पलापरी भासते, वक्षःस्थलावर पाचेच्या अलंकाराप्रमाणे दिसते, नाभिप्रदेशीं रोमावलीसारखी शोभते आणि कटीचे ठायीं पाचेची मेखलाच कीं काय असा भास होतो ! "

---

**स्फटिकमरकतश्रीहारिणोः प्रीतियोगा-**
**त्तदवतु वपुरेकं कामकंसद्विषोर्वः ॥**
**भवति गिरिसुतायाः सार्धमंभोधिपुत्र्या**
**सदृशमहसि कंठे यत्र सीमाविवादः ॥ २३१ ॥**

' काम आणि कंस यांच्या शत्रूंचे स्फटिक व पाच यांची प्रभा हरणारें असें एकवट झालेलें शरीर तुमचें रक्षण करो; कीं, ज्याच्या कंठाचे ठायीं; पार्वतीचा व लक्ष्मीचा प्रीतिपूर्वक सीमाविवाद होतो, म्हणजे दोघांच्याही कंठप्रदेशाचा नीलवर्ण असल्यामुळे वरील दोघींस आपआपली हद्द कोठवर आहे ती बरोबर समजत नाहीं ! "

---

गतास्ते राजानः परतरणिभोजप्रभृतयो
गुणो दानं त्यागस्त्रयमपि च येषां स्थिरमभूत् ॥
गुणः कोदंडेऽद्य छिरदवदने दानमधुना
सतां देशत्यागे निवसति वचस्त्याग इति च ॥ २३२ ॥

" ते सूर्याहून तेजस्वी भोजप्रभृति राजे गेले की ज्यांच्या ठायीं गुण, दान आणि त्याग (उदारता) हीं तिन्हीं स्थिर असत, आता पाहिले तर गुण (दोरी) ही धनुष्याचे ठायीं दान (मदोदक) हत्तीच्या गडस्थळीं, आणि विद्वज्जनांनीं देशत्याग केला असता त्यास काय तो त्याग ही संज्ञा द्यावयाची ! "

---

सस्यानि स्वयमत्ति चेद्वसुमती माता सुत हंति चे
द्वेलामंबुनिधिर्विलंघयति चेद्भूमि दहत्पावकः ॥
आकाश जनमस्तके पतति चेदन्न विष चेद्भवे-
दन्यायं कुरुते यदा क्षितिपतिः कस्तं निरोद्धुं क्षम २३३

" पृथ्वीच शेते जर खाईल आई मलाला मारील समुद्र वेलेचे अतिक्रमण करील, अग्नि भूमीचे दहन करील, आकाश कोसळून लोकाच्या डोक्यावर पडेल अन्न विष होईल, आणि राजा स्वतःच अन्यायाने आचरण करील, तर त्याला प्रतिबंध कोणीं करावा ? "

---

स्थिरत्वमाचिरद्युतौ तमसि कोऽपि बंधग्रहो
विधौ किमपि सौरभ मधुनि काऽपि वर्णात्मता ॥
शिरीषनवदामनि स्फुरति कोऽपि शैलोदयो
वयोऽभिनववेधसस्तदिह मन्महे कौशलम् ॥ २३४ ॥

" विद्युल्लतेचे ठायीं स्थिरत्व, अंधकारास बंधन, चंद्राचे ठायीं सुगंध, मधाचे ठायीं मनोहर रंग, शिरीषपुष्पाच्या नव्या मालेचे ठायीं विचित्र असा पर्वतोदय,—हे सर्व यौवनरूप अपूर्व ब्रह्मदेवाचे कुशलत्व होय असे आम्ही मानतो ! " वरील विद्युल्लतादि कशाकशाचे सूचक होय हे रसिकास सहज समजणार आहे.

---

ग्रीष्मकालाचें वर्णनः—

**दिक्चक्रं मृगतृष्णया कवलितं व्योमापि भास्वत्वकर-**
**च्छायाभि क्षुरित तुषानलकणप्रायाश्च भूरेणव ॥**
**पांथाः पल्लवसकुलद्रुमलताकुंजे मुहुः शेरते**
**मज्जत्कुंजरताललोलितजलाः क्षुभ्यंति तोयाशयाः ॥ २३५ ॥**

" साऱ्या दिशा मृगजळानीं व्याप्त झाल्या आहेत, आकाशही सूर्याच्या प्रखर किरणांनीं जणों काय कापलें आहे, पृथ्वीची धूळ आगीच्या ठिणग्याप्रमाणे तप्त झाली आहे, पांथस्थ लोक दाट पालवीच्या लताकुंजांत विसावा घेत आहेत, आणि पाण्याचे डोह आंत पोहणाऱ्या हत्तींच्या क्रीडेने क्षुब्ध होत आहेत. '

---

**विशाखांतं गता मेघाः प्रसवांतं हि यौवनम् ॥**
**प्रणामांत सतां कोपो याचनांतं हि गौरवम् ॥ २३६ ॥**

" विशाखा लागल्या कीं मेघाची समाप्ति झाली, स्त्री प्रसूत झाली कीं तिचें तारुण्य सपलें, नमस्कार करण्यापर्यंतच सज्जनाचा कोप राहतो आणि जोंपर्यंत कोणापाशीं याचना केली नाहीं तोंवरच गौरव ' "

---

**किमिति सखे परदेशे गमयसि दिवसान्धनाशयं लब्धुम् ॥**
**वर्षति मौक्तिकनिकरं तव भवनद्वारि कांचनी वल्ली ॥ २३७ ॥**

" हे मित्रा ! धनराशीच्या लोभास्तव परदेशांत कालक्रमण का करतोस ? अरे, तुझ्या दारीं सोन्याची वेल मोत्यांचा सडा टाकीत आहे ! " व्यंग्यार्थ उघडच आहे कीं, तुझी सुंदर स्त्री तुझ्या वियोगाच्या दुःखानें घरीं विलाप करते आहे, तर येवढें कठीण मन करून दूरदेशीं कशाला हिंडतोस ?

---

**यदि वा याति गोविंदो मथुरात् पुनः सखि ॥**
**राधाया नयनद्वंद्वे राधानामविपर्ययः ॥ २३८ ॥**

" हे सखि ! मथुरेहून पुनः जर कृष्ण जाईल, तर राधेच्या नेत्रद्वयाचे ठायीं ' राधा ' या नावाचा विपर्यय दृष्टीस पडेल. " म्हणजे तिच्या नेत्रांवाटे अश्रूंची ' धारा ' चालेल !

**बुभुक्षितैर्व्याकरणं न भुज्यते पिपासितैः काव्यरसो न पीयते ॥**
**न च्छंदसा केनचिदुद्धृतं कुलं हिरण्यमेवार्जय निष्फला गुणाः॥२३९.**

" जे क्षुधित झाले त्यास खावयास व्याकरण उपयोगी पडत नाहीं, तृषा लागली असता काव्याचा रस प्राशन करतां येत नाहीं, व वेदाध्ययनाच्या योगानें कोणीं कुटुंबभरण केले आहे असेही नाहीं, तस्मात् सर्व गुण निष्फळ समजून सुवर्णाच्या प्राप्तीचा तेवढा उद्योग करीत जा ! "

---

**पीतः क्रुद्धेन तातश्चरणतलहतो वल्लभोऽन्येन रोषा-**
**दाबाल्याद्विप्रवर्यैः स्ववदनविवरे धार्यते वैरिणी मे ॥**
**गेहं मे छेदयंति प्रतिदिवसमुमाकांतपूजानिमित्तम्**
**तस्मात्खिन्ना सदाऽहं द्विजकुलनिलयं नाथ नित्यं त्यजामि॥२४०**

" एकानें माझ्या बापास पिऊन टाकला, दुसऱ्यानें नवऱ्यास लाथ मारली, माझी वैरिणी जी सरस्वती तिला विप्रवर्य नेहेमीं आपल्या मुखांत बाल्यावस्थेपासून वागवतात. तसेंच उमेच्या नवऱ्याची पूजा करण्याकरतां माझ्या घराचा ( कमलाचा ) दररोज छेद करतात. यास्तव सदा खिन्न होऊन मी ब्राह्मणाचें घर नेहेमीं वर्ज करते ! "

---

**मनसःपरमाणुतां वदंतः कथमद्यापि न तार्किकास्त्रपंते ॥**
**कनकाचलजित्वरस्तनीनां युवतीनामपि यत्र संनिवेशः ॥२४१॥**

" मन हें परमाणुमात्र आहे असें म्हणणारे जे तार्किक ( तर्कशास्त्रवेत्ते ) त्यास अद्याप लाज कशी वाटत नाहीं ? पहा कीं, त्याच परमसूक्ष्म मनाचे ठायीं कनकपर्वतास तुच्छ करणारे स्तन ज्यांचे अशा युवतींचाही रिघाव होतो ! " यांतील तात्पर्य श्लेषरूपानें असें आहे कीं, कनकाचलास म्हणजे मेरूसही जिंकणार ( अर्थात् त्याहूनही विशाल ) असे ज्यांचे शरीरावयव त्यांहीं ज्याचे ठिकाणीं मावतात त्याचें परिमाण इतकें अत्यल्प कसें असेल ?

---

**आपदो महतामेव महतामेव संपदः ॥**
**क्षीयते वर्धते चंद्रः कदाचिन्नैव तारका. ॥ २४२ ॥**

" संपत्ति व विपत्ति ह्या दोन्ही दशा मोठ्यासच लागू आहेत, पहा चंद्रालाच क्षयवृद्धि आहेत, तारकास नाहींत ! "

**उष्ट्राणां च गृहे लग्नं खरा मंगलपाठकाः ॥**
**परस्परं प्रशंसंति अहो रूपमहोध्वनिः ॥ २४३ ॥**

" उंटाच्या घरीं लग्न उभे राहिले असता मंगलाष्टक म्हणायास गर्दभाचार्यांची योजना झाली, मग जावईबोवा व उपाध्येबोवा एकमेकाची प्रशंसा करतात—काय हो मनोहर रूप ! कंठ तरी केवढा गोड हो ! "

---

**खलः सत्क्रियमाणोऽपि ददाति कलहं सताम् ॥**
**दुग्धपुष्टोऽपि किं याति वायस कलहंसताम् ॥ २४४ ॥**

" खलाचा सत्कार केला तरी तो सज्जनाशीं कलह केल्याशिवाय राहात नाहीं. कसें ? तर कावळ्यास दुधाने जरी पोसला तरी तो कधींही कलहंस होईल काय ? "

---

पार्वतीच्या विरहावस्थेचे वर्णनः—

**धम्मिलं न परिष्करोति कुसुमैर्नालंकरोत्याननम्**
**लीलाकीरकिशोरमादरतया नालापयत्याकुला ॥**
**नोल्लासं प्रतिपद्यते न तनुते संलापमालीजनै-**
**र्म्लाना चंपकमालिकेव विपिने मेनात्मजा वर्तते ॥ २४५ ॥**

" ही आपला बुचडा फुलांनीं अलंकृत करीत नाहीं, मुखास सुशोभित करीत नाहीं, दुःखित होऊन माक्षेपाने क्रीडाशुकाशीं बोलत नाहीं, उल्लासवृत्ति धारण करीत नाहीं, सखीजनाशींही भाषण करीत नाहीं, तर रानात जशी चंपकमाला सुकून जाते त्याप्रमाणे ही मेनेची कन्या खेदयुक्त झालेली आहे ! "

---

**मणिहारलता विभाति तन्व्याः कुचसिंहासनसीम्नि तस्थिवांसम् ॥**
**अभिषेक्तुमनंगदेवराज गलशंखाद्गलितेव दुग्धधारा ॥ २४६ ॥**

" तन्वीने मणिहाररूप लता जी कंठाचे ठायीं धारण केली आहे ती कुचसिंहासनावर अधिरूढ झालेल्या कामदेवास अभिषेक करण्याकरिता शंखाकृति जो कंठ त्यापासून गळणारी दुग्धधाराच काय याप्रमाणे भासते ! "

---

दातुः परोपकृतिनिर्भरचित्तवृत्तेरासन्नदूरगणना न हि संश्रितेषु ।।
भानुर्विकासयति हंत सरोजखंडं पाणिस्थपंकजसमं भुवनांतरेषु२४७

" परोपकाराविषयीं ज्याची चित्तवृत्ति सदा उल्हासयुक्त अशा दात्याचा आश्रितजनांविषयीं दूरसमीपभाव कधींही असत नाहीं, पहा कीं, सूर्य हा आपल्या हातातील कमलाप्रमाणच भुवनांतरीं असणाऱ्या कमलसमुदायासही विकासवितो !"

---

अक्षराणि समश्रेणिवर्तुलानि घनानि च ।।
परस्परविलग्नानि तरुणीकुचकुंभवत् ।। २४८ ।।

" अक्षरे हीं तरुणीकुचाप्रमाणे सारख्या ऊचींचीं, वर्तुळ घन आणि परस्पर विलग्न अशीं असावीं ! "

---

कोणी विरहिणी आपल्या सखीबरोबर प्रियकरास निरोप धाडतः—

वाच्यं तस्मै सहचरि भवद्दूरविश्लेषवह्नौ
स्नेहैरिद्धे मम वपुरिदं कामहोता जुहोति ।।
प्राणानस्मै तदहमुचितां दक्षिणां दातुमीहे
तत्राऽऽदेशो भवतु भवतां यत्त्वमेषामधीशः ।। २४९।।

" हे सखी ! त्याला असं जाऊन सांग कीं, स्नेहयोगाने ( ' स्नेह ' शब्द श्लिष्ट आहे ) वृद्धीस पावलेला जो विरहाग्नि त्यात कामरूप यष्टा माझ्या शरिराची आहुति देत आहे व अशा प्रसंगास उचित अशी प्राणरूप दक्षिणा समर्पण करण्याचे माझे मनोगत आहे, पण त्याचे स्वामित्व आपल्याकडे असल्यामुळे आपणास विचारायास धाडले आहे, तर याविषयीं आज्ञा व्हावी ! "

---

सूर्यावर उत्प्रेक्षाः—

कीलालैः कुंकुमानां सकलमपि जगज्जालमेतन्निषिक्तम्
मुक्ताश्चोन्मत्तभृंगा विघटितकमलक्रोडकारागृहेभ्यः ॥
उत्सृष्टं गोसहस्रं बहलकलकलः श्रूयते च द्विजानाम्
भाग्यैर्वृंदारकाणां हरिहयदयिता सूयते पुत्ररत्नम् ॥२५० ।।

" इंद्राची पत्नी ( प्राची ) देवाच्या भाग्येकरून पुत्ररत्नास प्रसवली, म्हणून साऱ्या जगभर केशराचे सडे पडले आहेत, उन्मत्त जे भृंग त्यास कमलबंधनरूप कारागृहातून मुक्त केले आहेत, हजारो गाई सोडून दिल्या आहेत आणि द्विजसमुदायाचा सारखा घोष होत आहे ! "—' द्विज ' व ' गो ' शब्दावरील श्लेष व एकदर वर्णनाचा दुसरा अभिप्राय मार्मिकास सहज कळणार आहे.

---

उपमैका शैलूषी संप्राप्ता चित्रभूमिकाभेदान् ॥
रंजयति काव्यरंगे नृत्यन्ती तद्विदां चेतः ॥ २५१ ॥

" उपमा ही नटी निरानिराळे वेष घेऊन काव्यरूप रंगभूमीवर नृत्य करते, व तत्त्ववेत्ते जे सहृदय रसिक त्यांच्या चित्ताचे रंजन करते. " हीं वेषांतरें रूपक, उत्प्रेक्षा, अपह्नुति, विरोधाभास, श्लेष, दृष्टांत, निदर्शना इत्यादि होत.

---

रात्रिर्नीरजानिकरा नीरजानिकरापरिष्कृता सरसी ॥
अपि भजते न वरसभा नवरसभावज्ञवार्जिता शोभाम् ॥ २५२ ॥

" चंद्रहीन रात्र, कमलसमुदायानें न शोभणारें सरोवर आणि नवरस व अष्टभाव जाणणारे पंडित जींत नाहींत अशी मोठी सभा हीं तिन्ही शोभा पावत नाहींत. "

---

खलानां धनुषां चापि सद्वंशजनुषामपि ॥
गुणलाभो भवेदाशु परहृद्भेदकारकः ॥ २५३ ॥

" सद्वंशापासून ( सत्कुलापासून—चांगल्या वेळूपासून ) झाले असले तरी खल व धनुष्य यास गुणलाभ ( उत्कर्षलाभ—रज्जूलाभ ) झाला न झाला की, त्याचा परिणाम दुसऱ्याच्या हृदयाचा भेद (दोन्ही अर्थ स्पष्टच आहेत) हा व्हावयाचा ! "

---

यातस्यास्तमनंतरं दिनकृतो वेषेण रागान्वितः
स्वैरं शीतकरः करं कमलिनीमालिंगितुं योजयन् ॥

**शीतस्पर्शमुपेत्य संप्रति तया रुद्धे मुखांभोरुहे**
**हासेनैव कुमुद्वतीवानितया वैलक्ष्यपांडूकृतः ॥ २५४ ॥**

" सूर्य अस्तास गेलासा पाहून चंद्र हा रागेकरून ( अनुरागाने—संध्यारागाने ) युक्त होऊन सूर्याच्या वेषाने कमलिनीस बळेंच कराने ( हाताने--किरणाने ) आलिंगायास जो प्रवृत्त झाला तो त्याच्या शीतल स्पर्शावरून त्याम अन्य समजून तिनें आपले मुख झाकले, हे सर्व पाहून चंद्राची स्त्री जी कुमुद्वती तिने मत्सरभावाने हास्यवदन केले, त्याच्या योगाने चंद्र खजील होऊन तो फिका झाला ! "

---

**जयश्रिय कृपाणीय वेणी नानाख्यभूपते ॥**
**अस्यां करगृहीतायामसावभिमुखी तव ॥ २५५ ॥**

" नाना नामक भूपाची तरवार ही जयश्रीची वेणीच होय. ती हातात आली असतां जयश्री अर्थात अनुकूल झालीच ! " *

---

**सूचीमात्रविभेदसम्रमगुणः क्षोणीशवामभुवा-**
**मुत्तुंगस्तनमंडलेषु लभते लीलारतिं कुंचकः ॥**

---

* वरील श्लोक तिसरा पेशवा जो नानासाहेब त्याविषयीं लिहिला असावा. असाच दुसरा एक श्लोक ' बल्लाळ ' या नावानें लिहिलेला आढळण्यात आला आहे —

" बल्लाळ क्षोणिपाल त्वदाहितनगरे संचरंती किरातीं
कीर्णान्यादाय रत्नान्युरुतरखदिरागारशंकाकुलाग्रीं ॥
क्षिप्त्वा श्रीखंडखंडं तदुपरि मुकुलीभूतनेत्रा धमंति
श्वासामोदप्रसक्तैर्मधुकर पटलैर्धूमशंका करोति ॥ "

वरील पेशव्याच्या वेळच्या निजामअल्लीवरही एक पद्य आढळतेः—

" क्षोणीकाम निजाम तावकभुजं लब्ध्वा भुजंगेश्वरम्
जानीमः करवालकालभुजगीं किं नाम गर्भिण्यभूत ॥
मत्तेभेंद्रविभिन्नकुंभविदलन्मुक्ताकलापच्छला-
दच्छामंडपरंपरामविरतं सूते स्फुरंती मुहुः ॥

**नाराचैर्निबिडैर्विभिन्नवपुषां पुंसां महायोधने**
**स्वर्गस्त्रीकुचकुंभसंभ्रमपरीरंभः कथं दुर्लभः ॥ २५६ ॥**

" केवळ सुईने शरीर टोंचून घेतल्याच्या गुणाने कचुकास (चाळीस) राजस्त्रियांच्या उन्नत कुचमंडलावर निरंतर लीला करावयास सांपडते, मग निबिड शरपंक्तीने ज्यांचीं शरीरें तुमुल युद्धांत छिन्नभिन्न होऊन गेलीं आहेत अशा योद्धयास अप्सरांच्या कुचकुंभालिंगनाचा लाभ घडतो यांत नवल तें कोणतें ? "

---

**अमी तिलास्तैलिक नूनमद्य स्नेहादवस्थां भवतोपनीताः ॥**
**द्वेषोऽभविष्यद्यदमीषु नित्यं तदा ह्यवस्थां किमवाकरिष्यः ॥ २५७ ॥**

" हे तेल्या ! या तिळांची केवळ स्नेहास्तव (पक्षीं, तेलाकरितां) तूं अशी अवस्था करून टाकलीस, यांचा मग नित्य द्वेषी असता, तर यांची अवस्था यापेक्षा आणखी काय झाली असती कोण जाणे ! "

---

**शांते मन्मथसंगरे रणभृतां सत्कारमातन्वती**
**वासोऽदाज्जघनस्य पीनकुचयोर्हारं श्रुतेःकुंडलम् ॥**
**बिंबोष्ठस्य च वीटिकां स्मितमुखी पाण्यो रणत्कंकणं**
**पश्चाल्लविनि केशपाशनिचये युक्तो हि बंधक्रमः ॥ २५८ ॥**

" रतिसंगर आटपला असतां रणांगणीं ज्यांनीं चांगली चाकरी बजावली त्यांचा सत्कार करण्याकरतां स्त्रीनें जघनास वस्त्रदान केलें, पीनकुचास हार व कर्णास कुंडलें अर्पिलीं, बिंबोष्ठावर तर मर्जी सुप्रसन्न होऊन त्यास विडा दिला व हस्तास रणत्कार करणारीं कंकणं बहाल केलीं, पण युद्धांत माग च्यामागेच राहिलेला जो केशपाश त्याचें मात्र राजद्रोह केल्याबद्दल बंधन केलें ! " हें असंबंधातिशयोक्तीचें उदाहरण होय.

---

**वैयाकरणकिरातादपशब्दमृगाः क यांतु सन्त्रस्ताः ।**
**यदि नटगणकचिकित्सकवैतालिकवदनकंदरा न स्युः ॥२५९॥**

" वैयाकरणरूप किरातापासून भय पावलेले जे अपशब्दरूप मृग त्यांनीं एरवीं कोठें जावें ?—जर नट, ज्योतिषी, वैद्य, स्तुतिपाठक यांचीं मुखें हाच कोणी गुहा ह्या नसत्या तर."

**अव्याकरणमधीतं भिन्नद्रोण्या तरंगिणीतरणम् ॥**
**भेषजमपथ्यसहितं त्रयमिदमकृतं वरं न कृतम् ॥ २६० ॥**

" व्याकरणावांचून केलेले अध्ययन, फुटक्या नावेने नदी तरून जाणे व पथ्याशिवाय औषधाचे सेवन,—या तीन गोष्टी न केलेल्या बऱ्या."

---

**घटं भिंद्यात्पटं छिंद्यात्कुर्याद्वा रासभस्वरम् ॥**
**येन केन प्रकारेण प्रसिद्धः पुरुषो भवेत् ॥ २६१ ॥**

" चव्हाट्यावर जाऊन घागर फोडून टाकावी, वस्त्रे फाडीत बसावे, किंबहुना गर्दभासारखा स्वरही काढावा; पण कोणत्या तरी रीतीनें पुरुषाने लोकप्रसिद्ध व्हावे ! "

---

**चित्रं तपति राजेंद्र प्रतापतपनस्तव ॥**
**अनातपत्रमुत्सृज्य सातपत्रं द्विषद्गणम् ॥ २६२ ॥**

" हे राजा ! तुझ्या प्रतापसूर्याचा हा काय चमत्कार आहे पहा, की ज्याच्या डोक्यावर छत्र नाहीं त्यास सोडून छत्र धारण करणाऱ्या शत्रुसैन्य तो ताप देतो." हा विभावनालंकार होय.

---

**मृत्युः शरीरगोप्तारं वसुभाजं वसुंधरा ॥**
**दुश्चारिणीव हसति स्वपतिं पुत्रलालनात् ॥ २६३ ॥**

" ज्याप्रमाणें जारिणी स्त्री आपल्या पतीस पुत्रलालन करताना पाहून हंसते, त्याप्रमाणें मृत्यु हा शरिराची जोगवण करणाऱ्या मनुष्यास व भूमि धनरक्षण करणारास हसते ! "

---

कोणी मानिनी रागाने आपल्या वल्लभास म्हणतेः—

**साल्हादं वचनं प्रयच्छसि न मे नो वांछितं यच्छसि**
**प्रायः प्रोच्छ्वसिषि द्रुतं हुतवहज्वालासमं रात्रिषु ॥**
**कंठाश्लेषपरिग्रहे शिथिलता यन्नादराच्चुंबसे**
**तत्ते धूर्त हृदि स्थिता प्रियतमा काचिन्ममेवापरा ॥ २६४ ॥**

" तू माझ्याशीं आल्हादयुक्त भाषण करीत नाहींस, मला इष्ट विचारीत

नाहींस, रात्रीं तुझे निरंतर उष्ण निश्वास चाललेले असतात, कंठालिंगनाचे ठायीं शिथिलता दृष्टीस पडते व अधरपानाविषयींही तुझी आसक्तता दिसत नाहीं; तेव्हां हे धूर्ता ! या सर्व चिन्हांवरून मी असें समजतें कीं, कोणी माझ्याहून निराळी प्रियतमा तुझ्या हृदयाचे ठायीं वास करीत असावी !''

---

स्मर्तव्योऽहं त्वया कांते न स्मरिष्याम्यहं तव ॥
स्मरणं चेतसो धर्मस्तच्चेतो भवता हृतम् ॥ २६५ ॥

''हे कांते ! तूंच माझें स्मरण करावें, मला तुझें स्मरण होणार नाहीं, कां तर, स्मरण हा चित्ताचा धर्म होय आणि चित्तच मुळीं तूं हरण करून टाकलें आहेस !''

---

सर्वस्वापहरो न तस्करगणो रक्षो न रक्ताशनः
सर्पो नैव बिलेशयोऽखिलनिशाचारी न भूतोऽपि च ॥
अंतर्धानपटुर्न सिद्धपुरुषो न व्याशुगो मारुतस्तीक्ष्णास्यो
न तु सायकस्तमिह ये जानंति ते पंडिताः ॥ २६६ ॥

''सर्वस्वाचें हरण करणारा (पक्षीं, सर्व निद्रा घालवणारा) असून तस्कर नव्हे, रक्ताचे प्राशन करीत असून राक्षस नव्हे, बिळांत दडून असणारा असून सर्प नव्हे, निशाचर खरा पण भूत नव्हे, अंतर्धान करण्याविषयीं कुशल असून सिद्ध पुरुष नव्हे, गतीनें चपल असून वायु नव्हे, तीक्ष्णमुख असून बाण नव्हे,—असा कोण हे जो जाणतो तो पंडित होय !'' या कोड्याचें उत्तर 'ढेंकूण' होय. पहिल्या विशेषणाचा श्लेषार्थ वर दिलाच आहे; बाकीचे उघडच आहेत.

---

सदूषणाऽपि निर्दोषा सखराऽपि सुकोमला ॥
नमस्तस्मै कृता येन रम्या रामायणी कथा ॥ २६७ ॥

''सदूषण (दूषणयुक्त, दूषणनामक राक्षसाचा जींत संदर्भ आहे) असून निर्दोष आणि सखर (कठोर; खरनामक राक्षसाचे जींत कथानक आहे) असून अत्यंत कोमल, अशी जी रामायणकथा ती ज्यानें केली त्यास वंदन असो !''

**आच्छादयसि किं मुग्धे वस्त्रेणाधरपल्लवम् ॥**
**खंडिता एव शोभंते वीराधरपयोधराः ॥ २६८ ॥**

"हे मुग्धे ! आपल्या अधरपल्लवाचें वस्त्रानें का आच्छादन करतेस? अगे, वीर, अधर आणि पयोधर हे क्षतांकित झाले असताच विशेष शोभतात !"

**मंदमंदगमना करिणी किं वा विशालनयना हरिणी किम् ॥**
**पूर्णचंद्रवदना रजनी किं पश्य गच्छति सखे तरुणी किम् ॥ २६९ ॥**

"हे मित्रा ! ती पहा पहा राजमार्गानें कोण जाते आहे? ती मंदमंद गमन करणारी हस्तिनी आहे काय? अथवा विशालनेत्रा हरिणी आहे काय? किंवा पूर्णचंद्र हेंच जिचें वदन अशी पौर्णमासी रात्रि आहे काय?"

---

**पंडिते चैव मूर्खे च बलवत्यपि दुर्बले ॥**
**ईश्वरे च दरिद्रे च मृत्योः सर्वत्र तुल्यता ॥ २७० ॥**

"पंडित, मूर्ख, बलवान्, दुर्बल; धनाढ्य, दरिद्री, या सर्वांस मृत्यूनें ग्रासलें आहे. कोणी सुटला आहे असें नाहीं !"

---

**वंगाः कथमंगाः कथमित्यनुयुंक्ते तथा देशान् ।।**
**कीदृक्कृतांतपुरमिति कोऽपि न जिज्ञासते मूढः । २७१ ॥**

"वंगदेश कसा आहे, * अंग कसा आहे, इत्यादि प्रकारें इहलोकींच्या अल्पमात्र वस्तीच्या देशाविषयीं मूढ जे प्रापंचिक जन त्यांची चौकशी चालत असते, पण कृतांतपुर म्हणजे यमनगरी कशी आहे हिजविषयीं कोणाचीही जिज्ञासा प्रगट होत नाहीं !"

---

**दाराः पुत्रेषु रताः पुत्राः पितृधनपरिग्रहव्यग्राः ॥**
**जननी रोदनशरणा परलोकगतस्य को बंधुः ॥ २७२ ॥**

"स्त्रिया पुत्राकडे पाहून शोक आवरतात, पुत्र पितृधनाच्या विभागाविषयीं तत्पर होऊन त्या व्यवस्थेला लागतात, आई दुःख करीत असते;

---

* वंग देशाचें सांप्रत नांव बंगाल आहे, व अंगास बहार म्हणतात. भारतीय युद्धांतला प्रसिद्ध सेनापति जो कर्ण त्यास दुर्योधनानें अंगदेशाचें आधिपत्य दिलें होतें हे वाचकांस माहीत असेलच.

ण जो बिचारा प्राणी परलोकाची वाट धरीत असतो त्याचा सांगाती कोण होतो ! "

---

हृदि लज्जोदरे वन्हिः स्वभावादग्निरुच्छिखः ॥
तेन मे दग्धलज्जस्य पुनरागमनं नृप ॥ २७३ ॥

" हे राया ! माझ्या हृदयाचे ठायीं लज्जा आहे व उदराचे ठायीं वन्हि आहे, तेव्हां अग्नीच्या ऊर्ध्वज्वलनरूप धर्मामुळे माझी लज्जा जळून मी तुजकडे याचना करण्यास आलों आहे ! " तात्पर्य हे कीं, मध्यान्हींच्या समयापुढें लज्जेला टिकाव धरवत नाहीं.

---

मातस्तर्णकरक्षणाय यमुनाकच्छं न गच्छाम्यहम्
कस्माद्वत्स पिनष्टि पीवरकुचद्वंद्वेन गोपीजन ॥
भ्रुसंज्ञाविनिवारितोऽपि बहुशो जल्पन्यशोदाग्रतो
गोपीपाणिसरोजमुद्रितमुखो गोपीपति पातु व ॥ २७४ ॥

" आई ! गाईच्या वत्साचे रक्षण करण्यास मीं यमुना-तीरीं जाणार नाहीं. यशोदा विचारते, ' कारे मुला ? ' कृष्ण उत्तर करतो, ' अगे या गोपी पीनस्तनद्वयेंकरून मला चेंगरू पाहातात,'—याप्रमाणे तो बोलत असता गोपी भ्रूसंज्ञाच्या योगानें त्यास दाबीत होत्या, तरीही तो जेव्हां ऐकेना तेव्हा ज्याचें मुख गोपींच्या पाणिसरोजानीं मुद्रित झालें आहे असा तो गोपीपति तुमचें रक्षण करो ! "

---

किमकारि न कार्पण्यं कस्यालंघि न देहली ॥
अस्य पापोदरस्यार्थे किमनाटि न नाटकम् ॥ २७५ ॥

" या दुष्ट उदराच्या भरणार्थ काय काय दैन्य आम्हीं दाखविलें नाहीं ! कोणाकोणाचा उंबरठा उलडला नाहीं ! व कोणकोणते नाटक केलें नाहीं ! "

---

संपोष्यं सदपत्यवत्परकराद्रक्ष्यं च सुक्षेत्रव-
त्संशोध्यं व्रणिनाऽगवत्प्रातिदिनं वीक्ष्यं च सन्मित्रवत् ॥
बध्यं बंधवदश्लथं न हि न विस्मर्यं हरेर्नामव-
न्नैवं सीदति पुस्तकं किल कदाऽप्येतद्गुरूणां वचः ॥ २७६ ॥

" पुस्तकाचे उत्तम अपत्याप्रमाणे सपोषण करावे, उत्तम क्षेत्राप्रमाणे दुस-ऱ्याच्या ते कधीं हातीं लागू देऊं नये, जखमी मनुष्याच्या शरीराप्रमाणे वरचेवर त्याचे शोधन करावे, जिवलग मित्राप्रमाणे दररोज त्याचें अवलोकन करावें, बंधनांत ठेवल्याप्रमाणे त्यास बळकट बांधावें, हरीच्या नामाप्रमाणे त्याचे कधीं विस्मरण होऊं देऊं नये,—अशा तऱ्हेने पुस्तक ठेवलें असता ते वाईट होत नाहीं असें गुरूचें सांगणें आहे ! "

---

**मौने मौनी गुणिनि गुणवान्पण्डिते पण्डितोऽसौ**
**दीने दीन सुखिनि सुखवान्भोगिनि प्राप्तभोग ॥**
**मूर्खे मूर्खो युवतिषु युवा वाग्मिषु प्रौढवाग्मी**
**धन्यः कोऽपि त्रिभुवनजयी योऽवधूतेऽवधूतः ॥ २७७ ॥**

" मुनिसमुदायात मौन धारण करणारा, गुणिजनांशीं समागम झाला असता गुण प्रगट करणारा, पंडितमंडळींत पंडित, दीनाचे ठायीं दीन, सुखी असणाऱ्यांशीं सुखी, विलासी जनांशीं विलासी, मूर्खांशीं मूर्ख, तरुण स्त्रियांशीं तरुण, वावदूकांशीं वक्ता व वैराग्यांशीं वैरागी,—याप्रमाणे जो सर्वांशीं रंग पाहून वागणारा तो त्रिभुवनजयी चतुर पुरुष धन्य होय ! "

---

✓ **उच्छिष्टं शिवनिर्माल्यं वमनं शवकर्पट ॥**
**काकविष्ठासमुत्पन्न पंचैतेऽतिपवित्रका ॥ २७८ ॥**

" उच्छिष्ट, शिवाचें निर्माल्य, वमन. प्रेतचीवर आणि काकविष्ठेपासून उत्पन्न झालेला,—हीं पांच अतिपवित्र होत ! " हीं पाच अनुक्रमे करून दूध, गंगा, मध, रेशीम व पिंपळ होत.

---

गोपी सापत्नभावाने मुरलीस म्हणतातः—

**सौधं धाम मुखांबुजं भगवतो वक्त्रासवप्राशनम्**
**शय्या चाधरपल्लवोऽथ मृदुलांगुष्ठस्तदुच्छीर्षकम्**
**अंगुल्यस्तव सेवने निरलसा ब्रम किमन्यत्सुखम्**
**हा हा वैरिणि हे तथाऽपि मुरलि त्वां नैति निद्राऽपि किमू २७९**

"हे मुरली ! अमृताचें केवळ गृहच असें जे भगवताचे मुखांबुज त्यातील

आंसवाचें ( मद्याचें ) तुला प्राशन घडते, त्याचा अधरपल्लव हीच तुझी कोमल शय्या होय, मृदुल जो अगुष्ठ तो तुझें उपधान ( उशी ) होय, इतर अगुली या तुझ्या सेवनाविषयीं ( चरणसवाहनाविषयीं ) निरंतर तत्पर आहेत, आणखी यापेक्षा सुख ते कोणतें असावे ?—पण इतके असून हे वैरिणी ! तुला निद्रा ती कशी येत नाहीं ! '' बोलणारणींचा भाव अर्थात् हा होय कीं, आपल्या वैरिणीस झोप लागून ती शब्द करीनाशी झाली कीं तिचें सर्व भाग्य आपल्या वाट्यास येईल !

---

अहं तेनाऽऽहूता किमपि कथयामीति विजने
समीपे चाऽऽसीना सरलहृदयत्वादवगता ॥
ततः कर्णोपांते किमपि वदताऽऽघ्राय वदनम्
गृहीत्वा धम्मिल्लं मम सखि निपीतोऽधररसः ॥ २८० ॥

" मला कांहीं सागायाचें आहे असे म्हणून त्याने मला एकांती बोलाविले, तेव्हा मीं भोळया भावानें त्याच्याजवळ गेले, तो त्या धूर्तानें कानाशीं लागण्याचे मिष करून माझ्या मुखाचे आघ्रण केले आणि कचप्रांत ग्रहण करून अधररसाचें पान केले !"

---

संग्रामे सुभटेंद्राणां कवीनां कविमंडले ॥
दीप्तिर्वा दीप्तिहानिर्वा मुहूर्तादेव जायते ॥ २८१ ॥

" संग्रामाचे ठायीं मोठ्या मोठ्या योद्धयांचे व कविमंडलात कवींचे तेज पडणे किंवा तेजोहानि होणं, हीं दोन्ही एका घटकेत होऊन जातात !'

---

शंभुः श्वेतार्कपुष्पेण चंद्रमा वस्त्रतंतुना ॥
अच्युतः स्मृतिमात्रेण साधवः करसंपुटैः ॥ २८२ ॥

" शिव पांढऱ्या रुईच्या फुलानें, चद्र वस्त्राच्या दशेने, विष्णु केवळ स्मरणानें व साधु हस्तांजलीनें म्हणजे केवळ नमस्कारानें प्रसन्न होतात !"

---

✓ कोणी विषयी विरक्तता पावून कृत्यकर्माबद्दल अनुताप पावतो:—

कुचौ तु परिचर्चितुं परिचितं चिरं चंदनम्
कृताः परमुरोजयोः परिसरेऽरविंदस्रजः ॥

**स्तुतिर्नतिरपि स्मृतिर्वरतनौ कृतैवादरा-**
**दिदं तु निखिलं पुनर्विरचितं मया नेश्वरे ॥ २८३ ॥**

" मीं चंदनाचा जो प्रयोग केला तो निरतर स्तनलेपनार्थ केला; कमला च्या माला ज्या घातल्या त्या स्तनाच्या आसमतांतच घातल्या; स्तवन व वदन हींहि आदरेंकरून सुदर स्त्रियाचींच केलीं,—पण हें सर्व परमेश्वराचे ठिकाणीं माझ्याकडून कधींही झालें नाहीं."

---

**धर्माख्याने स्मशाने च रोगिणां या मतिर्भवेत्**
**सा सर्वदैव तिष्ठेच्चेत्को न मुच्येत बंधनात् ॥ २८४ ॥**

" धर्मविषयक आख्यानाचे श्रवण झालें असतां, स्मशानांत व रुग्णावस्थेंत जी मनाची स्थिति होते तीच जर सदोदित राहील तर कोण संसारतापापासून मुक्त होणार नाहीं ? "

---

**सुभाषितज्ञेन जनेन साकं संभाषणं सुप्रभुसेवनं च ॥**
**आलिंगनं तुंगपयोधराणां प्रत्यक्षसौख्यं त्रयमेव लोके ॥ २८५॥**

" सुभाषिताच्या ज्ञानानें ज्यास वाक्चातुर्य प्राप्त झाले आहे अशा मनुष्याशीं सभाषण; चांगल्या प्रभूची सेवा व पूर्णयौवना ज्या स्त्रिया त्याचे आलिंगन, हीं तीन या लोकींचीं मोठीं सुखे होत. "

---

**अहो बत विचित्राणि चरितानि महात्मनाम् ॥**
**लक्ष्मीं तृणाय मन्यंते तद्भारेण नमंति च ॥ २८६ ॥**

" महात्मे जे पुरुष त्याचे चरित्रवैचित्र्य काय सागावें ! पहा कीं, ते लक्ष्मीला तृणासमान मानतात आणि तिच्याच भारानें नम्रही होतात. " तात्पर्य हे कीं, लक्ष्मीच्या प्राप्तीनें सज्जन उद्दाम न होता उलटे लीनच होतात.

---

**मिलिते मौनमातिष्ठ वाणि प्राणसमे जने ॥**
**अंतर्गतरसाह्लादं न जानासि कदाचन ॥ २८७ ॥**

" हे वाणि ! प्राणप्रिय जनाची गाठ पडली असता तू आपली मौन

धारण करून असत जा;का तर, हृदयगत जो आल्हाद त्याचा तुला मुळींच अनुभव घडत नाही !"

---

**उद्घोष्यंते स्म वेश्मन्यशनविरहिते निर्धने श्रोत्रियाणाम्**
**यत्र श्यामाकबीजान्यपि चटकवधूचंचुकोटिच्युतानि ॥**
**देवे दातर्यकस्माच्चपलशिशुकराकृष्टमुक्तावलीक-**
**भ्रष्टास्तत्रैव दृष्टा युवतिभिरलसं घूर्णिता मौक्तिकौघा ॥ २८८ ॥**

" निरंतर नकारघंटा वाजणाऱ्या ज्या दरिद्र ब्राह्मणाच्या घरात चिमणीच्या चोंचींतून पडलेले दाणेही वेचले जात असत, तेथेंच देवाच्या दयेनें संपत्ति आली असता काय चमत्कार दृष्टीस पडू लागला पहा, कीं, पोरांनीं दांडगाईने गळ्यातले मोत्याचे पेडे ओढून त्यातले दाणे चोहोंकडे घरंगळत चालले असता नायका त्याकडे उगीच मौजेने पाहत राहू लागल्या !"

---

कोणी कवि अकबराच्या तरवारीचें वर्णन करतोः—

**हस्तांभोजालिमाला नखविधुहरिणश्यामलच्छायवीची**
**तेजोग्नेर्धूमधारा लवणिमसरसीमुग्धशैवालवल्ली ॥**
**वैरिश्रीवेणिदंडो वितरणकरिणो गंडदानप्रणाली**
**वल्गत्यंभोधर श्रीरकबरधरणीपालपाणौ कृपाणः ॥ २८९ ॥**

" हस्तकमलापासून निघालेली भ्रमरमालाच काय, कीं नखचंद्रांवरील हरिणाच्या श्यामलप्रभेची लहरीच काय, कीं प्रतापाग्नीची धूमधाराच काय, कीं लावण्यसरोवरातील सुंदर शैवाललताच काय, कीं शत्रूच्या लक्ष्मीच्या वेणीचा पडच काय, कीं दानरूप हस्तीच्या मदस्रावाची नलिकाच काय,— असा हा अकबर राजाच्या हातातील मेघनील कृपाण शोभा पावत आहे !'

---

कोणी चतुर नाविक कोण्या स्त्रीयेस म्हणतोः—

**तारयामि यमुनाप्रवाहतस्त्वां वरोरु तर पण्यमंतरा ॥**
**द्रागपाकुरु दुकूलमाननादाविरस्तु मम नावि चंद्रमाः ॥ २९० ॥**

" हे रंभोरु ! या उच्छृंखल यमुनाप्रवाहावरून तुला आतरावांचून मी

नेऊन पोचवितो, येवढें मात्र कर की तोंडावरील बुरखा पलीकडे काढ आणि माझ्या नावेत चंद्रम्यास प्रगट होऊं दे ! "

---

हिरण्यकश्यपूची उक्तिः—

**यत्राकुंठितदंदितंतमुसलान्याचूर्णितान्याहवे**
**धारा यत्र पिनाकपाणिपरशोराकुंठिता वक्षसि ॥**
**तन्मे तावदुरो नृसिंहकरजैर्व्यादीर्यते सांप्रतम्**
**दैवे दुर्जनतां गते तृणमपि प्रायेण वज्रायते ॥ २९१ ॥**

"ज्या माझ्या उरस्थळावर हत्तींची आकुंठित दंतमुसले चूर्ण झालीं व शिवाच्या परशूची धारही जा.र बोथटली, ते आज नृसिंहाच्या नखांनीं विदीर्ण होत आहे, तेव्हा दैव दुष्ट झालें असता तृणही वज्रप्राय होतें असें म्हटलें पाहिजे ! "

---

नववधूच्या लज्जाऱ्हासाचें कोणी मार्मिक कवि वर्णन करतो.—

**अन्योन्यस्य निरीक्षणादपगता नेत्रान्मुखे ऱ्हीः स्थिता**
**संलापाद्वदनं विहाय कुचयोः सीमामुपेत्य स्थिता ॥**
**गाढालिंगनतस्ततः कुचतटीं संत्यज्य नीविं गता**
**भर्तुस्तत्र करे गते किमभवत्सा तन्न जानीमहे ॥ २९२ ॥**

" परस्पराची दृष्टादृष्ट झाली असता लज्जा ही नेत्रापासून निघून मुखाचे ठायीं जाऊन बसली, पुढें संभाषणाच्या वेळीं मुखापासून निघून कुचसीमेशीं जाऊन थडकली,नंतर गाढालिंगनप्रसंगीं कुचतटापासून नीविप्रदेशीं पोंचली, पण पुढें भर्त्याच्या करेंकरून नीवीचाही मोक्ष झाल्यावर ती कोणीकडे नाहींशी झाली ती आम्हांस कळत नाहीं ! "

---

**अकृत्वा पौरुषं या श्रीर्विकासिन्यपि किं तया ॥**
**जरद्गवोऽपि चाश्नाति दैवादुपगतं तृणम् ॥ २९३ ॥**

" पौरुष केल्यावाचून जी आयतीच प्राप्त झालेली संपत्ति तींत काय तात्पर्य आहे ? म्हातारा झालेला बैलही यदृच्छेनें उगवलेलें गवत खातो ! "

---

**लोभाविष्टो नरो वित्तं वीक्ष्यते न च चाऽऽपदम् ॥**
**दुग्धं पश्यति मार्जारो यथा न लगुडाहतिम् ॥ २९४ ॥**

" लोभाविष्ट पुरुषाची दृष्टि द्रव्यावर असते, पण ते प्राप्त होतांना जी विपत्ति येणार ती त्याला दिसत नाहीं; जसें मांजराची नजर दुधावर असते. पण बडग्याकडे त्याचे लक्ष असत नाहीं ! "

---

**चातकस्य मुखचंचुसंपुटे नो पतंति यदि वारिबिंदवः ॥**
**सागरीकृतमहीतलस्य किं दोष एव जलदस्य दीयते ॥ २९५ ॥**

" चातकाच्या चचुपुटात जर पाण्याचे बिंदु पडले नाहीत, तर सारी पृथ्वी जळमय करून टाकणारा जो मेघ त्यासच दोष द्यावा काय ? "

---

**'अंसाकृष्टदुकूलया सरभसं गूढौ भुजाभ्यां स्तनौ,**
**आकृष्टे जघनांशुके कृतमधः संसक्तमूरुद्वयम् ॥**
**नाभीमूलनिबद्धचक्षुषि तथा व्रीडानतांग्या प्रिये**
**दीपः फूत्कृतिवातवेपितशिख कर्णोत्पलेनाऽऽहत ॥ २९६ ॥**

" खांद्यांवरून दुकूलाचे अपनयन केले असता प्रियेनें भुजस्वस्तिक करून उरसिजाचे निगूहन केले; जघनांबराचें आकर्षण केलें असता आपले उरुद्वय तिनें अत्यत निरतर केले, आणि शेवटीं वल्लभाची नाभीमूलनिबद्ध दृष्टि पाहून दीपज्योतीवर फूत्काराचा प्रयोग केला, पण त्यानेही कार्य होत नाहींसे पाहून शेवटीं कर्णावरील उत्पल दिव्यावर टाकले ! "

---

'संभोगोत्तर स्त्रीच्या अवस्थेची व मुक्तस्थितीची कोणी कवि समता घालतो:—

**संन्यासमकृत कांची जहौ कलत्रं दुकूलमबलाया ॥**
**तत्याज रागमधरो मुक्तिमुरीचक्रिरे चिकुरा ॥ २९७ ॥**

" कांचीनें सन्यासवृत्ति धारण केली, अधरवस्त्राने कलत्रत्याग केला, अधरानें रक्तता टाकून दिली आणि केशांनी मुक्तीची स्थिति वरिली ! " श्लेष वेगळा केला असता तात्पर्य हें कीं, मेखला गळून पडली, वस्त्राचा विरह झाला, ओंठाची लाली मोडली आणि केस सुटून मोकळे झाले.

द्रुमा पांडुप्राया धृतनिबिडगर्भाः स्त्रिय इव
प्रफुल्लास्ते कुंदा नृपतिकृतमाना इव जना ॥
पिको मंदं मंदं हृदि मदननामानि जपति
प्रभोरग्रे पूर्वापरिचितसभाक कविरिव ॥ २९८ ॥

" वृक्ष हे गर्भिणी स्त्रियाप्रमाणें निस्तेज झाले आहेत, कुंद हे राजसत्कार पावलेल्या पंडितजनाप्रमाणे प्रफुल्लित झाले आहेत आणि कोकिल हा मदनाच्या नावाचा जप मदवाणीनें आपल्याशींच करीत होत्साता राजसभेशीं अपरिचित असणाऱ्या कवीप्रमाणे भासत आहे. "

---

मुक्ताः पतंति भूमौ बाला कलयंति केवलां मुक्तिम ॥
चुंबत्यंबरमवनिं विपरीते किं न विपरीतम् ॥ २९९ ॥

" मुक्त जे स्वर्गस्थ असावयाचे ते भूमीवर पडले आहेत, बाल म्हणजे अज्ञ जन ते अत्यंत मुक्ततेप्रत पावले आहेत, आणि आकाश पृथ्वीला येऊन भेटलें आहे; तेव्हा एक विपरीत झालें असता काय काय विपरीत होणार नाहीं ? " ' मुक्ताः ' ' बालाः ' व ' अंबरम् ' यांचे दुसरे अर्थ प्रसिद्धच आहेत, व एकदर श्लोकाचे तात्पर्यही तज्ज्ञाच्या लक्षात येणारच आहे.

---

सुप्रातं दिनमद्य नः परिणतं साफल्यमद्याऽऽयुषः
कर्माण्यद्य शिवंकराणि सुमहानद्योत्सवो नेत्रयोः ॥
कार्पण्येन चिराय संप्रति कृतं प्रस्थानिकं मंगलम्
यज्जागर्ति भवन्मुखेंदुरधुना दिष्ट्या दृशोरग्रतः ॥ ३०० ॥

" आज सुदिन उगवला, आयुष्याचें साफल्य पूर्ण झाले, शुभ कर्मांचे सार्थक्य झालें, नेत्रांचे पारणें फिटले आणि दैन्याने आपले बिऱ्हाड उचलले, कीं आज आपला मुखचंद्र डोळ्यासमोर प्राप्त होण्याचा योग आला ! "

---

यदीयबलमालोक्य गतः प्रेयान्वियुज्यते ॥
आलोकये कथं सख्यस्तस्य चंद्रमसो मुखम् ॥ ३०१ ॥

" हे सखींनो ! ज्याचे बळ ( चंद्रबळ ) पाहून प्रिय मार्गस्थ होतो, त्या विरहताप देणाऱ्या दुष्टाचे मुख मी कशी पाहू ! "

---

**उपाध्यायश्च वैद्यश्च ऋतुकाले वरांगना ॥**
**सूतिका दूतिका चैव कार्यांते तृणवन्मताः ॥ ३०२ ॥**

" उपाध्याय, वैद्य, ऋतुकाळी स्त्री, सुईण आणि दूती,—इतकीं सर्व-जण कार्य उरकले असता तृणवत् होतात ! "

---

**संप्राप्तोऽपि महोदधिं न वितृषो जातो जलैर्वाडवो।**
**मेघं प्राप्य च चातकोऽपि चरणौ भानुं न लेभेऽरुण ॥**
**चंद्रः शंकरशेखरेऽपि सततं सोऽपि क्षयी दृश्यते**
**प्राय. सत्पुरुषाश्रितोऽपि लभते दैवानुरूपं फलम् ॥ ॥ ३०३ ॥**

" वडवाग्नीने महासमुद्राचा आश्रय केला तरी त्याच्या जलानीं त्याची तृषा हरली नाहीं, चातकास मेघाचा आश्रय झाला तरी त्याची तहान तशीच, अरुणाने सूर्याची सेवा पतकरली तरी त्यास पाय आले नाहींत, तसाच चंद्रही शिवाच्या मस्तकीं असून देखील पूर्ववत् क्षयीच राहिला, तस्मात् सत्पुरुषाचा आश्रय प्राप्त झाला तरी कोणासही दैवानुरूपच फळ मिळते ! "

---

**मंदाकिनीपय पानं मंदाक्षीमुखचुंबनम् ॥**
**मंदरोपवनक्रीडा मंदानुष्ठानतः कुत ॥ ३०४ ॥**

" मंदाकिनीच्या उदकाचे प्राशन, लज्जामंदनयनचें मुखचुंबन आणि मंदराचलाच्या उपवनात क्रीडा, हीं तीन मंद तपाने कोठून प्राप्त होणार ? "

**तानि तानि कमलानि तज्जलं तानि षट्पदकुलानि ते खगाः॥**
**सर्वमेकसमये तु विच्युतं पंकशेषमचिरादभूत्सर ॥ ३०५ ॥**

" तीं तीं कमले, ते जल, तीं भ्रमरकुले, ते हंसादि पक्षी, हीं सर्व एका कालींच निघून गेलीं, आणि थोड्या दिवसानीं सरोवर कर्दमशेष होतें झाले ! " ही अर्थातच अन्योक्ति होय. ही आपत्तीस पोंचलेल्या कुलास किंवा देशासही लागू पडेल.

दीपो भक्षयते ध्वांत कज्जलं च प्रसूयते ॥
यदन्नं भक्षयेन्नित्यं जायते तादृशी प्रजा ॥ ३०६ ॥

" दीप हा अंधकाराचे भक्षण करतो आणि काजळास प्रसवतो. ठीकच आहे, जसें नित्य अन्न खावे त्यासारखी प्रजा होते ! "

---

ललाटे कस्तूरीतिलकमबलाः कज्जलरुचिम्
दृशोः कर्णद्वंद्वे विमलमणिताटंकयुगलम् ॥
गले मुक्तामाला शुचिवसनमंगे च सततम्
वशीकर्तुं विश्वं दधति खलु बाह्योपकरणम् ॥ ३०७ ॥

" ललाटाचे ठायीं कस्तूरीचा तिलक, डोळ्यांत अंजन, दोन्ही कानांत मणिताटंक ( रत्नांची तानिवडें ), गळ्यांत मुक्ताहार, शुचिवस्त्र निरंतर परिधान केलेलें,---या सर्व थाटावरून मला असें वाटतें कीं, स्त्रिया ह्या सर्व विश्वाच्या वशीकरणार्थ वरील साहित्य बाळगीत असतात ! " वशीकरणांत तिलक, अंजन, मणि वगैरे सामग्री अवश्य असून निरंतर मांडळ्यांत राहिलें पाहिजे हें लोकप्रसिद्धच आहे.

---

स्नेहोपपन्न इति पूर्णदशाविशेष—
शाली स्वमात्मनि वसुप्रकरं निधाय ॥
लब्धोदये तमथ गृह्णति पद्मबंधौ
दीपा भवंति कलुषा बलवान हि लोभः ॥ ३०८ ॥

" सूर्यानें अस्तगमनाच्या समयीं दीपाचे ठायीं आपला वसु ( तेज, द्रव्य )—समूह जो ठेवला, कीं हे स्नेहयुक्त ( पक्षीं, तैलयुक्त ) आहेत व पूर्णदशेनें ( संपन्नतेनें—वातीच्या अग्रानें ) विराजमान आहेत असें समजून,—तेच दीप त्यानें आपल्या उदयकालीं आपला वसुप्रकर माघारीं घेतला असतां ज्यापक्षीं मलिनमुख होतात त्यापक्षीं लोभ हा परम दुर्धर आहे असें म्हटलें पाहिजे ! "

---

मौनं कलविलंबश्च प्रयाणं भूमिदर्शनम् ॥
भृकुट्यन्यमुखी वार्ता नकार षड्विधः स्मृतः ॥ ३०९ ॥

" आपले कोणापाशीं कांहीं काम असले आणि त्याने बळकट मौन धरले, किंवा कामास उशीर लावला, अगर न भेटता चालता झाला, किंवा गांठ पडली असतां भुईकडे पाहू लागला, अथवा त्याच्या कपाळावर आठी दिसली किंवा मुद्दाम दुसऱ्याकडे पाहून बोलू लागला म्हणजे नन्नाचा पाढा समजावा. नकाराचे वरील सहा प्रकार आहेत."

---

**लज्जे त्वं मज्जसिंधौ गिरिवरशिखरं त्व च तिष्ठ प्रतिष्ठे**
**शांते प्रांते दिशांते कुरु वसतिमहो गर्व खर्वो भवाशु ॥**
**तेजः पातालमूलं भज भुवि भगवन्मान मा नाम तेऽस्तु**
**प्रेम्णैकामाश्रयंती सततममाहिमां तूर्णमाशां श्रयिष्ये ॥ ३१० ॥**

" हे लज्जे ! तू समुद्रात बुडी मार; हे प्रतिष्ठे ! तू एखाद्या मोठ्या पर्वताच्या शिखरावर जाऊन बैस, हे शांते ! दिशाच्या प्रांतभागीं तू वस्ती कर, हे गर्वा ! तूं ठेंगणा होऊन रहा; हे तेजा ! तूं पाताळाच्या तळवटीं जाऊन बैस, हे भगवता माना ! तुझें नावही येथें राहू देऊ नको,—का तर मला प्रेमानें वरून राहणारी जी द्रव्यतृष्णा तिचाच मी इतःपर अंगीकार करणार ! " तात्पर्य, धनलोभ म्हटला म्हणजे वरील साऱ्या मंडळीस पूर्ण रजाच मिळाली म्हणून समजावें.

---

**य पठति लिखति पश्यति परिपृच्छति पंडितानुपासयति ॥**
**तस्य दिवाकरकिरणैर्नलिनीदलमिव विकास्यते बुद्धिः ॥ ३११ ॥**

' जो अध्ययन करतो, लिहितो, जगाच्या व्यवहाराचें किंवा पुस्तकाचें वरचेवर अवलोकन करतो, नेहमीं संशयनिवृत्ति करून घेतो, पंडिताच्या समागमे असतो, त्याची बुद्धि सूर्यकिरणांनीं जशी कमलिनी तशी विकास पावत जाते ! " *

---

* बेकनचें वाक्य वाचकास आठवेलच —" वाचनानें मनुष्य बहुश्रुत होतो, लिहिण्यानें ठाकठिकी येते आणि संभाषणाच्या योगाने समयसूचकता येते "
( "Reading maketh a man full, writing exact, and conversation ready." )

**पक्ष्माग्रग्रथिताश्रुबिंदुनिकरैर्मुक्ताफलस्पार्धिभिः**
**कुर्वंत्या हरहासहारि हृदये हारावलीभूषणम् ॥**
**बाले बालमृणालनालवलयालंकारकांते करे**
**विन्यस्याऽऽननमायताक्षि सुकृती कोऽयं त्वया स्मर्यते ॥३१२॥**

" हे बाले ! मुक्ताफलाची स्पर्धा करणारे जे पक्ष्माग्रापासून गळणारे अश्रुबिंदु त्यांनीं शिवहास्यतुल्य शुभ्र वक्षःस्थलाकार मोत्यांचा जणु काय हारच धारण करणारी जी तू, ती कोवळ्या कमलतंतूच्या वलयांनीं सुशोभित केलेल्या हस्तावर आपले मुख टेकून कोणत्या धन्य पुरुषाचें एकाग्रतेने ध्यान करीत आहेस ? '

---

**साहजिकरूपवत्या भवति भवत्या विभूषणं भारः ॥**
**सर्वांगसौरभिण्या दमनकवल्ल्याः किमालि कुसुमेन ॥ ३१३॥**

' साहजिकच सौंदर्यानें मंडित जी तू त्या तुला अलंकार हे केवळ भाररूप होत ! पहा कीं, सर्वांगीं सुगंध परिपूर्ण जी दमनवल्ली (दवणा) तिला हे सखि ! पुष्पाचें काय प्रयोजन होय ' "

---

**कर्णलंघिगुणोत्कर्षास्त्यागिनो धन्विनस्तथा ॥**
**निष्फलान्न विमुंचंति मार्गणान्संमुखे स्थितान् ॥ ३१४ ॥**

( दातृपक्षीं ) " दाते जे आहेत हे मार्गणांस ( याचकांस ) त्यांचा गुणोत्कर्ष त्यांच्या कानावरून गेला असता व ते समुख आले असतां त्यास निष्फळ दवडीत नाहींत; म्हणजे अर्थात् त्याची योग्य संभावना करून त्यास बोळवितात ! "

( धन्विपक्षीं ) " धनुर्धर जे आहेत ते समुख म्हणजे हातास आलेल्या मार्गणांस ( बाणांस ), कीं ज्याचा गुण ( दोरी ) आकर्षून कर्णप्रदेशापर्यंत आणला आहे, त्यास निष्फळ सोडीत नाहींत; म्हणजे ज्याला पुढचे लोखंडी फळ नाहीं असा सोडीत नाहींत. (नीट लक्ष्यावर योजून त्याचे संधान करतात !"

---

वसंतातील वाऱ्याने डोलणाऱ्या आम्रमंजरीवर उत्प्रेक्षाः—

**चिरश्रांतो दूरादहमुपगतो हंत मलया-**
**त्तदेकं त्वद्गेहे तरुणि परिणेष्यामि दिवसम् ॥**

**समीरेणोक्तैवं नवकुसुमिता चूतलतिका**
**धुनाना मूर्धानं नहि नहि नहीत्येव वदति ॥ ३१५ ॥**

" हे प्रमदे ! हा मी येवढ्या दूरच्या मलयाचलापासून चालत आल्यामुळें अगदी दमून गेलो आहे, तर एक दिवसभर तुझ्या घरीं मला राहू दे,—याप्रमाणें वसंतवायूनें प्रार्थना केली असता नवपुष्पित ( श्लेषार्थ स्पष्टच आहे ! ) जी आम्रलता ती शिरःकंपानें छे ! छे ! छे ! म्हणून जाणो काय त्याचा निषेध करते ! "

---

**यद्यपि धनेन धनिन क्षितितलनिहितेन भोगरहितेन ॥**
**तस्माद्वयमपि धनिनास्तिष्ठति नः कांचनो मेरु ॥ ३१६ ॥**

" पृथ्वीच्या पोटात पुरून ठेवलेले जे अनुपभुक्त धन त्याच्या योगाने जर धनी आपणास धनवान् म्हणवीत असतील, तर मग आम्हीही श्रीमंतच आहों,—अवघा सुवर्णमेरु आमचाच आहे ! "

---

**काचिन्मृगाक्षी प्रियविप्रयोगे गंतुं निशापारमपारयंती ॥**
**उद्गातुमादाय करेण वीणामेणांकमालोक्य शनैरहासीत् ३१७**

" कोणी विरहिणी रात्र जाईना म्हणून सतार जवळ घेऊन आता तिजवर गाणार तो मृगांकाकडे पाहून वीणा खालीं ठेविती झाली ! " अभिप्राय उघडच आहे कीं, रात्र जाण्याचा जो उपाय आपण करणार तोच ती लांबण्यास मात्र कारण होईल असें तिच्या लक्षात तेव्हाच आलें. लांबण्याचें कारण ' मृगांक ' शब्दात सूचित होतें. मृग हे सुस्वरास अत्यंत लुब्ध असल्यामुळें तो थांबला असता चंद्राची गति सहजच खुटली !

---

**उद्योगादनिवृत्तस्य ससहायस्य धीमतः ॥**
**छायेवानुगता तस्य नित्यं श्रीः सहचारिणी ॥ ३१८ ॥**

" निरंतर नेटाने उद्योग करणारा बुद्धिमान आणि ज्यास मित्राची अत्यंत अनुकूलता आहे अशा पुरुषाच्या मागोमाग संपत्ति छायेप्रमाणे सदोदित चालत असते ! "

---

विरला जानंति गुणान्विरलाः कुर्वंति निर्धनस्नेहान् ।
विरलाः परकार्यरता. परदुःखेनापि दुःखिता विरला ॥३१९॥

" गुणज्ञ लोक विरळ सापडतात. निर्धन पुरुषाशीं स्नेह ठेवणारे विरळा, दुसऱ्याच्या कार्याला झटणारे थोडच आणि परदुःख पाहून कळवळणारे थोडेच ! "

---

का विद्या कवितां विनाऽर्थिनि जने त्यागं विना श्रीश्च का
क सूनुर्विनयं विना कुलवधूः का स्वामिभक्तिं विना ॥
को धर्म स दयां विना नरपति को नाम नीतिं विना
भोगाः के रमणीं विना क्षितितले किं जन्म कीर्तिं विना ॥३२०॥

" कवितेशिवाय विद्येची काय शोभा ? याचकास दान न केल्यास ती संपत्ति काय उपयोगाची ? विनयहीन पुत्र काय कामाचा ? नवऱ्यावर जिची भक्ति नाहीं अशा कुलवधूस काय करावें ? दया नाहीं तर धार्मिकता ती कसली ? नीति ज्यास अवगत नाहीं त्यास राजा काय म्हणावें ? रमणीय स्त्रीच्या व्यतिरिक्त भोगात काय मजा ? कीर्तियुक्त नाहीं तर ते जिणे कमचे ? "

---

निष्पद्म शिशिरेण धीवरगणैर्निर्मत्स्यनिष्कूर्मकम्
व्याधैर्निर्विहग निरंबु रविणा निर्नालकं दंतिभिः ॥
निःशालूकमकारि सूकरगणैर्नामैकमात्रं सरो
हे जीमूत परोपकारक पयोदानेन मां पूरय ॥ ३२१ ॥

" हे सरोवर शिशिर ऋतूने निष्पद्म करून टाकले आहे, धीवरानें त्यातील जलचर पार केले आहेत, व्याधानीं ज्याच्या तीरीं विहार करणाऱ्या पक्ष्याचा संहार केला आहे, रवीने जल शोषून टाकले आहे, हत्तींनीं त्यातील कमलिनी उपटून विध्वंस केला आहे, डुकरानीं चिखलातील कमळाचे कांदे खाऊन पार केले आहे,–तेव्हा या सर्वस्व नाशामुळ हे केवळ नामशेष होऊन बसले आहे, तर हे परोपकारक मेघा ! मजवर दया करून मला भरून टाक !"

---

**बधिरयति कर्णकुहरं वदनं मूकयति नयनमंधयति ॥**
**कुटिलयति गात्रयष्टिं संपद्रोगोऽयमद्भुतो लोके ॥ ३२२ ॥**

" सपत्तीचा विकार साऱ्या रोगांहूनही प्रबळ आहे. पहा की, याच्या योगाने कान बहिरे होतात, वाचा बसते, डोळ्याना दिसेनासें होते आणि शरीर वाकडे होते ! " हे लाक्षणिक वर्णन सर्वांस समजण्यासारखेंच आहे.

---

कोणी घोड्याच्या वेगाचें वर्णन करतो:—

**यावच्छकलितो वायुरेकीभवितुमर्हति ॥**
**तावदेव तुरंगोऽयमाजगाम जगाम च ॥ ३२३ ॥**

" वायु दुभग झाला असता तो पुनः मिळून एक जो होतो, न होतो तोंच हा घोडा गेला आणि आला सुद्धा ! "

---

**चिकीर्षिते कर्मणि चक्रपाणेर्नापेक्षते तत्र सहायसंपत् ॥**
**पांचालजाया पटसंविधाने मध्येसभं यन्न तुरी न वेमा ३२४**

" भगवताच्या मनात कोणतीही गोष्ट कर्तव्य असली म्हणजे तेथे साहाय्याची अपेक्षा असत असे नाहीं. पहा की, जेव्हा द्रौपदीच्या लज्जारक्षणार्थ तो थाबला तेव्हा सभेच्या मध्ये धोट्या किंवा चात्या चालवाव्या लागल्या नाहींत ! "

---

**अम्ब श्राम्यसि तिष्ठ गोरसमहं मथ्नामि मंथानकम्**
**प्रालंब्य स्थितमीश्वर सरभस दीनाननो वासुकि ॥**
**सासूयं कमलालया सुरगणाः सानंदमुद्यद्भयम्**
**राहुः प्रैक्षत य स वोऽस्तु शिवदो गोपालबालो हरि ॥३२५॥**

" आई ! तू दधिमथन करताना दमली आहेस तर थाब, मी अमळ मथन करतों—असें म्हणून मथनकाचे ज्याने ग्रहण केले असता ज्याच्याकडे वासुकि दीनमुख होऊन पाहू लागला, लक्ष्मी सवतमत्सराने पाहू लागली, देवगण आनदित होऊन बघू लागले आणि राहु सभय होऊन पाहू लागला, तो गोपालपुत्र हरि तुम्हास कल्याणप्रद होवो ! " वरील वृत्तींची कारणे उघडच आहेत की, वासुकीस पूर्वीच्या करकोच्याची आठवण होऊन

पुनः तो प्रसंग येतो की काय असे वाटले, लक्ष्मीस वाटले की, या मंथनाच्या योगानें मला सवत निर्माण होते की काय कोण जाणे, देव नव्या अमृताविषयीं सस्पृह झाले, आणि राहूस आपणावर पुनः काय प्रसंग गुदरतो कोण जाणे हा धाक पडला !

---

कुलरीतिप्रियप्रीतिस्तंभद्वयावलंबिनि ॥
तन्वीहृदयहिंदोले हंत दोलायते स्मर ॥ ३२६ ॥

" कुलाचार आणि वल्लभाविषयीं प्रेम या दोन खांबावर लोंबणाऱ्या स्त्रीहृदयरूप हिंदोळ्यावर मदन हा आंदोलन पावत आहे." म्हणजे एकीकडे कुलरीतीचा भंग होईल असा धाक वाटतो आणि एकीकडे हृदयवल्लभाकडे मन ओढते, आणि त्यामुळे मदनाची स्वारी दोहोंकडे हेलकावे खात राहिली आहे.

---

विधौ विरुद्धे न पय. पयोनिधौ सुधौघसिंधौ न सुधा सुधाकरे ॥
न वांछितं सिध्यति कल्पपादपे न हेम हेमप्रभवे गिरावपि ॥ ३२७ ॥

" दैव प्रतिकूल झाले असता जलनिधींतही जल सांपडायाचे नाहीं, अमृतौघाचा सिंधु जो चंद्र त्याच्या ठायीं सुधेचा बिंदुही मिळायाचा नाहीं, प्रत्यक्ष कल्पवृक्षाकडे गेले तरी इष्टसिद्धि व्हावयाची नाही आणि सुवर्णप्रभव जो मेरु त्याच्या ठायींही सोने सांपडायाचें नाहीं ! "

---

मित्रे क्वापि गते सरोरुहवने बद्धानने ताम्यति
क्रदत्सु भ्रमरेषु वीक्ष्य दयिताश्लिष्टं पुरः सारसम् ॥
चक्राह्वेण वियोगिना बिसलता नाऽऽस्वादिता नोज्झिता
कंठे केवलमर्गलेव निहिता जीवस्य निर्गच्छतः ॥ ३२८ ॥

" सूर्य दिगंतरीं चालता झाला असता कमलवन हे निमीलितमुख होऊन दीनवाणे दिसूं लागले असता, तरुंच हसास सत्प्रियानीं आलिंगित पाहून भ्रमर दुःखाने आक्रोश करूं लागले असता, चक्रवाक पक्षी स्त्रीवियुक्त होऊन कमलतंतु तोंडीं धरीना व टाकूनही देईना, तर त्याने ते कंठाचे ठायीं नुसते धारण मात्र केले, कीं प्राण जाऊं लागल्यास त्यांस त्यानीं अटकाव करावा ! "

**प्रियायाः प्रत्यूषे गलितकबरीबंधनविधा-**
**वुदंचद्दोर्वल्लीदरदलितचेलांचलमुरः ॥**
**घनाकूते पश्यत्यथ मयि समंदाक्षिवलितम्**
**नमंत्या यद्रूपं न हि लिखितुमीशो मनसिजः ॥ ३२९ ॥**

" प्रिया प्रभातसमयीं गलितकचभाराचें बंधन करूं लागली असतां तिच्या उन्नमित भुजांनीं किंचित् अस्ताव्यस्त झालेल्या अंचलाकडे व वक्षः-प्रदेशाकडे मी सस्पृह पाहूं लागलों असतां तिनें खालीं लवून लज्जामंदकटाक्षांनीं जें मजकडे अवलोकन केलें तें रेखण्यास प्रत्यक्ष मदनही समर्थ होणार नाहीं ! "

---

कोणी कवि राजाचा स्तव करतोः—

**सहस्रकरपूरणान्निखिलजंतुवक्त्रांबुज-**
**प्रकाशकरणादथ प्रबलवैरितेजोवधात् ॥**
**दरिद्रतिमिरोद्धृतेरखिलभूपचूडामणि-**
**र्जगन्मणिरहर्मणिर्जगदिदं च धत्तः समम् ॥ ३३० ॥**

" सर्व भूपात श्रेष्ठ व पृथ्वीचें रत्न असा हा राजा आणि सूर्य हे दोघे मिळून जगाचें धारण करीत आहेत, कसें ? तर सूर्य सहस्रकिरण प्रगट करतो व हा राजा हजारों याचकांचे हस्त दानपूरित करतो, सूर्य सर्व प्राण्यांच्या मुखकमलास प्रकाशित करतो व राजाही सर्वांचीं तोंडें प्रफुल्लित करतो, सूर्य इतर ग्रह जे त्याचे प्रतिस्पर्धी त्यांचा तेजोवध करतो आणि राजा आपल्या शत्रूंस स्वप्रतापानें दिपवून टाकतो; आणि सूर्य जसा अंधकाराचा ध्वंस करतो त्याप्रमाणें राजा हा राष्ट्रांत दारिद्र्य म्हणून राहूं देत नाहीं ! "

---

**सेयं सीधुमयी वा सुधामयी वा हलाहलमयी वा ॥**
**दृग्भ्यां निपीतमात्रा मदयति मोदयति मूर्छयति च ॥ ३३१ ॥**

" ही मद्यमय आहे ! अमृतमय आहे ! किंवा विषमय आहे हें मला कळत नाहीं; पहा कीं डोळ्यांनींच हिचें प्राशन करतांच उन्माद येतो. हर्ष होतो, व मूर्छाही प्राप्त होते ! "

**दोषमपि गुणवति जने दृष्ट्वा गुणरागिणो न खिद्यंते ॥**
**प्रीत्यैव शशिनि पतित पश्यति लोकः कलंकमपि ॥ ३३२ ॥**

"गुणवताच्या ठायीं दोष पाहूनही गुणाचे चाहते खेद पावत नाहींत, पहा कीं चंद्रावरचा कलंकही लोक प्रीतीनेंच पाहतात !"

---

**अनवसरे गुणवानपि हृदयादवतार्यते स्त्रिया हारः ॥**
**पश्य शलाकावसरे भूपेनापि प्रसार्यते स्वकरः ॥ ३३३ ॥**

" हार हा गुणवान् खरा तथापि अप्रसंगीं तो स्त्रियाकडून हृदयापासून दूर केला जातो आणि दुसऱ्यापक्षीं म्हणजे प्रसंगींचे ठायीं राजाही काडी-करता आपला हात पसरतो ! " वरील दोन्ही प्रसंग सहज लक्षात येण्या सारखे आहेत, पहिला रतीचा व दुसरा भोजनोत्तर आचमन समयींचा. ' गुणवान् ' यावरचा नेहमींचा श्लेष स्फुट करावयास नकोच

---

**सतु नाम भुवनेषु देवता यास्तपोभिरपि दूरदर्शना ॥**
**भाति गर्भशिशुरक्षणऽप्यलं यत्कृपा निरलसा समे गति ३३४**

" भुवनाचे ठायीं असणाऱ्या ज्या अनेक देवता आहेत, कीं ज्या तपें करूनही दर्शन देत नाहींत, त्या एकीकडे असू द्या, माझी श्रद्धा त्या पर-मेश्वरावरच आहे कीं, ज्याची कृपा गर्भीच्या बालकाच्या रक्षणाविषयींही समर्थ आहे ! "

---

**अपूर्वरसनाव्याली खलाननबिलेशया ॥**
**कर्णमूले दशत्यन्यं हरत्यन्यस्य जीवनम् ॥ ३३५ ॥**

" खलाचे मुख हेच कोणी विवर यात राहणारी जी जिव्हारूप विल-क्षण सर्पीण ती एकाच्या कानाला डसते आणि तिसऱ्याचाच जीव जातो ! " अर्थ उघडच आहे आहे कीं चहाडलोक एकाच्या कानाला लागतात आणि त्याचा परिणाम निराळ्याच मनुष्यावर घडतो.

---

**चरंतीनां सौधे नृपतिरमणीनां तनुरुचो**
**गवाक्षांतर्वाताः कतिचन गृहीत्वा जलमुचः ॥**

**क्षणं गोपायंति क्षणरुचिमिषेण क्षणमहो**
**विवृण्वंति स्वर्णं करगतमिवाकिंचनजन. ॥ ३३६ ॥**

"राजास्त्रिया आपल्या महालांत फिरत असता गवाक्षमार्गाने बाहेर पडलेल्या ज्या त्याच्या शरीरप्रभा त्यापैकीं मेघानीं काहीं लुबाडून घेऊन त्याच आता विद्युल्लतेच्या मिषाने क्षणभर प्रगट व क्षणभर अप्रगट करीत आहेत; कीं ज्याप्रमाणे निर्धन पुरुष सोण्याचा अपहार करून मिळविलेले सोने केव्हा लपवितात केव्हां बाहेर काढतात!"

---

**चंचत्कांचनशैलावस्या वक्षोरुहौ तन्व्या ॥**
**नो चेत्तावधिरूढा कथमनिमिषतां भजेत मे दृष्टिः ॥ ३३७ ॥**

"या तन्वीचे वक्षोज हे काचनशैल (सुमेरू) होत ह्यात संशय नाहीं. का कीं, तमें नसते तर त्यावर आरूढ होताच माझी दृष्टि अनिमिष झाली हें कसे?" *

---

**बलि पातालनिलयोऽध कृताश्चित्रमत्र किम् ॥**
**अधःकृतो दिवस्थोऽपि चित्रं कल्पद्रुमस्त्वया ॥ ३३८ ॥**

"हे राजा! पातालांत असणाऱ्या बलास तू दानशूरत्वांत खालीं केलास यात नवल तें काय? पहा, स्वर्गस्थ कल्पतरूस तू खालीं करून टाकला आहेस!"

---

चंद्रगत कलंकावर उत्प्रेक्षाः--

**यदेतच्चंद्रांतर्जलदलवलीलां वितनुते**
**तदाचष्टे लोक शशक इति नो मांप्रति तथा ॥**

---

* अनिमिष म्हणजे जिचा पाती लवत नाहींत अशी सुमेरूवर वास करणारे जे देव त्याच्या लक्षणापैकीं एक लक्षण हें आहे की, मनुष्याप्रमाणे त्याच्या डोळ्याच्या पापण्या लवत नाहींत. तर यावरून कवि कल्पना करतो कीं ज्या अर्थी आरोहणमात्रेंकरून हें दैविक लक्षण दृष्टीस प्राप्त झाले,—म्हणजे ती तेथें निश्चित झाली.—त्या अर्थी वक्षोज हे खरोखर सुवर्णाचल होत!

**अहं त्विंदुं मन्ये त्वदरिविरहाक्रांततरुणी-**
**कटाक्षोल्कापातव्रणकणकलंकांतिततनुम् ॥ ३३९ ॥**

" हे राजा ! चंद्राच्या ठायीं लहानशा ढगासारखे जे दिसते त्याविषयीं लोक अशी कल्पना करतात कीं, तो मसा आहे, पण मला तसें भासत नाहीं, माझी कल्पना अशी होते कीं, तुझ्या शत्रूच्या स्त्रिया या पतिविरह असह्य होऊन चद्राकडे जे निर्भर्त्सनपर तीव्र कटाक्ष फेकतात त्याच्या योगानें त्यास व्रण पडले असावेत ! "

---

**रे रे रासभ वस्त्रभारवहनात्कुग्रासमश्नासि किम्**
**राजाश्वावसथ प्रयाहि चणकाभ्यूषान्सुखं भक्षय ॥**
**सर्वान्पुच्छवतो हयानिति वदंत्यत्राधिकारे स्थिता**
**राजा तैरुपदिष्टमेव मनुते सत्य तटस्थाः परे ॥ ३४० ॥**

" हे रासभा ! तू परटाच्या घरीं राहून पांघुरणाचे भारे वाहण्याचे कष्ट करून उगाच कुग्रास का खातोस ? तर तुला सांगतो असे कर, राजाच्या वाड्यात प्रवेश कर, म्हणजे तुला शानदार हरभऱ्याची चंदी मिळत जाईल. कसे म्हणशील तर अश्वशालेवरील अधिकाऱ्याची परीक्षा इतपत आहे कीं, शेपूट असली कीं, त्या जनावरास घोडा म्हणून ते ओळखतात. राजाचा पूर्ण भरवसा त्यांच्यावर आणि इतर केवळ उदासीन, त्यास कसचीच फिकीर नाहीं. "

---

**यत्पूर्वं पवनाग्निशस्त्रसलिलैश्चीर्णं तपो दुश्चरम्**
**तस्यैतत्फलमीदृश परिणत यज्जातरूपं वपुः ॥**
**मुग्धापांगकपोलचुंबनसुख सगश्च रत्नोत्तमैः**
**प्राप्तः कुंडल वांछसे किमपरं यन्मूढ दोलायसे ॥ ३४१ ॥**

" हे कुंडला ! वायु, अग्नि, शस्त्रे आणि उदक या सर्वांचें सेवन करून जें तू दुर्धर तप आचरलेंस त्याचे फळ हे तुला प्राप्त झालें आहे कीं, तुझी सुवर्णरूप काया बनली, तरुणीच्या नेत्रप्रांतभागाचें व कपोलाचे चुंबन तुला घडते आणि उत्कृष्ट रत्नाशीं तुझा सहवास झाला आहे; मग इतके भाग्यही पुरेसे न होऊन तू अजून जे झोके खात आहेस त्या तुझ्या मनांत

वेड्या ' आणखी ती हाव कसली आहे ? '' सोने हे मूळच्या खानिज स्थितींत असता त्याजवर त्याची खरी कळा आणण्यास अग्न्यादि संस्कार त्यास व्हावे लागतात हें प्रसिद्धच आहे, व त्याप्रमाणेच पचाग्निसाधन वगैरे तपश्चरणाचे मार्ग आहेत हेही प्रसिद्धच आहे. कुंडलाचे आदोलन स्वभावसिद्ध असता त्यावर ही वरील कल्पनाच केली आहे.

---

मुंजराजाने भोजाच्या वधार्थ जे पुरुष पाठविले होते ते पुढील लेख घेऊन त्याच्याकडे परत आले. आपला वध निश्चित होणार असे पाहून पुढील निर्भर्त्सनगर्भित श्लोक भोजाने रचून आपल्या चुलत्याच्या हवाली करण्यास सांगितले.

**मांधाता च महीपतिः कृतयुगालंकारभूतो गत**
**सेतुर्येन महोदधौ विरचित. क्वासौ दशास्यांतकः ॥**
**अन्ये चापि युधिष्ठिरप्रभृतयो याता दिवं भूपते**
**नैकेनापि समं गता वसुमती नून त्वया यास्यति ॥ ३४२ ॥**

भोजप्रबंध.

" राजा ! कृतयुगास अलंकारभूत जो मांधाता राजा तो गेला, ज्याने महोदधीवर सेतुरचना केली तो दशाननांतक राम तरी कोठे आहे ? दुसरे जे युधिष्ठिरादि राजे मोठे मोठे होऊन गेले तेही सर्व स्वर्गाचा मार्ग धरते झाले,—पण इतक्यापैकीं एका बरोबरही ही पृथ्वी गली नाहीं. ही बहुधा तुजबरोबर मात्र येईल असे वाटते ! "

---

**मुरली महदीयवंशजा परपुंसा परिचुंबिता सती ॥**
**विजने विपिने भयातुरा परमेशं स्मरती ररास सा ॥ ३४३ ॥**

" महावंशापासून ( पक्षीं, वेळूपासून ) उत्पन्न झालेली मुरली ही परपुरुषाने ( पक्षीं कृष्णाने ) चुंबिली गेली असता, आपण एकीकडे रानीं आहों असे जाणून भयभीत होत्साती परमेशाचे स्मरण करूनच जणो काय आक्रोश करती झाली ! "

---

**विद्वद्राजशिखामणे तुलयितुं धाता त्वदीयं यश**
**कैलासं च निरीक्ष्य तत्र लघुतां निक्षिप्तवान्पूर्तये ॥**

**उक्षाणं तदुपर्युमासहचरं तन्मूर्ध्नि गंगाजलम्**
**तस्याग्रे फणिपुंगव तदुपरि स्फारं सुधादीधितिम् ॥ ३४४ ॥**

"हे सुज्ञशिरोमणि राजा ! तुझ्या यशाचें परिमाण करण्याचें मनात आणून ब्रह्मदेवानें पहिल्यानें सगळा कैलासचा कैलास पारड्यात घातला, पण तेवढ्यानें होत नाहींसें पाहून नंतर त्यावर नंदी उभा केला, त्यापुढें शिव व पार्वती हीं नंदीवर बसविलीं. पुढें शिवाच्या जटेवर गंगेस ठेविलें. नंतर सर्प व सरतेशेवटीं देदीप्यमान चंद्र याचें आरोपण केलें ! "

---

**दारिद्र्यानलसंताप शांतः संतोषवारिणा ॥**
**याचकाशाविघातांतर्दाह केनोपशाम्यतु ॥ ३४५ ॥**

" दारिद्र्यरूप अग्नीचा संताप संतोषरूप उदकानें शमन पावला; पण दारीं आलेल्या याचकाच्या आशाभंगानें जो अंतर्दाह होतो तो कशानें शांत व्हावा ?" तात्पर्य हें कीं, स्वतःचें दैन्य सज्जन हे धैर्येकरून सोसतील, पण दुसऱ्याच्या दैन्याचें निवारण करण्याचें असामर्थ्य दारिद्र्याच्या पोटीं येतें त्याचें दुःखावेग कसे सहन करावे ?

---

कोणी उत्कंठित म्हणतो:—

**धन्या सा गृहदेहली स्पृशति या तत्पादपद्मप्रभाम्**
**जाता सा सरसो रसाद्विशति सा यस्यां विहारेच्छया ॥**
**वंद्यः कोऽपि स एव यः खलु तया नेत्रेण संभाव्यते**
**धिग्धिग्वेधसमेषु मां यदनयन्नैकं कथंचित्कथम् ॥ ३४६ ॥**

" तिच्या चरणाची प्रभा ज्याच्यावर पडते तो उंबरठा धन्य होय; ज्या पुष्करिणींत ती विहार करण्यास हौसेनें उतरते ती स्पृहणीय होय; व जो कोणी तिच्या प्रेक्षणानें धन्यत्व पावतो तो वंद्य होय; पण ब्रह्मदेवास धिक्कार असो कीं, त्यानें या तिहींपैकीं एके ठिकाणींही माझा योग होऊं दिला नाहीं ! "

---

**स्फुरसि बाहुलते किमनर्थकम्**
**त्वमपि लोचन वाम भव स्थिरम् ॥**

**तमहमागतमप्यपराधिनम्**
**न परिरब्धुमलं न च वीक्षितुम् ॥ ३४७ ॥**

" हे भुजलते! तू उगीच कशाला स्फुरण पावतेस? हे वामनेत्रा! तूही स्थिर हो कसा ! कां कीं तो अपराधी मजकडे आला तरीही मी त्यास आलिंगन करणार नाहीं किंवा त्याच्याकडे नुमती पाहणार देखील नाहीं !" ही अर्थातच खंडित झालेल्या मानिनीची उक्ति होय.

---

**याः पश्यंति प्रियं स्वप्ने धन्यास्ताः सखि योषितः ॥**
**अस्माकं तु गते कांते गता निद्रापि वैरिणी ॥ ३४८ ॥**

"ज्या स्त्रियांस आपल्या वल्लभाचा समागम स्वप्नांत घडतो त्या धन्य होत, पण आमची तर विरहसमयीं अशी स्थिति होते कीं, वैरीण निद्राही आम्हांस पारखी ! "

---

**राजन्दौवारिकादेव प्राप्तवानस्मि वारणम् ॥**
**मद्वारणमिच्छामि त्वत्तोऽहं जगतीपते ॥ ३४९ ॥**

" हे राजा ! तुझ्या द्वारपालापासून मी वारण ( गमनप्रतिबंध—पक्षीं, हत्ती ) पावलों, तेव्हां आतां तुजपासून मद्वारणाची ( माझ्या अप्रतिबंधाची—पक्षीं, मदोन्मत्त हत्तीची ) मी अपेक्षा करतों !"

---

कोणी दरिद्री आपली स्थिति वर्णितोः—

**अर्थो न संति न च मुंचतिच मां दुराशा**
**त्यागे रतिं वहति दुर्ललितं मनो मे ॥**
**याञ्चा च लाघवकरी स्ववधे च पापम्**
**प्राणाः स्वयं व्रजत किं परिदेवितेन ॥ ३५० ॥**

" मजपाशीं पैसा नाहीं, इकडे पहावें तर द्रव्यतृष्णा मला सोडीत नाहीं. माझे लाडकें मन दुसऱ्याची धनाशा पूर्ण करण्याविषयीं उत्सुक होतें; पण इकडे याञ्चा तर लघुत्व आणणारी आहे. बरें, या दोहेरी त्रासापासून आपणास मुक्त करून टाकीन म्हटलें तर आत्महत्येचें महापातक धरलें आहे. तेव्हां हे प्राणानो ! तुम्ही आपोआपच मला सोडून जा कसे ! व्यर्थ शोक करून फळ काय ? "

चातकाच्या दिव्यजलपानावर उत्प्रेक्षाः—

**कूपे पानमधोमुखं भवति मे नद्यो वराक्यः स्त्रियः**
**सारंगैर्बकटिट्टिभैः सह सरस्येवं समालोकयन् ॥**
**नाऽऽदत्ते तृषितोऽपि हीनसलिलं क्रूरैर्वृतं जंतुभि-**
**र्मानादुन्नतकंधरः सुरपतिं तच्चातको याचते ॥ ३५१ ॥**

" विहिरीचे पाणी पिण्यास अधोमुख व्हावे लागते, नद्या तर बिचाऱ्या स्त्रियाच आहेत, सरोवर हे हंस, बक आणि टिट्टिभ यांनीं परिपूर्ण असतें; तेव्हा क्रूर प्राण्यांनीं व्याप्त अशा कुजलसंचयापासून जे उदक घ्यावयाचें ते तृषासमर्यी घेण्याचे न पतकरून मानी जो चातक तो गर्वाने उर्ध्वकंठ होऊन देवाधिदेव जो इंद्र त्यापाशीं काय ती याचना करतो. "

---

**भवारण्यं भीमं ननु गृहमिदं छिद्रबहुलम्**
**बली कालश्चोरो नियतमसिता मोहरजनी ॥**
**गृहीत्वा ज्ञानासिं विरतिफलकं शीलकवचम्**
**समाधानं कृत्वा स्थिरतरदृशो जागृत जना ॥ ३५२ ॥**

" हे जनहो ! हे संसारारण्य भयंकर आहे, शरीररूप गृह सुरक्षित असेल म्हणावे तर हे मुळींच बहुच्छिद्र आहे, मृत्युरूप चोर हा बलिष्ठ आहे, मूढत्वरूप रात्री ही केवळ अंधकारव्याप्त आहे, तर ज्ञान हाच खड्ग, शांति, हीच ढाल, शील हेच कवच अशीं तीन घेऊन मोठ्या खबरदारीनं जागत बसा ! "

---

**दैवे समर्प्य चिरसंचितकर्मजालम्**
**सुस्थाः सुखं वसत किं परयाचनाभिः ॥**
**मेरुं प्रदक्षिणयतोऽपि दिवाकरस्य**
**ते तस्य सप्त तुरगा न कदाचिदष्टौ ॥ ३५३ ॥**

" चिरसंचित हे कर्मजाल त्याचा दैवावर हवाला ठेवून स्वस्थपणेकरून सुखाने राहा; मग याचना करून काय प्राप्त होणार आहे ? पहा कीं, येवढा सूर्य सुवर्णमेरूस प्रदक्षिणा घालीत असता त्याचे जे सात घोडे आहेत ते आहेत, साताचे आठ कधीं तरी झाले आहेत काय ? "

परस्परं संवदतां जडानां मौनं विधेयं सततं सुधीभिः ॥
कोलाहले काकजनस्य जाते विराजते कोकिलकूजितं किम् ॥३५४॥

" मूर्खांचें परस्पर भांडण लागले असता बुद्धिमान् पुरुषांनीं नेहेमीं मौन धारण करावे हे बरें; कावळ्याचा कलकलाट चालला असतां कोकिलाचे कूजित शोभते काय ? "

---

उपभुक्तखदिरवीटीजनिताधररागभंगभयात् ॥
पितरि मृतेऽपि हि वेश्या रोदिति हा तात तातेति ॥ ३५५ ॥

" विडा खाऊन कातानें तोंड रंगले असता अधरोष्ठाची लाली मोडेल या भयाने वेश्या ही आपल्या बापाच्या मरणाची बातमी ऐकून निरोष्ठ शोक करते, " हा तात ! हा तात ! " ( 'हा पित.' म्हणेल तर ओठाला ओठ लागून अधररागाचा भग होईल ! ) "

---

किमंगारवद्गां खुरै स्पर्शयंत कुरंगा इवांगानि सकोचयंत. ॥
अटंतो नटंतो भटं तोषयंतस्तुरगाः सुरंगाः पुरं गाहयंति ॥३५६॥

" पृथ्वीवर जणो काय निखारेच पसरले आहेत अशा भावनेनें तिला खुरानीं स्पर्श करणारे, न करणारे, हरणाप्रमाणे अंगसकोच करणारे, फिरणारे, नाचणारे आणि राउताच्या मनात भरणारे, असे चांगल्या तऱ्हेचे घोडे नगरांत प्रवेश करिताहेत ! "

---

यदि प्रभुरुदारधीः सुरसकाव्यकौतूहल—
स्तथैव च सभासदः सदसि तद्गुणग्राहिण. ॥
सुवर्णसदलंकृतिर्भवति तत्र नृत्योद्यता
मदीयरसनानटी रसघटीयमानंदभू ॥ ३५७ ॥

" जर प्रभु उदार असेल आणि सुरसकाव्याच्या श्रवणाविषयीं त्यास हौस असेल, त्याप्रमाणेच सभासद हे काव्यगुणग्राहक असतील, तर रसाची केवळ पात्रीच आणि आनददायक अशी जी माझी जिव्हारूप नटी, ती सुवर्ण ( सोने, उत्तमवर्ण )—घटित अलकारानी ( श्लेष स्पष्टच आहे.) युक्त होऊन सभेंत नृत्य करण्यास तयार आहे ! "

**यन्नाम्नः प्रथमाक्षरं विजयते भानौ द्वितीयाक्षरम्**
**नृत्यं नृत्यति सत्कवीद्रवदने भूत्वाऽत्यवर्णद्वयम् ।।**
**रामो रावणमाजघान समरे शंभोः शिर शालिनी**
**सा सर्वाक्षरमालिनी भवतु मे भाग्याय भागीरथी ।। ३५८ ।।**

" जिच्या नावाचे पहिले अक्षर ( भा–'तेज' ) सूर्याचे ठायीं विराजमान होतें, दुसरें ( गी–' वाणी ' ) सत्कवींच्या वदनाचे ठायीं नृत्य करतें आणि शवटलीं दोन अक्षरें ( रथी ) होऊन रामानें रावणास रणांगणीं मारिलें ती शंभुशिरीं शोभणारी सर्वाक्षरयुक्त भागीरथी माझा भाग्योदय करो. ! "

---

**स्वयं स्थाणुरपर्णा स्त्री विशाखस्तनयः स्मृतः ।।**
**तथाऽपि कुरुते छायां भवतापापहारिणीम् ।। ३५९ ।।**

" शिव हा स्वतः स्थाणु ( शंकर, झाडाचा बुंधा ) आहे, स्त्री अपर्णा ( पार्वती, पर्णरहिता ) आणि पुत्र विशाख ( कार्तिकेय, शाखारहित ) होय, तरी शिवाची छाया संसारसंतापास दूर करते ! "

---

**बिडौजाः पुरा पृष्टवानब्जयोनिं धरामंडले सारभूतं किमस्ति ॥**
**चतुर्भिर्मुखैरुत्तरं तेन दत्तं तमाखुस्तमाखुस्तमाखुस्तमाखुः ॥३६०॥**

" पूर्वी एक समयीं असे झाले कीं, इंद्राने ब्रह्मदेवास प्रश्न केला, कीं पृथ्वीतलावर सुर्वोत्कृष्ट वस्तु आपण कोणती निर्माण केली आहे ? ब्रह्मदेवानें चारी मुखांनीं एकदम उत्तर केले " तमाखु, तमाखु, तमाखु, तमाखु ! "

---

सीता अशोकवनिकेत असता तिने व त्रिजटेने एका भ्रमराने एक किडा धरलेला पाहिला. त्यावरून सीता त्या राक्षसीस म्हणते:—

**कीटोऽयं भ्रमरी भवेदविरतध्यानात्तथा चेदहम्**
**रामः स्यां त्रिजटे तथा ह्यनुचितं दांपत्यसौख्यच्युता ।।**
**एवं चेत्कृतकृत्यतैव भविता रामस्तव ध्यानतः**
**सीता त्वं च निहत्य राक्षसपतिं सीतांतिके यास्यसि ।।३६१।।**

" हे त्रिजटे ! या किड्यामें भ्रमराचें ध्यान लागलें असल्यामुळें हा भ्रमर होईल, तद्वतच मीही जर राम बनलें तर मोठें अनुचित होऊन मी दांपत्यसौख्यापासून भ्रष्ट होईन." त्रिजटा म्हणते, " असें जर घडेल तर कृतकृत्यता होईल, का तर राम तुझ्या ध्यानेकरून सीता होईल आणि तू राम होत्साती रावणास मारून सीतेच्या भेटीस जाशील ! "

---

**जन्मप्रभृति वक्रस्य हलस्य च खलस्य च ॥**
**सोढुं तयोर्मुखाक्षेपं भवत्येकैव सा क्षमा ॥ ३६२ ॥**

" जन्मापासून वक्र जो हल ( नांगर ) आणि खल याच्या तोंडाचा तडाखा सोसण्यास एक क्षमाच ( पृथ्वी, क्षांति ) समर्थ ! "

---

**धत्तूर धूर्त तरुणेंदुनिवासयोग्ये**
**स्थाने पिशाचपतिना विनिवेशितोऽपि ।**
**किं कैरवाणि विकसंति तमः प्रयाति**
**चंद्रोपलो द्रवति वार्धिरुपैति वृद्धिम् ॥ ३६३ ॥**

" हे शाहण्या धोतऱ्या ! जें स्थान बालचंद्राच्या वसतीस योग्य तेथें शंकरानें तुला ठेविला असताही तुझ्या योगानें कैरवें विकास पावतात काय ? अंधकाराचा नाश होतो काय ? चंद्रकांत द्रवतो काय ? आणि समुद्र वाढतो काय ? "

---

**तथ्यं पथ्यं सहेतु प्रियमितमृदुलं सारवद्दैन्यहीनम्**
**साभिप्रायं दुरापं सविनयमशठं चित्रमल्पाक्षरं च ॥**
**बह्वर्थं कोपशून्यं स्मितयुतघनदाक्षिण्यसंदेहहीनम्**
**वाक्यं ब्रूयाद्रसज्ञः परिषदि समये सप्रमेयाप्रमत्तम् ॥ ३६४ ॥**

" रसज्ञानें सभेंत समय पाहून जें वाक्य बोलावयाचें तें अशा प्रकारचें असावें:—खरें, हितकर, सप्रमाण, प्रिय, मित, मृदु अर्थयुक्त, धीटपणाचें, साभिप्राय, दुर्लभ, विनययुक्त, प्रांजळ, मनोहर, स्वल्प, प्रौढ, शांत, सस्मित, दाक्षिण्ययुक्त, निःसंदेह, प्रमेयसहित आणि प्रमादरहित. "

---

दूति नायिकेस सांगतेः—

**पदशब्दलीनहृदयो रूपालंकारभावनाचतुरः ॥**
**कविरिव विनिहितनिद्र ( सचितमुद्र ) स्तरुणि तवार्थे स्थितस्तरुणः**

" हे तरुणि, जसा कवि पदांच्या शब्दांच्या रचनेत गढून गेला असतो व रूपकालंकार साधण्याविषयीं चतुर असतो त्याप्रमाणे नायक हा निद्रेचे मिष करून तुझ्याकरितां संकेतस्थानीं येऊन बसला आहे, कसा तर तुझ्या पावलांचा शब्द ऐकण्याविषयीं परमोत्सुक आणि तुझें रूप व अलंकार यांची मनोमय भावना करण्यांत चूर होऊन गेलेला असा ! "

---

कोणी कवि स्तनद्वयावर उत्प्रेक्षा करतोः—

**उद्भिन्नं किमिदं मनोभवनृपक्रीडारविंदद्वयम्**
**सूते तत्कथमेकत किल लसद्रोमावलीनालतः ॥**
**चक्रद्वंद्वमिद क्षमं तदपि न स्थातुं मुखेंदोः पुरो**
**लावण्यांबुधिमग्नयौवनगजस्यावैमि कुंभद्वयम् ॥ ३६६ ॥**

" मदननृपाचें हे क्रीडाकमल द्वय उत्पन्न झाले काय ! पण असे म्हणावे तर उदरस्थलावर शोभणारी जी रोमावलीरूप वेली ती एक असतां या पुष्पद्वयास कशी प्रसवेल ? तेव्हां ही कल्पना जमत नाहीं बरे, हे चक्रवाक पक्ष्याचे जोडपे आहे म्हणावे तर मुखचंद्राच्या समोर हे वियुक्त झाल्याखेरीज कसें राहील ? तेव्हां माझा असा तर्क होतो कीं लावण्यरूप जलाशयात बुडी मारून राहिलेला जा यौवनरूप गज त्याचे हे गंडस्थल होय ! "

---

**दंता विश्लथदंताः केशाः काशप्रसूनसंकाशाः ॥**
**नयनं तमसामयनं तथाऽपि चित्तं धनांगनायत्तम् ॥ ३६७ ॥**

" दांत हालूं लागले, केश हे काशपुष्पाप्रमाणे पांढरे झाले, डोळे हे अंधकाराचें स्थान झाले, तथापि चित्ताची आसक्ति धन आणि स्त्री यावरील कमी होत नाहीं ! "

---

उष्णकालातील मध्यान्हाचे वर्णनः—

**तप्ता मही विरहिणामिव चित्तवृत्ति-**
**स्तृष्णाऽध्वगेषु कृपणेष्विव वृद्धिमेति ॥**

**सूर्यः करैर्दहति दुर्वचनैः खलो नु**
**च्छाया सतीव न विमुंचति पादमूलम् ॥ ३६८ ॥**

" विरही पुरुषाच्या चित्तवृत्तीप्रमाणे पृथ्वी ही अत्यंत तप्त झाली आहे, कृपणाचे ठायीं जशी ( धन- ) तृष्णा वाढत असते त्याप्रमाणे पांथाची या वेळेस वाढत आहे, जसा दुर्जन हा दुर्वचनांनीं दुसऱ्यास जाळीत असतो त्याप्रमाणे सूर्य हा आपल्या किरणांनीं संताप करीत आहे आणि छाया ही साध्वीप्रमाणे चरणाची मिठी सोडीत नाहीं ! "

---

**जीवंतु मे शत्रुगणाः सदैव तेषां प्रसादात्सुविचक्षणोऽहम् ॥**
**ये ये यथा मां प्रति बाधयंति ते ते तथा मां प्रति बोधयंति॥३६९**

" माझे शत्रुगण चिरकाळ जिवंत असोत, त्यांच्या प्रसादानें मला बुद्धि प्राप्त झाली आहे. जे जे मला बाधा करतात ते ते मला त्याच मानानें बोधही करतात ! "

---

कोण्या विरहिणीची उक्तिः—

**लोलश्चो मधुपः पिकस्तु परभृद्रंध्रानुसारी मरु-**
**द्धंसाः केवलपक्षपातनिरताश्चंद्रोऽपि दोषाकरः ॥**
**चेतो नैति शुकस्त्विहैकपठिताख्यायी पयोदो जड**
**क वाऽह प्रहिणोमि हंत कठिनस्वांताय कांताय मे॥३७०॥**

" कठिणहृदय जो वल्लभ त्याच्याकडे दूत तरी कोण पाठवावा ? भ्रमर तर मधुप ( मद्यप ), कोकिल दुसऱ्याचे घरीं वाढलेला, वायु हा रंध्रान्वेषी, हंस हे केवळ पक्षपात करणारे ( नर्मा पंख हलविणारे ), चंद्र हा दोषाकर ( दोषांची खाण, निशाकर ), मनाच्यानें तर जाववतच नाहीं, शुक पढविलेलें तेवढें बोलणारा आणि मेघ हा जड ( मंदबुद्धि ) होय ! "

---

**बहुनिष्कपटद्रोही बहुधान्योपघातकः ॥**
**रंध्रान्वेषी च सर्वत्र दूषको मूषको यथा ॥ ३७१ ॥**

खल आणि मूषक यांचें साम्यः—( खलपक्षीं ) " जे अत्यंत निष्कपट

त्यांचा द्रोह करणारा, प्रायः दुसऱ्याच्या नाशाविषयीं उद्युक्त आणि सर्वत्र छिद्रान्वेषणाविषयीं तत्पर, असा खल असतो ''

( मूषकपक्षीं ) '' अत्यंत मूल्यवान् वस्त्राचा नाश करणारा, धान्याचा विध्वंस करणारा आणि जिकडे तिकडे भोकें पाडणारा. ''

---

**आजन्मानुगतेऽप्यस्मिन्नाले विमुखमंबुजम् ॥**
**प्रायेण गुणपूर्णेषु रीतिर्लक्ष्मीवतामियम् ॥ ३७२ ॥**

'' जन्मापासून अनुगत म्हणजे मागे असणारे जे नाल त्यांशींहि कमल हें विकसित होऊं लागले असतां विमुख होतें, तेव्हां लक्ष्मी ज्यास प्राप्त होते, त्यांची गुणवंताविषयीं ( ' गुण ' शब्द श्लिष्ट होय. ) अनास्था व्हावयाची ! ''

---

**तवैव प्रावीण्यं जलद जगदानंदकरणम्**
**यदंभःपालीराहरसि खलसत्त्वाज्जलनिधेः ॥**
**निसर्गात्क्षारास्ता नयसि च कथंचिन्मधुरता-**
**मथाऽऽसारैस्तासां युगपदुपकर्तासि जगतः ॥ ३७३ ॥**

'' हे मेघा ! तुझेंच कौशल्य या जगास आनंद करणारें आहे. तें असें कीं, दुष्टसत्त्व ( दुष्टस्वभाव, पक्षीं दुष्ट आहेत जलचर ज्यांत ) जो समुद्र त्यापासून उदकसमूहाचें तूं हरण करतोस आणि तीं उदकें स्वभावतः क्षार-युक्त असतां त्यांचे ठायीं तूं चमत्कारिक रीतीनें माधुर्य उत्पन्न करून त्यांच्या वृष्टींनीं जगाचें हित करतोस ! ''

---

**अक्षराणि परीक्ष्यंतामंबराडंबरेण किम् ॥**
**शंभुरंबरहीनोऽपि सर्वज्ञः किं न जायते ॥ ३७४ ॥**

'' कोणाच्या विद्वत्तेची परीक्षा कर्तव्य असतां त्याची विद्या पहावी; पोषाखाचा थाटमाट काय करावयाचा आहे ? पहा कीं, शंभु हा वस्त्रहीन असल्यानें त्याची सर्वज्ञता नाहींशी होते काय ?

---

**इह रूपमात्रसारे चित्रगते कनककह्लारे ॥**
**न रसो नापि च गंधो मधुकरबंधो वृथा भ्रमसि ॥ ३७५॥**

" हे मूढ मधुकरा ! हे चित्रातील सुवर्णकमल केवळ रूपाने मात्र खऱ्या कमलासारखे आहे ! यात मकरंद नाही व सुगंधही नाही; मग उगीच कशाला भोंवताली हिंडत आहेस ? "

---

" पंडितराय आपली व स्वकालीन कवींची तुलना करतातः—

**कवयति पंडितराये कवयत्यन्येऽपि विद्वांसः ॥**
**नृत्यति पिनाकपाणौ नृत्यंत्यन्येऽपि भूतवेतालाः ॥ ३७६ ॥**

पंडितराय कविता करीत असता दुसरे विद्वान्ही कवित्व करीत आहेत, ज्याप्रमाणे शिव तांडव करू लागला असता भूतवेतालादि मंडळही नाचु बागडूं लागते !

---

**च्युता दंताः सिताः केशा वाङ्निरोध पदे पदे ॥**
**पातसज्जमिमं देह तृष्णा साध्वी न मुंचति ॥ ३७७ ॥**

" दात पडले, केस पांढरे झाले आणि प्रत्येक शब्दाला जीभ अडखळत, पण याप्रमाणे हा देह पतनोन्मुख झाला असता आशा ही साध्वी स्त्रीप्रमाणे त्यास सोडीत नाहीं ! "

---

**अलमतिचपलत्वात्स्वप्नमायोपमत्वा-**
**त्परिणतिविरसत्वात्संगमेनांगनाया ॥**
**इति यदि शतकृत्वस्तत्त्वमालोकयाम-**
**स्तदपि न हरिणाक्षीं विस्मरत्यंतरात्मा ॥ ३७८ ॥**

" क्षणभर टिकणारा, स्वप्नदर्शनाप्रमाणें आभासरूप आणि परिणामीं विरस, असा जो स्त्रीसंगम तो पुरे झाला, असे शंभर वेळा जरी आपणास तत्त्व कळले, तथापि जीव हा हरिणाक्षीपुढें पुनः लुटपुटतोच ! "

---

**औत्सुक्यतपरिमिलतां त्रपया संकोचमंचतां च मुहु ॥**
**नवसंगमयोर्यूनोर्नयनानामुत्सवो जयति ॥ ३७९ ॥**

" उत्सुकतेने एके ठिकाणीं मिळणारे आणि लज्जेने पुनः संकोच पावणारे असे जे नूतन विवाहित स्त्रीपुरुषाचे नेत्र त्यांचा विलास हा अत्यंत शोभा पावतो ! "

---

**वयोवृद्धास्तपोवृद्धा ये च वृद्धा बहुश्रुताः ॥**
**ते सर्वे धनवृद्धस्य द्वारि तिष्ठति किंकराः ॥ ३८० ॥**

" वयोवृद्ध, तपोवृद्ध आणि विद्यावृद्ध हे सर्व धनवृद्धाच्या द्वारीं दास होऊन राहतात."

---

**तल्पे प्रभुरिव गुरुरिव मनसिजशास्त्रे श्रमे भुजिष्येव ॥**
**गेहे श्रीरिव गुरुजनपुरतो मूर्तेव सा व्रीडा ॥ ३८१ ॥**

" शय्यास्थानीं ती मला प्रभूप्रमाणे होय, कामशास्त्रात गुरूप्रमाणे, गृह कृत्यात सेवकाप्रमाणे, घरात लक्ष्मीप्रमाणे आणि वडीलमाणसापुढें जणों मूर्तिमती लज्जाच ! "

---

**यस्य नास्ति विवेकस्तु केवलं यो बहुश्रुतः ॥**
**स न जानाति शास्त्रार्थान्दर्वी पाकरसानिव ॥ ३८२ ॥**

" ज्याला स्वतः विवेचनाचे सामर्थ्य नाहीं त्याने जरी बहुत अध्ययन केलें तरी त्यास शास्त्रातील गम्य असत नाहीं. ज्याप्रमाणे सैपाकांतल्या पळीला जातीने तिखट, मीठ, गोड, वगैरे काहीं कळत नाहीं, तिचे काम नुसतें ढवळण्याचें ! "

---

**अर्थो नराणां पतिरंगनानां वर्षा नदीनामृतुराट् तरूणाम् ॥**
**स्वधर्मचारी नृपतिः प्रजानां गतं गतं यौवनमानयन्ति ॥ ३८३ ॥**

" अर्थसंचय हा पुरुषाचे, पति स्त्रियाचे, वर्षर्तु नदींचें, ऋतूचा राजा जो वसंत तो वृक्षाचे, स्वधर्मास अनुसरून वागणारा राजा प्रजाचें यौवन पुनः पुनः त्यास आणितो."

---

**गौरवं प्राप्यते दानान्न तु वित्तस्य संचयात् ॥**
**स्थितिरुच्चैः पयोदानां पयोधीनामधः स्थितिः ॥ ३८४ ॥**

" गौरव जे प्राप्त होतें ते द्रव्याच्या दानाने होतें, सचयानें होत नाहीं. पहा कीं, मेघाची स्थिति आकाशांत आणि समुद्राची भूमीवर !"

---

**वसु यच्छतु वा न वा नरेशो मम कर्णेऽपि च भारतीं करोतु**
**रतिमिच्छतु वा न वा नवोढा यदि केलीगृहदेहलीमुपैतु ॥ ३८५ ॥**

" राजा हा मला द्रव्य देवो किंवा न देवो, माझ्याशीं त्याने कानगोष्ट मात्र करावी म्हणजे झाले, नूतन स्त्री ही रतेच्छा मनांत धरो अथवा न धरो, क्रीडामंदिराच्या उंबरठ्यावर तिने पाऊल ठेवावे म्हणजे झाले !"

---

**रे कूप जीवनागार यदि दातृत्वमिच्छसि ॥**
**तदा त्वं गुणवत्पात्रमेकं वा संनिधौ कुरु ॥ ३८६ ॥**

" जीवनाचें ( उदकाचे—जीविकेस साधन जे द्रव्य त्याचें ) आगर असणाऱ्या हे कूपा ! तुला जर दातृत्वाची कीर्ति संपादन करावयाची असेल तर तू आपल्या जवळ एक गुणवत् पात्र ( दोरी लावलेले भांडें—गुणवान पुरुष ठेव ! "

---

कोणी भटजींच्या तट्टाचें वर्णन करतो:—

**गलच्चक्षु मिलज्जानु प्रस्खलच्च पदे पदे ॥**
**मक्षिकालक्षसंयुक्तं भट्टतट्टु विराजते ॥ ३८७ ॥**

" ज्याचे डोळे अधमुर्धे मिटलेले आहेत; गुडघे एकमेकाला लागलेले आहेत, जे पावलोपावली अडखळतें आणि लाखो माशांनीं पीडलेलें, असें भट्टतट्टु विराजमान होतें ! "

---

**कृत्वा विग्रहमश्रुपातकलुषं शय्यासनादुत्थिता**
**क्रोधार्ताऽपि विगृह्य गर्भभवनाद्द्वारं रुषा प्रस्थिता ॥**
**दृष्ट्वा चंद्रमसं प्रभाविरहितं प्रत्यूषवाताहता**
**हा रात्रिस्त्वरिता गतेति पतिता कांता प्रियस्योरसि ॥३८८॥**

" नवऱ्याशीं भांडून व रडूनकढून फणकाऱ्यानें पलगावरून उठली आणि तशीच रागानें महालाच्या दाराकडे जाऊं लागली; पण इतक्यांत

प्रभाविरहित झालेला चंद्र तिच्या दृष्टीस पडला व पहाटचा गार वारा अंगाला लागला, तेव्हां खेद पावून पुनः माघारी आली आणि 'रात्र ही किती लवकर गेली' असे म्हणून कांतास आलिंगिती झाली!"

---

**युगपत्स्वगंडचुंबनलोलौ पितरौ निरीक्ष्य हेरंब ॥**
**तन्मुखमेलनकुतुकी स्वाननमपनीय परिहसन्पायात् ॥ ३८९ ॥**

"शिव व पार्वती या दोघास आपल्या चुंबनाविषयीं एकदम उत्सुक पाहून गणपतीने काय केले की आपले तोंड एकदम मागें घेतले, तेव्हां त्यांचींच मुखे परस्पर मिळालेलीं पाहून हसणारा जो हेरंब तो तुमचे रक्षण करो!"

---

रामाची मारुतीप्रत उक्तिः—

**मय्येव जीर्णतां यातु यत्त्वयोपकृतं कपे ॥**
**नरः प्रत्युपकारार्थे विपत्तिमभिवांछति ॥ ३९० ॥**

"हे कपे, तुझे जे मजवर उपकार आहेत ते माझेच ठायीं जिरून जावोत, ते फेडण्याची मी इच्छा करीत नाहीं, का कीं प्रत्युपकार करावयाचा म्हटला म्हणजे दुसऱ्याच्या विपत्तीची आशा करावी लागते!"

---

**उडुराजमुखी मृगराजकटिर्गजराजविराजितमंदगतिः॥**
**यदि सा वनिता हृदये निहिता क्व जपः क्व तपः क्व समाधिगतिः॥३९१**

"चंद्रासारखें जिचे वदन, सिंहाच्या सारखी कंबर आणि गजराजाप्रमाणे विराजमान अशी मंदगति, अशी वनिता जर हृदयस्थळीं प्राप्त झाली तर जप कोणीकडे, तप कोणीकडे आणि समाधि कोणीकडे!"

---

**सच्छिद्रो मध्यकुटिल कर्णः स्वर्णस्य भाजनम् ॥**
**धिग्दैव विमले नेत्रे पात्रं कज्जलभस्मनः ॥ ३९२ ॥**

"काय दैवाची कृति आहे पहा! कीं जो कर्ण सच्छिद्र आणि मध्ये वांकडा त्याला सुवर्णभूषण मिळतें आणि विमल जीं नेत्रे ती बिचारीं

काजळाला पात्र झालीं आहेत ! '' 'सच्छिद्र,' 'कुटिल,' 'आणि 'विमल'' यांचीं अर्थांतरें प्रसिद्धच आहेत.

---

विश्वेश्वरस्तु सुधिया गलितेऽपि भेदे भावेन भक्तिसहितेन समर्चनीय
प्राणेश्वरश्चतुरया मिलितेऽपि चित्ते चैलांचलव्यवहितेन निरीक्षणीय

"जो सुधी आहे त्यास आत्मज्ञान होऊन जीवेश्वराच्या मधील भेद त्याचा जरी गलित झाला, तरी त्याने विश्वेश्वराची पूजा भावाने व भक्तीने अवश्य करावी; कीं ज्याप्रमाणे चतुर स्त्री ही परस्परांचे मन मिळालें असतांही वस्त्राच्छादित होऊनच आपल्या वल्लभाच्या दृष्टीस पडते ! ''

---

तव विरहमसहमाना सा तु प्राणान्विमुक्तवती ॥
किंतु तथाविधमगं न सुलभमिति ते न मुंचंति ॥ ३९४ ॥

"तुझा विरह सहन करण्यास असमर्थ होऊन ती तर प्राणास टाकण्यास तयार झाली, पण असले सुंदर शरीर आपणास मिळायाचे नाहीं या लोभाने ते प्राणच तिला सोडीनात ! ''

---

दोषागमनमाशंक्य रविरेष तिरोहितः ॥
कथमिंदुः समायाति कुत शंका कलंकिन ॥ ३९५ ॥

"दोषागमन ( रात्रीचे यण—दोषप्राप्ति ) पुढे होणार तो अगोदरच सूर्य आपला क्षितिजाखालीं दडून राहिला. पण त्या समयास इंदूने वर डोकें काढले, ठीकच आहे, जो मुळींच कलंकयुक्त ( दोन्ही अर्थ स्पष्टच आहेत. ) त्यास शंका कोठून प्राप्त होणार ! ''

---

तप्त कैर्न तपोभिः फलित तद्गोपनारीणाम् ॥
लोचनयुगले यासामंजनमासीन्निरंजन ब्रह्म ॥ ३९६ ॥

"आजपर्यंत तपश्चर्या कोणीं केल्या नाहींत ? पण एका गोपींचीं तपें मात्र फळाला आलीं असे म्हटले पाहिजे; का कीं त्यांच्या नेत्रयुगीं निरंजन जे परब्रह्म तें अंजन होऊन बसले ! ''

**आश्लेषशेषा रतिरंगनानामामोदशेषा कुचकुंकुमश्रीः ॥**
**तूणीरशेष. कुसुमायुधोऽपि प्रभातशेषा रजनी बभूव ॥ ३९७॥**

"स्त्रियांच्या रतातील केवळ आलिंगन मात्र शेष राहिले, कुचावर केलेल्या केशरलेपापैकीं केवळ सुगंध मात्र शेष राहिला, मदनापाशीं शेष काय भाता मात्र आणि रात्रीपैकीं पहाट मात्र उरली!"

---

**ललिता गलिता रदावली लवलीवद्धवली भवंति केशा ॥**
**न तथाऽपि कथा रथांगपाणेः श्रवणप्रीतिकरीति मंदरीतिः॥३९८**

"सुंदर जी दंतपंक्ति ती गळून गेली व केस हे लवलीप्रमाणे पांढरे होत आहेत, तथापि चक्रपाणि जो कृष्ण त्याची कथा कानांस आवडत नाहीं—अशीच मूर्खांची रीति होय!"

---

**वागुच्चारोत्सवामात्रं तत्क्रियां कर्तुमक्षमाः ॥**
**कलौ वेदांतिनो भांति फाल्गुने बालका इव ॥ ३९९ ॥**

"सांप्रत कलियुगांत वेदांत बोलणारे पंडित कसे भासतात? कीं जशीं शिमग्यातलीं पोरें तोंडानें यथेच्छ बडबड मात्र करतात, पण त्यातील मर्म म्हणून त्यास बिलकुल माहीत नसत!"

---

**तुंगासनास्तुंगतरा समर्था मनोरथान्पूरयितुं न नीचाः ॥**
**धाराधरा एव धराधराणां निदाघदाहं शमितुं न नद्यः ॥ ४०० ॥**

"उच्च पदवीचे व स्वभावानें थोर असे लोक हेच लोकांचे मनोरथ पुरविण्यास समर्थ होतात, जे मुळींच नीच त्यांच्या हातून ते कार्य घडत नाहीं. पहा कीं पर्वतांचा संताप दूर करण्याचे सामर्थ्य मेघांचेच ठायीं असतें नद्यांचे ठायीं असत नाहीं."

---

**हरे पदाहतिः श्लाघ्या न श्लाघ्यं खररोहणम् ॥**
**स्पर्धाऽपि विदुषा युक्ता न युक्ता मूर्खमित्रता ॥ ४०१ ॥**

"सिंहाचा पादप्रहारही श्लाघ्य होय, गर्दभावर आरोहण केलेलेंही

ाध्य नव्हे; याप्रमाणेच विद्वान् पुरुषाबरोबर स्पर्धाही श्रेयस्कर होय; परंतु मूर्खाबरोबर मैत्री कामाची नाहीं."

---

**निर्गुण इति मृत इति च द्वावेकार्थाभिधायिनौ विद्धि ॥**
**पश्य धनुर्गुणशून्यं निर्जीवं यदिह शसन्ति ॥ ४०२ ॥**

" निर्गुण मनुष्य हे मेल्यासारखेच समजावयाचे; पहा, गुणरहित ( श्लेषार्थ हा उघडच आहे ) असे जे धनुष्य ते असून नसून सारखेच."

---

**कर्कशतर्कविचारव्यग्रः किं वेत्ति काव्यहृदयानि॥**
**ग्राम्य इव कृषिविलग्नश्चंचलनयनावचोरहस्यानि ॥ ४०३ ॥**

"मनाला कठोरत्व देणारे जे तर्कविचार त्यातच सदा जो गढलेला याला काव्याचे हृदय काय कळणार ? जसे, नागर धरणाऱ्या कुणब्यास चतुर कामिनीच्या भाषणातील मर्म काय समजणार ! "

---

**अंत प्रतप्तमरुसैकतदह्यमान-**
**मूलस्य चंपकतरोः क्व विकासचिंता ॥**
**प्रायो भवत्यनुचितस्थितिदेशभाजाम्**
**श्रेय स्वजीवपरिपालनमात्रमेव ॥ ४०४ ॥**

" अतिशय तापलेलें जे मारवाडातील वाळवंट त्याची धग ज्याच्या मुळाशीं निरतर आहे अशा चपकवृक्षाची पुष्पविकास होईल ही आशा कशाला पाहिजे ? अयोग्यस्थानीं जे जाऊन पडले त्यानीं आपला प्राण रक्षण करून ठेवला म्हणजे त्याचें भाग्य समजावें ! "

---

**तथाऽभूदस्माकं प्रथममविभक्ता तनुरियम्**
**ततोऽनु त्वं प्रेयानहमपि हताशा प्रियतमा ॥**
**इदानीं नाथस्त्वं वयमपि कलत्रं किमपरम्**
**मयाऽऽप्त प्राणानां कुलिशकठिनानां फलमिदम् ॥ ४०५ ॥**

" पूर्वी आपली अशी स्थिति होती कीं, दोघांची शरिरें जणूं काय एक होतीं; पुढें तूं माझा वल्लभ आणि मी दुर्भाग्या प्रियतमा इतकाच

दोघात भिन्नभाव झाला; आणि आता तर तू पति आणि मी स्त्री इत-काच संबंध राहिला आहे. तेव्हा वज्राप्रमाणे कठीण असे जे माझे प्राण त्यांचें हे फळ मला प्राप्त झाले आहे."

---

**निर्मित्सुः सुदतीमजो विरचिते वक्त्रे शशिभ्रांतितः**
**कोशीभूतनिजांबुजासनमधिष्ठातुं न शक्तो विधिः ॥**
**मध्यं विस्मृतवान्कुचौ च कठिनौ पीनौ नितंबौ कचा-**
**न्वक्रान्निर्मितवान्मतिः स्फुरति हि स्वस्थे नृणां चेतसि ॥४०६॥**

"ब्रह्मदेव या स्त्रीस जेव्हा निर्माण करू लागला तेव्हा त्याने प्रथमतः हिचे मुख केलें, त्याच्या योगानें काय झाले कीं चंद्राची शंका वाटून त्याच्या आसनाचें कमल मिटूं लागलें;—तेव्हा आसनसंकोचामुळे पीडित होऊन विधीने राहिलेली सर्व रचना भराभर घाईने आटपून टाकली. ती अशी कीं, स्तन आणि नितंब हे होते तसेच जाडी ठेवले, केस वांकडेच राहिले आणि कंबर करायास तर तो मुळींच विसरला! एकदरींत चित्त अस्वस्थ असले म्हणजे कोणतेही काम नीट होत नाहीं!"

---

**दवे त्वत्कर नीरदे दिशि दिशि प्रारब्धपुण्योन्नतौ**
**चंचत्कांचनरत्नराजितडिति स्वर्णामृत वर्षति ॥**
**स्फीता कीर्तितरंगिणी समभवत्तृप्ता गुणिग्रामभूः**
**पूर्णं चार्थिसरः शशाम विदुषां दारिद्र्यदावानलः ॥ ४०७ ॥**

"हे राजा! तुझा हस्तरूप मेघ दशदिशांचे ठायीं उत्कृष्ट उन्नति पावला असता आणि स्फुरण पावणारीं जीं रत्नजडित सुवर्णकंकणे त्यांची विद्युल्लतेसारखी प्रभा पडून सुवर्णरूप उदकाचा वर्षाव झाला असता, कीर्ति-रूप नदीस पूर येऊन ती चोहोंकडे पसरली आहे. गुणिजनरूप भूमि वृष्टीनें तृप्त झाली आहे, याचकसमूहरूप सरोवरें तुडुंबली आणि विद्वजनाचा दारिद्र्यरूप दावानल विझून गेला."

---

**यद्दुर्गामटवीमटंति विकटं क्रामंति देशांतरम्**
**गाहंते गहनं समुद्रमटनं क्लेशं कृषिं कुर्वते ॥**

सेवंते कृपणं पतिं गजघटासंघट्टदु:संचरम्
सर्पंति प्रधनं धनांधितधियस्तल्लोभविस्फूर्जितम् ॥ ४०८ ॥

" दुर्गम अरण्यातून जाणें, भयकर परदेशातून फिरणें, गहन जो समुद्र त्यावर पर्यटन करणे, शेतकीची दगदग करणे, कृपण धन्याची सेवा करणे, हत्तींच्या गर्दीमुळे सचार करण्यास भीतिदायक अशा रणागणीं मरण पावणे, इतके सर्व प्रकार धनलुब्ध लोक जे करतात हा लोभाचा प्रभाव होय ! "

---

व्यासादीन्कविपुंगवाननुचितैर्वाक्यैः सलीलं हस-
न्नुच्चैर्जल्प निमील्य लोचनयुगं श्लोकान्सगर्वं पठन् ॥
काव्यं धिक्कुरु यत्परैर्विरचितं स्पर्धस्व सार्धं बुधै-
र्यद्यभ्यर्थयसे श्रुतेन रहितः पांडित्यमाप्तुं बलात् ॥ ४०९ ॥

" जर तुला अगीं विद्वत्ता नसताही फुकाची पंडितगिरी मिळवायाची असेल तर पुढील गोष्टी कर:—व्यासादिक महान् महान् कवींविषयीं हवा-तसा चारगटपणा करून त्याचीं थट्टा कर. मोठ्याने बोल आणि डोळे मिटून मोठ्या डौलानें श्लोक म्हण, दुसऱ्यानें केलेल्या काव्याची निंदा कर आणि पडितजनाशीं नेहमीं स्पर्धा करीत जा ! "

---

मूर्खत्व सुलभं भजस्व कुमते मूर्खस्य चाष्टौ गुणा
निश्चिंतो बहुभोजकोऽतिमुखरो रात्रिंदिवं स्वप्नभाक् ॥
कार्याकार्यविचारणांधबधिरो मानापमाने सम
प्रायेणामयवर्जितो दृढवपुर्मूर्खः सुखं जीवति ॥ ४१० ॥

" रे वेड्या ! मूर्खत्व सपादन करण्यास काहीं आयाम पडत नाहींत, व त्यापासून पुढील आठ लाभही आहेत तर हेच आपल्या ठायीं दृढ ठेव. आठ गुण येणेंप्रमाणे:—निश्चितपणा, यथेष्ट भोजन, अति मुखरत्व, रात्रंदिवस झोंप, कार्याकार्यविचाराविषयीं अधत्व व बधिरत्व, मान व अपमान हे दोन्ही सारखे, प्रायः शरीरास आरोग्य असून गलेलट्ठ होऊन पडणें,——इत्यादि प्रकारें मूर्ख हा सुखेकरून राहतो ! "

---

**अनाकाशे चंद्रः सरसिजदलद्वंद्वसहितो**
**गृहीतः पश्चार्धे कुटिलकुटिलैः सोऽपि तिमिरैः ॥**
**सुधां मुंचत्युच्चैरनिशमथ संमोहजननीम्**
**किमुत्पातालीयं वदत जगतः कुतुकादिता ॥ ४११ ॥**

"ब्रह्मदेवाने ही उत्पातपरंपरा निर्माण केली आहे काय ? कोणती? तर आकाशाशिवाय चंद्र, त्यावर कमलपत्रांची जोडी, मागे कुटिल अंधकार-समूहाने तो बद्ध केलेला आणि असा चंद्र नेहमीं अमृताचा वर्षाव करणारा कीं, ज्या अमृतवृष्टीने उज्जीवन जे व्हावयाचें ते न होता उलट संमोहन होते ( पक्षीं—मूर्छा येते ) !"

---

स्तनयुगुलावर उत्प्रेक्षाः—

**पुष्पेषोरभिषेकहेमकलशौ हारप्रभावाहिनी-**
**चक्राह्वौ मदनान्मदद्विपपतेः कुंभौ रतेः कंदुकौ ॥**
**कंदौ बाहुमृणालिकायुगुलयोर्लीलालतासत्फले**
**नव्यौ रत्नसमुद्गकौ वहति सा लावण्यपूर्णौ स्तनौ ॥ ४१२ ॥**

"मदनास सार्वभौमाभिषेक करण्याचे हे सुवर्णकलश आहेत काय? अथवा मुक्ताहारप्रवाहरूप नदींतील हे चक्रवाक आहेत काय ? किंवा मदनरूप मदोन्मत्त हत्तीचे गंडस्थल, रतीचे क्रीडाकंदुक, बाहुरूप कमलनालाचे कांदे, लीलारूपलतेचीं दोन उत्कृष्ट फळे, किंवा लावण्यानें भरलेले हे नवे रत्नकरंडक आहेत काय ? "

---

**तन्वंग्या गुरुसंनिधौ नयनजं यद्वारि संस्तंभितम्**
**तेनांतर्गलितेन मन्मथशिखी सिक्तो वियोगोद्भवः ॥**
**मन्ये तस्य निरस्यमानकिरणस्यैषा मुखेनोद्गता**
**श्वासायाससमागतालिसरणिव्याजेन धूमावली ॥ ४१३ ॥**

"स्त्रियेने गुरुजनांच्या समोर डोळ्यांतील अश्रु जे तसेच संस्तब्ध करून ठेवले ते आतल्या आत जिरल्यामुळे वियोगजन्य जो मदनाग्नि त्यावर ते पडले त्या योगानें किंचित् विझून त्याची जी धूमावली निर्माण झाली ती निश्वाससुगंधास लुब्ध झालेल्या भ्रमरमालेच्या रूपाने जणो काय बाहेर पडली!

तरुमूलादिषु निहितं जलमाविर्भवति पल्लवाग्रेषु ॥
निभृतं यदुपाक्रियते तदपि महांतो वहंत्युच्चैः ॥४१४॥

" वृक्षाच्या मुळाशीं जे उदक घालावें तें त्याच्या पल्लवाग्रावर प्रगट होतें ठीकच आहे कीं जे थोर आहेत ते गुप्तपणें केलेल्या उपकारासही प्रसिद्धपणें मिरवतात !"

---

हृदयं कौस्तुभोद्भासि हरेः पुष्णातु वः श्रियम् ॥
राधाप्रवेशरोधाय दत्तमुद्रामिव श्रिया ॥ ४१५ ॥

" कौस्तुभानें शोभा पावणारें असें विष्णूचें हृदय तुमचें कल्याण करो, कीं ज्याचे ठायीं वरील रत्नाच्या मिषानें लक्ष्मीनें जणों काय मोहरच करून ठेवली आहे, कीं राधेनें आंत प्रवेश करूं नये म्हणून !

---

पिनाकफणिबालेंदुभस्ममंदाकिनीयुता ॥
तथाऽपि भव ते मूर्तिरपवर्गप्रदायिनी ॥ ४१६ ॥

" हे शंभो ! तुझी मूर्ति पिनाक ( धनुष्य ), फणी ( सर्प ), बालेंदु ( बालचंद्र ), भस्म आणि मंदाकिनी ( स्वर्गंगा ) यांनीं युक्त असताही अपवर्गातें म्ह० मोक्षातें देणारी आहे. पिनाक, फणी, बालेंदु, भस्म आणि मंदाकिनी या शब्दांचीं आद्याक्षरें अनुक्रमानें पवर्गांतील आहेत हे उघडच आहे.

---

स्त्रीमुख व चंद्र यांचें व्यतिरेकानें वर्णनः—

द्रुतं यस्याऽऽलोकाद्विरहिजनशोकापनयनम्
यदंके सानंद नयनमरविंदं विहरति ॥
नयस्यापैति श्रीः कचनिचयराहोरपि पुन
स मे खेदं रामावदनहिमधामा शमयतु ॥ ४१७ ॥

" ज्याच्या आलोकानें ( अवलोकनानें, प्रकाशानें ) विरहिजनाच्या शोकाचें हरण तेव्हांच होतें, ज्याच्यापाशीं नयनरूप कमल आनंदानें विहार करतें आणि कचकलापरूप जो राहु त्याच्यायोगानेही ज्याचें तेज कमी होत

खऱ्या चंद्राच्या योगाने वाढतो. कमलें संकुचित होतात व राहुग्रासाची त्यास भिती असते, या तीन गोष्टी प्रसिद्धच आहेत.

---

शिवाने गंगेस मस्तकीं धारण केली असता त्याचा व पार्वतीचा संवादः—

**मौलौ किंनु महेश मानिनि जलं किं वक्त्रमंभोरुहम्**
**किं नीलालकवेणिका मधुकरी किं भ्रूलता वीचिका ॥**
**किं नेत्रे शफरी किमु स्तनयुगं प्रखद्रथांगद्वयम्**
**साशंकामित वंचयन्गिरिसुतां गंगाधर पातु नः ॥ ४१८ ॥**

"हे महेशा ! हे मस्तकावर काय ?—हे मानिनी ! हे जल आहे, तोंड दिसतें आहे ते ?—तें कमल आहे, नील केशपाश दिसतो आहे हा?— तो मधुकरीचा समूह आहे; भ्रूलता दिसते आहे ?—तो तरंग आहे, डोळे ? ते दोन मासे आहेत;—स्तनयुग ? ते जलविहार करणारे चक्रवाकाचे जोडपें आहे,—याप्रमाणे साशंक झालेली जी पार्वती तिचें वंचन करणारा गंगाधर आमचें रक्षण करो !"

---

**धन्यास्ते कवयो यदीयरसनारूक्षाध्वसंचारिणी**
**धावंतीव सरस्वती द्रुतपदन्यासेन निष्क्रामति ॥**
**अस्माकं रसपिच्छिले पथि गिरां देवी नवीनोदय-**
**त्पीनोत्तुंगपयोधरेव युवतिर्मांथर्यमालंबते ॥ ४१९ ॥**

"ते कवि धन्य होत, कीं ज्यांच्या जिव्हारूप कोरड्या ठणठणीत रस्त्यावरून सरस्वती ही भराभर पावलें टाकीत धावतच निघून जात असते, पण आमची स्थिति अशी आहे कीं, जिचे पीनोत्तुंग पयोधर नवे उद्भेद पावले आहेत अशी युवति निसरड्या जागेवरून जात असता जशी जपून हळुहळू चालते त्याप्रमाणे आमची वाग्देवी रसाने परिप्लुत अशा मार्गावरून मंद मंद पदांनीं गमन करत !" 'रस' आणि 'पद' या शब्दांचे दोन दोन अर्थ सुगमच आहेत.

---

**समये पयोधराणामपातितया नैव शक्यते स्थातुम् ॥**
**उत्कंठिताऽसि बाले नहि नहि सखि पिच्छिलः पंथाः ॥४२०॥**

"या पयोधरकाळीं ( वर्षासमयीं ) अपतिता मोठी दुःसह होय, म्हणजे पतिसमागमाशिवाय दिवस कठणे मोठें कठिण आहे. ही कोणा एका तरुणीची उक्ति ऐकून तिची सखी तीस विचारते, 'अगे उत्कंठित झाली आहेस काय?' त्याला उत्तर करते, "छे छे ! चोहोंकडे चिखल झालेला म्हणून अपतितावस्था म्हणजे पडल्याशिवाय राहणे कठीण आहे असे मी म्हणते !" हे छेकापन्हुतीचे उदाहरण होय.

---

भीतिर्नैव भुजंगपुंगवविषात्प्रीतिर्न चंद्रामृता-
न्नाशौचं नृकपालकंठलुलनाच्छौचं न गंगाजलात् ॥
नोद्वेगश्चितिभस्मनो न च सुखं गौरीस्तनालिंगना-
दात्मारामतया हिताहितसमः स्वस्थो हरः पातु वः ॥ ४२१ ॥

" ज्याला गळ्यातील महासर्पाच्या विषापासून भीति नाहीं व शिरस्थ चंद्राच्या अमृतापासून आनंद नाहीं, गळ्यांत नरकपालाची माला रुळत असल्याने ज्याला अपवित्रता नाहीं व जटाजूटस्थ गंगेच्या जलापासून पावित्र्य नाहीं, ज्याला चिताभस्म अंगास फांसल्यापासून उद्वेग नाहीं व गौरीच्या स्तनालिंगापासून सुख नाहीं;—असा इष्टानिष्टाविषयीं उदासीन व आत्मस्थितीस पावल्यामुळे सदोदित स्वास्थ्यअनुभवणारा शिव तुमचें कल्याण करो !"

---

नायं प्रयाति विकृतिं विरसो न यः स्या-
न्न क्षीयते बहुजनैर्नितरां निपीतः ॥
जाड्यं निहंति रुचिमेति करोति तृप्तिम्
नूनं सुभाषितरसोऽन्यरसातिशायी ॥ ४२२ ॥

" सुभाषितरसाची दुसऱ्या कोणत्याही रसास सर येणार नाहीं; पहा कीं इतराप्रमाणें हा कधींही विकार पावत नाहीं, विरस होत नाहीं, बहुतांनीं सेवन केला असतांहीं कमी होत नसून जाड्याचें ( मूर्खत्वाचें ) हरण करतो, रुचीची वृद्धि करतो आणि आनंददायक होतो !"

---

दुर्जनहुताशदग्धं काव्यसुवर्णं विशुद्धिमुपयाति ॥
दर्शयितव्यं तस्मान्मत्सारिमनसः प्रयत्नेन ॥ ४२३ ॥

" काव्यरूप सुवर्ण दुर्जनरूप अग्नींत दग्ध झाले असता अत्यंत शुद्ध होतें; यास्तव मत्सरी मनाच्या मनुष्यास त आदररून दाखवावें ! "

---

**त एव पदविन्यासास्त एवार्थविभूतय ॥**
**तथाऽपि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात् ॥ ४२४ ॥**

" तीच शब्दाची योजना व अर्थाचे गौरव, तथापि पदरचनेच्या चातुर्यानें काव्य नवेसे भासू लागतें ! "

---

**इह तुरगशतैः प्रयांतु मूर्खा धनरहिता विबुधाः प्रयांतु पद्भ्याम् ॥**
**गिरिशिखरगताऽपि काकपंक्तिः पुलिनगतैर्न समत्वमेति हंसैः॥४२५॥**

" मूर्ख हे शंभर घोड्यावर बसून फिरोत व पंडित निर्धन होत्साते पायानींच चालोत, तरी पंडित जे श्रेष्ठ ते श्रेष्ठच, पहा कीं, पर्वतशिखरावर बसलेली काकपंक्ति ही नदीच्या वाळवंटावर फिरणाऱ्या हंसाची बरोबरी करू शकत नाहीं ! "

---

**कतिचिदुद्धतनिर्भरमत्सराः कतिचिदात्मवचस्तुतिशालिन ॥**
**अहह केऽपि निरक्षरकुक्षयस्तदिह संप्रति कं प्रति मे श्रम ॥४२६॥**

" कोणी पाहावें तर त्याच्या ठायीं मत्सर परिपूर्ण नांदत असून वरचेवर उचंबळत असतो, कोणी पाहावे, त्यास आपल्या स्वतःच्या कवितेखेरीज इतर कोणाचीही पसंत नसून तिची कायती नेहमी प्रशंसा, बाकी पुष्कळ तर बिचारे अक्षरशत्रुच, तेव्हा काव्य जें करावयाचें तें कोणासाठीं म्हणून करावें ? "

---

**स्थिरा शैली गुणवतां खलबुद्ध्या न बाध्यते ॥**
**रत्नदीपस्य हि शिखा वात्ययाऽपि न नाश्यते ॥ ४२७ ॥**

" जें स्वभावतःच सज्जन त्याचें शील खलाच्या उपदेशानें बिघडत नाहीं; कसें ? तर ज्याप्रमाणें रत्नदीपाची ज्योत चावटळीच्याही वाऱ्यानें विझत नाहीं ! "

---

**केनांजितानि नयनानि मृगांगनानाम्**
**को वा करोति रुचिरांगरुहान्मयूरान् ॥**
**कश्चोत्पलेषु दलसंनिचयं करोति**
**को वा करोति विनयं कुलजेषु पुंसु ॥ ४२८ ॥**

" हरणीच्या डोळ्यात कोणी अंजन घातले आहे ? मोराचे पिसारे चित्रविचित्र कोणी केले आहेत ? नीलकमलास पत्रशोभा कोणी दिली ? कुलज जे पुरुष त्याच्या ठायीं विनय कोणी आणला ? "

---

**मा भूत्सज्जनयोगो यदि योगो मा पुनः स्नेहः ॥**
**स्नेहो यदि विरहो मा यदि विरहो जीविताशा का ॥ ४२९ ॥**

" प्रथमतः सज्जनाची गाठच पडू नये, पडली तर स्नेह जडू नये, तोही जडलाच तर विरह तरी होऊ नये, का कीं विरह झाल्यावर मग जीविताची आशा कशाला हावी ? "

---

**अनुकुरुतः खलसुजनावग्रिमपाश्चात्ययोः सूच्याः**
**विदधाति रन्ध्रमेको मुद्रणमस्यापरोऽपि विदधाति ॥ ४३० ॥**

" खल आणि सज्जन हे सुईच्या पुढल्या व मागल्या भागाप्रमाणे होत, रन्ध्र पाडणें हें पाहिल्याचे काम व त्याचे आच्छादन करणे हे दुसऱ्याचे !"

---

**यदमी दशंति दशना रसना तत्स्वादुसौख्यमनुभवति ॥**
**प्रकृतिरियं विमलानां क्लिश्यंति यदन्यकार्येषु ॥ ४३१ ॥**

" हे दात जे चावतात त्याचे मधुर सौख्य जिव्हा अनुभवते, निर्मल अंतःकरणाचे जे सज्जन त्यांचा स्वभावच हा कीं, दुसऱ्याच्या कल्याणाकरिता कष्ट सोसावे ! "

---

**लक्ष्मीर्यादोनिधेर्यादो नादो वादोचितं वचः ॥**
**बिभेति या धीवरेभ्यो जडेष्वेव निमज्जति ॥ ४३२ ॥**

" लक्ष्मी ही समुद्रांतील जलचर आहे हे वचन वादास्पद नव्हे; का कीं, धीवरास ( पक्षीं, बुद्धिमान् पुरुषास ) भित व जडाचे ठायीं निमज्जन

पावते ! " म्हणजे बुद्धिमंतास प्राप्त होत नाही व जड म्हणजे मूर्ख याज-पाशीं वास करते. ' ड ' आणि ' ल ' यांच्या साम्यास्तव ' जलात बुडून राहते ', हा श्लेषार्थ उघडच आहे.

---

एकेन तिष्ठताऽधस्तादन्येनोपरि तिष्ठता ॥
दातृयाचकयोर्भेदः कराभ्यामेव सूचितः ॥ ४३३ ॥

" दाता आणि याचक याजमधील भेद पालथा आणि उलथा हात एवढ्यानेंच सूचित होतो ! "

---

लक्ष्मीपयोधरोत्सङ्गकुंकुमारुणितो हरेः ॥
धन्यो बलिः स येनास्य भिक्षापात्रीकृतः करः ॥ ४३४ ॥

" बलीची धन्यता काय वर्णावी ! कीं ज्यानें लक्ष्मी कुचभोगकुंकुमानें रंगलेला जो हरीचा हस्त त्यास दानग्रहणार्थ भिक्षापात्र करविला ! "

---

दुर्जनसहवासादपि शीलोत्कर्षं न सज्जनस्त्यजति ॥
प्रतिपर्व तपनवासी निःसृतमात्रः शशी शीतः ॥ ४३५ ॥

" दुर्जनांचा सहवास घडला असताही साधु आपलें शील टाकीत नाहींत, पहा कीं, प्रति अमावास्येला चंद्राला सूर्याचा सहवास घडतो, पण त्याज-पासून निघाला कीं पुरे लागलींच आपलें शीतलत्व प्रगट करतो !

---

विगृहीतः पदाक्रांतो भूयो भूयश्च खंडितः ॥
माधुर्यमेवावहति सुश्लोक इव सज्जनः ॥ ४३६ ॥

" उत्कृष्ट श्लोकाचा जरी विग्रह केला, पदें पाडलीं, किंवा पुनः पुनः निरनिराळा अन्वय लावला तरी त्याचें सौंदर्य कमी होत नाहीं, त्याप्रमा-णेंच सज्जनाशीं विग्रह ( कलह ) केला, त्यास पदाक्रांत केला ( ह्म० त्याची अवज्ञा केली ) किंवा त्याची वारवार खंडना केली, तरी त्याचें नैसर्गिक शील ढळत नाहीं ! "

---

**अपूर्वः कोऽपि कोपाग्निः सज्जनस्येतरस्य च ॥**
**एकस्य शाम्यति स्नेहाद्वर्धतेऽन्यस्य वारितः ॥ ४३७ ॥**

"सज्जन व दुर्जन यांचा कोपाग्नि किती विलक्षण तऱ्हेचा आहे पहा! कीं एक स्नेहाच्या योगानें शमला जातो व दुसरा वारला असता वृद्धि पावतो!" 'स्नेह' शब्दाचा दुसरा अर्थ 'तेल' हा होय, व 'वारित' याचा अर्थ 'पाण्यापासून' असा होतो. तेलानें विस्तव विझणें व पाण्यानें वाढणें हें विलक्षण आहे हें उघडच आहे.

---

**जलनिधौ जननं धवलं वपुर्मुररिपोरपि पाणितले स्थितिः ॥**
**इति समस्तगुणान्वित शंख भोः कुटिलता हृदयं न निवारिता ४३८**

"हे शंखा! तुझें जन्म समुद्रांत झालें, तुझें शरीर पांढरें शुभ्र आहे, मुरारीच्या हस्ततलीं तुला सदोदित वास घडतो, याप्रमाणें समस्त गुणांनीं तू युक्त असतां तुझ्या हृदयाच्या ठायींची कुटिलता कांहीं निघाली नाहीं!" शंखाचें अभ्यंतर वक्र असतें हें प्रसिद्धच आहे.

---

**यत्राऽऽत्मीयो जनो नास्ति भेदस्तत्र न विद्यते ॥**
**कुठारैर्दंडनिर्मुक्तैर्भिद्यंते तरवः कथम् ॥ ४३९ ॥**

"जेथें घरचा भेद्या मिळाला नाहीं तेथें फूट पडत नाहीं, जर कुऱ्हाडीचे दांडे काढून घेतले तर झाडें कशीं तुटलीं जातील?"—'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ.' ही म्हण प्रसिद्धच आहे.

---

**द्यूतेन धनमिच्छंति मानमिच्छंति सेवया ॥**
**भिक्षया भोगमिच्छंति ते दैवेन विडंबिताः ॥ ४४० ॥**

"द्यूत खेळून जे धनप्राप्तीची इच्छा करतात, सेवा करून मानाची अपेक्षा करतात, आणि भिक्षावृत्तीचें अवलंबन करून भोगाची आशा करतात, ते हतभाग्य होत!"

---

**अयश्चणकचर्वणं फणिफणामणेः कर्षणम्**
**करेण करितोलनं जलनिधेः पदा लंघनम् ॥**

**प्रसुप्तहरिबोधनं निशितखड्गसंरोपणम्**
**कदाचिदपि संभवेन्न कृपणस्य वित्तार्जनम् ॥ ४४१ ॥**

" लोखंडाचे हरभरे दातांनीं फोडणे, सर्पाच्या फणेवरील मणी हिसकावून घेणें, हातांत हत्ती तोलून धरणे, समुद्र पायांनीं उतरून जाणे, निजलेल्या सिंहास डवचून जागे करणें, तीक्ष्ण तरवारीवर बसणें;—हीं सर्व संभवतील, पण कृपणाच्या वित्ताचें हरण करणें हें कधीं घडणार नाहीं !"

---

**तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेच्छिथिलबंधनात् ॥**
**मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ॥ ४४२ ॥**

" पुस्तक म्हणते, माझें तेलापासून, पाण्यापासून व शिथिलबंधनापासून रक्षण कर; आणि मला मूर्खाच्या हातीं देऊं नकोस. "

---

**व्याधेस्तत्त्वपरिज्ञानं वेदनायाश्च निग्रहः ॥**
**एतद्वैद्यस्य वैद्यत्वं न वैद्य प्रभुरायुषः ॥ ४४३ ॥**

" वैद्याची वैद्यगिरी म्हणजे इतकीच, कीं व्याधीचे निदान त्याने ठरवावे, वेदना बंद करावी, वैद्य काहीं आयुष्याचा धनी नाहीं. "

---

**पल्लवे नास्ति माधुर्यं सुधायां नास्ति शोणिमा ॥**
**विद्रुमे नास्ति मृदुता तत्रयं दयिताधरे ॥ ४४४ ॥**

" पल्लवाच्या ठिकाणीं माधुर्य नसते, अमृताचे ठायीं लालपणा नसतो, आणि पोंवळयाच्या अंगीं मार्दव नाहीं, पण हे तिन्ही गुण प्रियेच्या अधरोष्ठाचे ठायीं वास करतात ! "

---

**लोभमूलानि पापानि व्याधयो रसमूलकाः ॥**
**स्नेहमूलानि दुःखानि त्रयं त्यक्त्वा सुखी भवेत् ॥४४५॥**

" सर्व पापाचे मूळ लोभ हा होय, व्याधीचें मूळ पडूस होत, दुःखांचें मूळ ऐहिक वस्तूवर धरलेली ममत्वबुद्धि होय, यास्तव हीं तिन्ही सोडून देणें हा सुखाचा मार्ग होय ! "

---

**मार्जारो लभते न पंजरशुकालापेन कौतूहलम्**
**कस्तूरीहरिणस्य सौरभतया व्याघ्रो न संतुष्यति ॥**
**प्रीतिर्नास्ति मयूरतांडवविधौ व्याधस्य दुष्टात्मभि-**
**र्व्याप्तायां भुवि संति केऽपि विरलाः संतो गुणग्राहकाः॥४४६॥**

“ मांजरास पिंजऱ्यातील राघूच्या बोलण्याचें कौतुक वाटत नाहीं, वाघास कस्तूरीमृगाच्या सुगंधानें संतोष होत नाहीं, पारध्यास मोराचा नाच पाहून आनंद होत नाहीं. सराश, दुष्टांनीं भरलेली जी पृथ्वी हिचे ठायीं कोणा विरळ गुणग्राहक आहेत ते आहेत ! ”

---

**परस्परासंगसुखान्नतभ्रुवः पयोधरौ पीनतरौ बभूवतुः ॥**
**तयोरसूयन्नयमुन्नतिं परामावेक्षि मध्यस्तनिमानमंति ॥ ४४७ ॥**

“ परस्पर समागमाच्या सुखानें स्त्रीचे वक्षोज पुष्टतर झाले, पण त्यांची उन्नति न साहून मध्य ( कटिप्रदेश ) हा मत्सरानें झुरुन कृश झाला असें मला वाटतें ! ”

---

**पात्रे त्यागी गुणे रागी विरागी विषयेष्वपि ॥**
**शास्त्रे बोद्धा रणे योद्धा पुरुषः पंचलक्षणः ॥ ४४८ ॥**

“ पात्राचे ठायीं दान करणारा, गुणीजनाचे ठिकाणीं आदरबुद्धि धरणारा, विषयाविषयीं पराङ्मुख असणारा, शास्त्रात निष्णात आणि रणात शौर्य प्रगट करणारा,—हीं पांच महापुरुषाचीं लक्षणें होत. ”

---

**एकेन राजहंसेन या शोभा सरसो भवेत् ।**
**न सा बकसहस्रेण परितस्तीरवासिना ॥ ४४९ ॥**

“ एका राजहंसानें जी सरोवरास शोभा येईल ती साऱ्या तीरासभोंवतीं जमलेल्या हजार बगळ्यांनीं येणार नाहीं. ”

---

**यथा खरश्चंदनभारवाही भारस्य वेत्ता न तु चंदनस्य ॥**
**तथा हि विप्रः श्रुतिशास्त्रपूर्णो ज्ञानेन हीनः पशुभिः समानः ॥४५०**

“ जसा गर्दभ हा चंदनाचें ओझें वाहणारा असला तरी त्याला

ओझ्याचें मात्र ज्ञान, चंदनाचें नाहीं; त्याप्रमाणेच वेद व शास्त्र यांत पारंगत असूनही जो ब्राह्मण ज्ञानशून्य तो पशुतुल्य समजावा. ”

---

**तरुणि संहर संहर लोचनं तृणलवेषु कुठारपरिग्रहः ॥**
**मयि मनोभवमार्गणपीडितं न हि सतामुचितं मृतमारणम् ॥४५१**

“ हे तरुणि ! आपला कटाक्ष आटोप आटोप, अग ! तृणलवावर कोणी कुठाराचा प्रयोग करतो काय ? मदनाच्या बाणानें पीडित जो मी त्या मजवर हा दुसरा प्रहार कशाला पाहिजे ? सज्जन जे आहेत ते मेलेल्यावर घाव घालीत नसतात ! ”

---

**चतुरः सखि मे भर्ता यल्लिखति स तत्परो न वाचयति ॥**
**तस्मादप्यधिको मे स्वयमपि लिखितं स्वयं न वाचयति ॥४५२॥**

“ माझ्या पतीचें चातुर्य काय सगूं ? तो जे लिहितो ते दुसऱ्यास वाचतां येत नाहीं. ” हें पहिलीचें वर्णन ऐकून दुसरी उत्तर करते, “ आमचे यजमान तर याहूनही शहाणे आहेत. स्वतः लिहिलेलेंच त्यांस वाचता येत नाहीं ! ”

---

**प्रभुर्विवेकी प्रमदा सुशीला तुरंगमः शस्त्रनिपातधीरः ॥**
**विद्वान्विरागी धनिकः प्रदाता भूमंडलस्याऽऽभरणानि पंच ४५३**

“ विवेकी राजा, सुशील कांता, शस्त्राचा घाव सोसण्यास खंबीर असा घोडा, वैराग्यशील विद्वान् आणि दानशूर धनिक,—हीं पांच भूमंडलाचीं भूषणें होत ! ”

---

**पत्राणि जीर्णानि फलं विनष्टं छाया गता पक्षिकुलैः प्रयातम् ॥**
**वसंत जानीहि तवाऽऽशयाऽसौ समुन्नतिं नैव जहाति वृक्षः ४५४**

“ पानें वाळून गेलीं, फळें गळालीं, छाया नाहींशी झाली, पक्ष्यांचे समुदाय आश्रय करीनातसे झाले,—पण इतक्याही उपर ज्यापेक्षा हा वृक्ष आपली उन्नति ( उंची—पक्षीं, थोर स्वभाव ) टाकीत नाहीं त्या अर्थी हे वसंता ! हा तुझ्या आशेवर गुतून राहिला आहे असें समज ! ”

**करिवर संचर धीरं मा मर्दय मर्मराणि पत्राणि ॥**
**अस्मिन्गह्वरकुहरे धूतसटः केसरी वसति ॥ ४५५ ॥**

" हे हस्तिश्रेष्ठा ! हळुहळू चाल, झाडांचा पाला तुडवून वाजवू नकोस; कां कीं, या दरीच्या आंत आयाळ झाडून गर्जना करणारा सिंह वसत आहे ! "

---

**पुष्पादनंतरं स्यात्फलं लतायां प्रसिद्धमिति लोके ॥**
**चित्रं कनकलतेयं पुष्पोद्गमतः फलद्वय पूर्वम् ॥ ४५६ ॥**

" वृक्षसृष्टींत पाहिलें असतां प्रथम फुलें येऊन नंतर फळें धरतात असा क्रम आढळतो; पण ह्या सुवर्णवेलीच्या ठायीं हा काय चमत्कार दृष्टीस पडतो पहा, कीं पुष्पोद्गमाच्या पूर्वीच फलद्वयाचा संभव ! "

---

**अहमिहैव वसन्नपि तावकस्त्वमपि तत्र वसन्नपि मामकः ॥**
**हृदयसंगम एव सुसंगमो न तनुसंगम एव सुसंगमः ॥४५७॥**

" मी येथें असूनही तुझा आहें व तू तेथें असूनही माझा आहेस, तस्मात् हृदयसंगम हाच खरा संगम, येरवीं शारीर समागम हा कांहीं वास्तविक संगम नव्हे ! "

---

**गुरुजननयने पिधेहि निद्रे त्वरितमिहास्तमुपैहि पद्मबंधो ॥**
**इति वदति मनोभवाभितप्ता चिरसमयागतवल्लभा मृगाक्षी ४५८**

" हे निद्रे ! गुरुजनांचे नेत्र निमीलन कर; हे पद्मबंधो सूर्या ! तू लवकर अस्तास जा, याप्रमाणें मदनानें विव्हल झालेली स्त्री, कीं तिचा वल्लभ फारां दिवसांनीं घरीं आला,—ती वदती झाली ! "

---

**परिमितविशिखो न चेन्मनोजो यदि च हरो न हरेत्तदीयमंगम् ॥**
**यदि मृदुकुसुमेषुरेष न स्यादवनितले न किमाचरेत्तदानीम् ४५९**

" हा मदन जर परिमितशर ( पंचशर ) नसतां, शिवानें त्यास अनंग केला नसता, आणि कोमल पुष्पेंही त्याचे बाण नसते, तर त्यानें पृथ्वीतलावर काय काय अनर्थ करून दिले असते ! "

**चंद्र स्वरं विहर गगने प्रेयसी नम्रवक्त्रा**
**नीलांभोज त्वमपि विकसोन्मीलिताक्षी मृगाक्षी ॥**
**उक्तिं मुक्तां कुरु पिक निजां मानिनी मौनिनीयम्**
**युष्मद्भाग्यैः फलितमधुना यद्गृहीतोऽभिमानः ॥ ४६० ॥**

"हे चंद्रा! प्रियेने रागाने तोंड खाली केले आहे, तेव्हा आता तू खुशाल गगनात विहार कर. हे नीलकमला! तिने आपले डोळे मिटले आहेत, यास्तव हा तुझा विकास पावण्याचा काल आहे. हे कोकिला! मानिनीने मौन अंगीकारलें आहे, यास्तव तू आपली वाणी प्रगट कर. तुमचीं भाग्ये हल्लीं फळास आलीं आहेत, कारण कीं प्रियेने मान धारण केला आहे!"

---

**किं केकीव शिखंडमंडिततनुः किं कीरवत्पाठकः**
**किंवा हंस इवांगनागतिगुरुः शारीव किं सुस्वरः ॥**
**किंवा हंत शकुंतराजपिकवत्कर्णामृतं सिंचते**
**काकः केन गुणेन कांचनमये व्यापारितः पंजरे ॥ ४६१ ॥**

"या कावळ्यास सोन्याच्या पिंजऱ्यात जो ठेविला आहे तो काय समजून?—यास काय मोराप्रमाणें शोभिवंत पिसारा आहे? का राघूसारखी मनुष्यवाणी आहे? का हंसाप्रमाणे स्त्रियास उपदेशक अशी यास गति आहे? का साळुंकीसारखा सुस्वर आहे? का पक्ष्यांचा नायक जो कोकिल त्याच्यासारखी कर्णमधुरवाणी आहे? त्याच्या अंगीं येवढा गुण तरी पाहणाराने काय पाहिला?"

---

**मुंचद्धारं चिकुरनिकरं बिभ्रती पाणिगर्भे**
**गात्राश्लिष्टस्तिमितवसनस्पष्टसर्वांगशोभा ॥**
**स्नानोत्तीर्णा कमलनयना तिर्यगावर्तितास्या**
**नो वा कस्यासमशरसमाक्रांतमंतः करोति ॥ ४६२ ॥**

"मोकळे सुटलेले केश हाताच्या पोकळींत जिने धरले आहेत, जिचे वस्त्र अंगाबरोबर लगटून गेल्यामुळे जिच्या सर्व अवयवाची शोभा स्पष्ट दिसत आहे व जिनें आपले तोंड तिरकस फिरविलें आहे, अशी स्नान करून बाहेर आलेली तरुणी पाहून कोणाचे अंतःकरण मदनाक्रांत होत नाहीं!"

अभिलषसि यदींदो ! वक्त्रलक्ष्मी मृगाक्ष्याः
पुनरपि सकृदब्धौ मज्ज संक्षालयांकम् ॥
सुविमलमथ बिंबं पारिजातप्रसूनैः
सुरभय यदि नो चेत्त्वं क तस्या मुखं क ॥ ४६३ ॥

" हे चंद्रा तुला जर कमलनयनेच्या मुखाचे साम्य करायाचे असेल तर पुनः एक वेळ समुद्रात बुडी मार आणि कलंक धुऊन टाकून आपले बिंब लखलखीत कर आणि त्यानंतर पारिजातकाच्या पुष्पांनीं ते सुवासित कर. असे न करशील तर तू कोणीकडे आणि तें मुख कोणीकडे ? "

---

यद्यपि बद्धः शैलैर्यद्यपि गिरिमथनमुषितसर्वस्वः ॥
तदपि परभीतभूधररक्षायां दीक्षितो जलधिः ॥ ४६४ ॥

" जरी समुद्राचे बंधन ( सेतुबंधसमयी ) पर्वतानींच केले, जरी पर्वताच्या ( मंदराचलाच्या ) योगानच मंथन होऊन समुद्रांतील सर्व रत्ने हरलीं गेलीं, तरी त्याच्या शत्रूपासून ( इंद्रापासून ) भय उत्पन्न झाले असतां, त्यांस रक्षण करण्याचे व्रत समुद्राचेच ! " मैनाक पर्वत समुद्रांत दडालेला आहे त्यास अनुलक्षून वरील आर्या आहे. *

---

घृणा शंका भयं लज्जा जुगुप्सा चैव पंचमी ॥
कुलं शील तथा जातिरष्टौ पाशाः प्रकीर्तिताः ॥ ४६५ ॥

" दया, साशंकता, भय, लज्जा, तिटकारा, कुल, शील आणि जाति हे आठ पाश होत; म्हणजे एकादे साहस कर्तव्य असतां, हीं आठ प्रतिबंधक होतात. "

---

* भर्तृहरीच्या ' नीतिशतका ' त असा एक श्लोक आहे —

मरावें कीं होतें सुरपतिस देऊनि झगडा ॥
प्रहारें वज्राच्या करुनि धरणी इगल सडा ॥
पित्यातें संग्रामीं त्यजुनि भय निःशंक भिडणें ॥
नव्हे त्या मैनाका उचित जलधीमाजि दडणें ॥

**कल्याणि पाणिपातितानि विना विचार-**
**मेतानि मोक्तुमुचितानि न मौक्तिकानि ॥**
**गुंजेति संजनयते यदिह भ्रमं ते**
**हस्तारविंदनयनोत्पलयोः प्रभैव ॥ ४६६ ॥**

" हे सुंदरी ! तुझ्या हातात जीं हीं मोतीं आहेत तीं अविचारानें फेंकून देऊं नको. तुला तीं गुंजांसारखीं वाटत असतील खरी, पण तसें वाटण्याचें कारण तुझ्या हस्ताची ताम्रप्रभा व डोळ्याची काळीप्रभा ह्या होत ! "

---

**महतोः सुवृत्तयोः सखि हृदयग्रहयोः समुच्छ्रितयोः ॥**
**सज्जनयोः स्तनयोरपि निरंतरं संगतं भवति ॥ ४६७ ॥**

" जे थोर बुद्धीचे, सुस्वभावाचे, लोकांच्या हृदयांत भरणारे, उन्नति, संपन्न अशा सज्जनांची निरंतर संगति राहते. कशी ? तर जसें पृथुल, वर्तुल, मनोरम आणि उन्नत अशा स्तनद्वयाचें अव्यवधान सान्निध्य असतें त्याप्रमाणें ! "

---

**स्वर्गापगायास्तरलैस्तरंगैः पौरांगनानां कुटिलैः कटाक्षैः ॥**
**धर्मश्च कामश्च समेत्य तीरे ह्यन्योन्यमायोधनमारभेते ॥ ४६८ ॥**

" गंगेच्या तीरीं धर्म आणि काम हे दोघे येऊन एकमेकांशीं युद्ध करूं लागतात; एकाचें आयुध गंगेचे चंचल तरंग आणि दुसऱ्याचें पौर-वधूंचे कुटिल कटाक्ष ! "

---

**मीमांसा पठिता न यैरुपनिषन्नैव श्रुता तत्त्वतः**
**श्रीमच्छंकरभाष्यतो भगवती गीताऽप्यधीता न यैः ॥**
**सिद्धांतापगतं शिरोमणिमतं ज्ञात्वापि किंचित्ततो**
**भट्टाचार्यपदं गताः कथमहो लज्जां लभंते न ते ॥ ४६९ ॥**

" ज्यांनीं मीमांसेचें अध्ययन केलें नाहीं, ज्यांनीं तत्त्वतः उपनिषच्छ्रवणही कधीं केलें नाहीं, ज्यांनीं श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्यावरून भगवद्गीतेचें परिशीलनही केलें नाहीं, ते लोक शिरोमणीच्या अपसिद्धांतरूप मताचें

किंचित् ज्ञान होताच बेलाशक भट्टाचार्य हे उपपद आपल्या नावाला लावून घेतात, तर त्यांस लज्जा कशी वाटत नाहीं ? ”

---

**यत्राऽऽर्जवेन लघिमा गरिमाणं वक्रता तनुते ॥**
**छंदःशास्त्र इवास्मिँल्लोके सरल सखे किमासि ॥ ४७० ॥**

“ छंदःशास्त्रात जसे आहे कीं, सरळ रेघेने लघु मात्रा मोजतात व वाकडीनें गुरु मोजतात, तशी जगातली स्थिति आहे, म्हणजे सरळ आचरणाने लघुत्व प्राप्त होते व वक्रता दाखविल्याने गौरव प्राप्त होतो, मग असें असतां, हे मित्रा ! तू सरलतेने का वागतोस ? ” *

---

**अत्यंतमंथनकदर्थनमुत्सहंते**
**मर्यादया नियमिता किनु साधवोऽपि ॥**
**लक्ष्मीसुधाकरसुधाद्युपनीय शेषे**
**रत्नाकरोऽपि गरलं किमु नोज्जगार ॥ ४७१ ॥**

“ सज्जन हे मर्यादेनें नियमित झालेले जरी असले तरी त्याचा अतीच उपमर्द झाला असता तो त्यास सहन होत नाहीं. पहा कीं, समुद्र हा रत्नाकर खरा; पण लक्ष्मी, चंद्र अमृत इत्यादि अर्पण केल्यानंतरही जेव्हा त्यास देवदैत्य सोडीनात तव्हा शेवटीं त्याने विष बाहेर टाकले ! ”

---

**सम्यगनिष्पन्नः सन्योऽर्थस्त्वरया स्फुटीक्रियते ॥**
**स व्यंग्य एव भवति प्रथमो विनतातनूज इव ॥ ४७२ ॥**

“ विनतला पहिला झालेला मुलगा जो अरुण तो जसा गर्भाशयांत पूर्णावयव न होत्माता जन्मास आला व व्यंग ( थोटा ) निपजला, त्याप्रमाणे जो अर्थ अपूर्णत्वाने व्यक्त केलेला असता श्रोत्यास किंवा वाचकांस त्वरित भासमान होतो, तो व्यंग्य समजावा. ”

---

* मोरोपंताच्या ‘ साकी रामायणा ’ त पुढील चमत्कारिक उपमा आहे.
प्रभु तारात्मज क्रूरमुखे त्या हित कथि तें खळ न गणी ॥
त्यात वक्रपण आधीं मध्यें अंतिंहि जैसे ‘म’गणी ॥

व्यथयातितरामुपेतः स्वच्छप्रकृतीनवद्यलेशोऽपि ॥
उद्विजते ननु चक्षुः सक्तेन रजःकणेनापि ॥ ४७३ ॥

" जे प्रकृत्या स्वच्छ असतात, त्यास दोषाच्या लेशानेही हीनत्व येते; जसें रजःकण डोळ्यात गेला असता, तेवढ्यानेही डोळा दुखू लागतो ! "

---

अशठमलोभं ऋजुं त्यागिनमनुरागिणं विशेषज्ञम् ॥
यदि नाऽऽश्रयति नरं श्रीः श्रीरेव हि वंचिता तत्र ॥ ४७४ ॥

" सदय, निर्लोभ, सरळ, दाता, प्रीतियुक्त व मनुष्याची ज्यास पारख आहे, अशा पुरुषाचा जर लक्ष्मीने आश्रय केला नाहीं तर तीच बिचारी फसली असे म्हटले पाहिजे ! "

---

या स्वसद्मनि पद्मेऽपि संध्यावधि विजृम्भते ॥
इंदिरा मंदिरेऽन्येषां कथं स्थास्यति निश्चला ॥ ४७५ ॥

" जी लक्ष्मी स्वतःचे गृह जे कमल त्यामध्येही संध्याकाळपर्यंतच कायती राहते, ती दुसऱ्याच्या घरात कशी दीर्घकाळ राहील ? "

---

दिग्वाससं गतव्रीडं जटिलं धूलिधूसरम् ॥
पुण्याधिका हि पश्यन्ति गंगाधरमिवाऽऽत्मजम् ॥ ४७६ ॥

" ज्यास पुण्य—विशेष घडला आहे असेच धन्य पुरुष शिवास व स्व-पुत्रास दिगंबर, यथेच्छ वर्तन करणारा, जटाधारी आणि धुळीने मळलेला असा पहातात. " वरील विशेषणे दोहोंकडे सहजच लागणारी आहेत.

---

मलिनैरलकैरेतैः शुक्लत्वं प्रकटीकृतम् ॥
तद्रोषादेव निर्याता वदनाद्दशनावलिः ॥ ४७७ ॥

" केश हे मूळचे मलिन ( काळे ) असता त्यांनीं आपले शुक्लत्व धारण केले, या रोषानेच जणू काय दंतपंक्ति निघून गेली ! "

---

श्रुतिः शिथिलतां गता स्मृतिरपि प्रनष्टाऽधुना
गतिर्विपथमागता विगलिता द्विजानां ततिः ॥

गवामपि च संहतिः समुचितक्रियातश्च्युता
कृता नु जरया तया कलियुगस्य साधर्म्यता ॥ ४७८ ॥

जरेचे व कलियुगाचे साम्य.–" ( जरापक्षी ) कर्ण मंद झाले आहेत, स्मृति नष्ट होत चालली आहे, नीट चालता येत नाहीं, दांत पडले आहेत व इंद्रियांचे समुचित व्यापार त्याजकडून होत नाहींत."

( कलियुगपक्षी ) " वेदाचें माहात्म्य कमी झाल आहे, स्मृति लुप्तप्राय झाली आहे, सद्गतीचा मार्ग सुटला, ( विद्वान् ) ब्राह्मणांचा समुदाय दृष्टीस पडत नाहींत, गाईची लोक शुश्रूषा करीत नाहींत."

---

सीदंति सतो विलसंत्यसंत पुत्रा म्रियंते जनकाश्चिरायु ॥
परेषु मैत्री स्वजनेषु वैरं पश्यंतु लोका कलिकौतुकानि ॥४७९॥

" कलींतील प्रकार किती विचित्र आहे पहा ! सज्जन दुःख पावतात, दुर्जन मजा करतात; पुत्र मरण पावतात, बापास दीर्घायुष्य होतें, परक्याशीं स्नेहभाव आणि स्वजनाशीं वैर ! "

---

सद्वंशजात गुणकोटियुक्त धनु कथं पार्थिववामहस्ते ॥
शरः परप्राण वेहारदक्ष. सपक्षपातोऽप्यधमो गरीयान् ॥ ४८० ॥

" हे राजा ! जें धनुष्य सद्वंशापासून ( पक्षीं, उत्तम वेळूपासून ) झालेलें व गुणकोटीने ( पक्षीं, दोरी, व टोके यांनीं ) युक्त ते तू डाव्या हातांत बाळगतोस आणि जो बाण दुसऱ्याच्या प्राणाच्या नाशाविषयीं कुशल व पक्षपातयुक्त ( पक्षीं, पंख लावलेला ) त्यास उजव्या हातात घेऊन गौरवितोस हा केवढा अन्याय ! "

---

नन्वाश्रयस्थितिरियं तव कालकूट
केनोत्तरोत्तरविशिष्टपदोपदिष्टा ॥
प्रागर्णवस्य हृदयं वृषलक्ष्मणोऽथ
कंठेऽधुना वससि वाचि पुन खलानाम् ॥ ४८१ ॥

" हे कालकूटा ! तुला उत्तरोत्तर वरच्या वरच्या स्थानाचा आश्रय करण्यास कोणीं शिकविलें ? पूर्वी तू सागराच्या हृदयाचे ठायीं वास करीत

होताम, पुढे शिवाच्या कठाचा आश्रय केलास आणि शेवटीं खलाच्या वाणीचे टायीं राहिलाम ! ”

---

आपूर्येत पुनः स्फुरच्छफरिकास्मारोर्मिभिर्वारिभि-
र्भूयोऽपि प्रविजृंभमाणनलिनं पश्येम तोयाशयम् ॥
इत्याशाशततंतुबद्धहृदयो नक्तंदिनं दीनधी
शुष्यत्यातपशोषितस्य सरसस्तीरे जरत्सारस ॥ ४८२ ॥

“ जलाशय माशाच्या क्रीडेनें ज्यात तरंग उत्पन्न होताहेत अशा उदकानीं पुनः भरून जाईल व यात कमलें विकसलेलीं मी पुनः पाहीन, अशा आशातंतूनीं ज्याचें हृदय रात्रदिवस बद्ध झालें आहे, असा वृद्धहंस या सरोवराच्या तीरा दीन होत्साता उन्हाचा ताप सोशीत बसला आहे ! ”

---

वैद्या वदंति कफपित्तमरुद्विकारा-
ञ्ज्योतिर्विदो ग्रहगतिं परिवर्तयंति ॥
भूताभिषंग इति भूतविदो वदंति
प्राचीनकर्म बलवन्मुनयो वदंति ॥ ४८३ ॥

“ शरीरव्याधींची उपपत्ति चौघेजण चार प्रकारानीं करतात:—वैद्य कफवातपित्तांचे विकार म्हणतात, ज्योतिषी सांगतात कीं हीं ग्रहगतींचीं फलें होत, मांत्रिक भूतचेष्टा म्हणून सांगतात आणि ऋषि प्राक्तन कर्मापासून म्हणजे पूर्वजन्मींच्या आचरणापासून त्याची उपपत्ति करतात ! ”

---

काकः पद्मवने रतिं न कुरुते हंसो न कूपोदके
मूर्खः पंडितसंगमे न रमते दासो न सिंहासने ॥
कुस्त्री सज्जनसंगमे न रमते नीचं जनं सेवते
या यस्य प्रकृतिः स्वभावजनिता केनापि न त्यज्यते ॥ ४८४॥

“ कावळ्यास कमलवनाची शोभा पाहून आनंद होत नाहीं, हंस हा कूपोदकाचे ठायीं रमत नाहीं, मूर्खाला पंडिताच्या समागमानें संतोष होत नाहीं, दासास राजसभा काय होय ? व्यभिचारिणी स्त्री सज्जनाच्या संगतीनें सुख पावत नाहीं, तर नीच जनाचा समागम तिला आवडतो, एकदरीत जी ज्याची स्वभावसिद्ध प्रकृति ती कोणाच्यानें सोडवते ? ”

**हस्ती वन्यः स्फटिकघटिते भित्तिभागे स्वबिंबम् ॥**
**दृष्ट्वा दृष्ट्वा प्रतिगज इति त्वद्विषां मंदिरेषु ॥**
**दंताघाताद्दलितदशनस्तं पुनर्वीक्ष्य सद्यो**
**मंदं मंदं स्पृशति करिणीशंकया विक्रमार्क ॥ ४८५ ॥**

" हे विक्रमादित्या ! तुझ्या शत्रूच्या मंदिरी वनातला हत्ती जाऊन तेथील स्फटिकभिंतीचे टायीं आपले प्रतिबिंब पाहून हा दुसरा हत्ती आहे या बुद्धीनें त्यास टक्कर देतो, पण पुढे काय होते की, वरील आघाताच्या योगाने त्याचे दात मोडून गेले असता पुनः त्याच भिंतीकडे तो मंदमंद जाऊन हस्तिनीच्या बुद्धीने त्याच आपल्या प्रतिबिंबास गोंजारूं लागतो ! "

---

**ग्रासोद्गलितसिक्थस्य का हानिः करिणो भवेत् ॥**
**पिपीलिका तु तनैव सकुटुंबोपजीवति ॥ ४८६ ॥**

" हत्तीने घास उचलला असता त्यातील शीत जर गळून पडले तर त्यांत त्याची हानि ती काय ? पण ह्या शितांतच मुंगीच्या कुटुंबाचा निर्वाह होतो ! "

---

**दरिद्रता धीरतया विराजते कुरूपता शीलतया विराजते ॥**
**कुभोजनं चोष्णतया विराजते कुवस्त्रता शुभ्रतया विराजते ४८७**

" दरिद्र पुरुष जर स्वभावाने गंभीर असेल तर त्या गुणाने त्याचें दारिद्र्य शोभले जातें; कुरूप मनुष्य जर सुशील आहे तर तो शोभला जातो. कदन्न उष्ण असल्याने शोभून जातें, आणि जीर्ण वस्त्र स्वच्छतेनें शोभतें."

---

**पत्रपुष्पफलच्छायामूलवल्कलदारुभिः ॥**
**धन्या महीरुहा यभ्या निराशा यांति नार्थिनः ॥ ४८८ ॥**

" पाने, फुले, फळें, छाया मूळे, साली व लाकडें यापैकीं कोणत्या कोणत्या तरी तऱ्हेनें ज अर्थिजनाचे मनोरथ पूर्ण करतात ते वृक्ष धन्य होत!"

---

**कीटगृहं कुटिलोऽतः कठिनः क्षारांबुसंभवः शून्यः ॥**
**शंखः श्रीपतिनिकटं केन गुणेन स्थितिं लेभे ॥ ४८९ ॥**

" हा शंख पाहिला तर मुळीं विंड्याचे घर, आत कुटिल, जात्या कठिण, क्षारोदकात जन्म पावलेला आणि शून्य,--असा असता विष्णूपाशी यास आश्रय जा मिळाला तो कोणत्या गुणेकरून असेल तो असो ! "

---

सुधाकरकरस्पर्शाद् वाई द्रवसि सर्वतः ॥
चंद्रकांतमणे तेन मृदुत्वं लोकविश्रुतम् ॥ ४९० ॥

" हे चंद्रकांत मण्या ! शीतलत्वाविषयीं येवढें प्रख्यात जे चंद्राचे किरण त्याचा स्पर्शही तुला कठोर लागून तू द्रव पावतोस, तस्मात् तुझी मृदुत्वाची कीर्ति यथार्थ आहे ! "

---

चित्रं न तद्यदयमंबुधिरंबुदौघ-
सिंधुप्रवाहपरिपूर्णतया महीयान् ॥
त्वं त्वर्थिनामुपकरोषि यदल्पकूप
निष्पीड्य कुक्षियुगलं हि महत्त्वमेतत् ॥ ४९१ ॥

" मेघापासून होणाऱ्या वृष्टीने व नद्यांच्या जलप्रवाहेंकरून सागर हा सदोदित परिपूर्ण असतो यात काहीं नवल नाहीं, पण हे अल्पकूपा ! तूं आपल्या कुक्षींचें निष्पीडन करून तृषिताची पीडा दूर करतोस हे तुझें महत्त्व बरीक वर्णन करण्यासारखे खरें ! "

---

कंपंते गिरय पुरंदरभिया मैनाकमुख्याः पुनः
क्रंदंत्यंबुधराः स्फुरंति वडवावक्त्रोद्गता वन्हयः ॥
भो कुंभोद्भव मुच्यतां जलनिधिः स्वस्त्यस्तु ते सांप्रतम्
निद्रालुश्लथबाहुवल्लिकमलाश्लेषो हरिः सीदति ॥ ४९२ ॥

" हे अगस्त्या ! तू समुद्रास अंजलिगत करून प्राशू पाहात आहेस, पण ही पहा काय तारांबळ उडून गेली ती !---इंद्राच्या वज्रापासून भय पावलेले मैनाकादि पर्वत जे आजपर्यंत समुद्रात सुखरूप दडून राहिले होते ते आता इंद्राचे धाकाने कापू लागले आहेत, मेघ रडू लागले आहेत, वडवाग्नि निराश्रय होणार यास्तव तो मुखावाटे ज्वाला टाकू लागला आहे, आणि झोपाळु व जिची मिठी सईल पडली आहे अशा लक्ष्मीने आलि-

गित जो हरि तोही दुःख पावन आहे,—तर तुला कांहीं दया येऊं दे व समुद्रास सोड कमा ! ”

- --

कोणी मानिनी आपल्या सखीस म्हणते:—

**भ्रूभंगे रचितेऽपि दृष्टिरधिकं सोत्कंठमुद्वीक्षते**
**रुद्धायामपि वाचि सस्मितमिदं दग्धाननं जायते ॥**
**कार्कश्यं गमितेऽपि चेतसि तनू रोमांचमालंबते**
**दृष्टे निर्वहणं भविष्यति कथं मानस्य तस्मिञ्जने ॥ ४२३ ॥**

“ अग ! तो प्रियजन दृष्टीसमोर असला म्हणजे मी आपल्याकडून कितीही मानधारण केला तरी तो पार कसा पडावा ? पहा कीं, मी आपल्याकडून जरी बळेच कपाळाला आठ्या घातल्या, तरी माझी दृष्टी त्याच्या मुखाकडे लागून माझें हृदयगत औत्सुक्य प्रगट करते, मी मुकस्तभ जरी बसले तरी अंतर्गत हर्ष या मेल्या तोंडावर स्मिताच्या रूपाने आविर्भूत होतो; आणि मन कितीही कठीण केलें तरी अंगावर येणारा कांटा कशाने लपणार ? तेव्हा वरील बाह्य चिन्हांनीं मानाचे कृत्रिमत्व व्यक्त होतें ! ”

---

**जन्मस्थानं न खलु विमलं वर्णनीयो न वर्णो**
**दूरे पुंसां वपुषि रचना पंकशंकां करोति ॥**
**यद्यप्येवं सकलसुरभिद्रव्यगर्वापहारी**
**को जानीते परिमलगुणः कोऽपि कस्तूरिकायाः ॥ ४२४ ॥**

“ कस्तूरीचें जन्मस्थान पाहिलें तर ते मोठें निर्मळ आहे असे नाहीं, वर्णही वर्णनीय आहे असे नाहीं, तिचा लेप अंगावर केला असता चिखल लिंपला आहे कीं काय असा भास होतो; पण इतके असूनही ती साऱ्या सुगंधी द्रव्याच्या तोंडात मारते, तेव्हा हा तिचा काय लोकोत्तर गुण आहे पहा ! ”

---

**मौलौ सन्मणयो गृहं गिरिगुहा त्यागः किलात्मत्वचो**
**निर्यत्नोपनतैश्च वृत्तिरनिलैरेकत्र चर्येदृशी ॥**

**अन्यत्रानृजुवर्त्मता द्विरसना वक्त्रे विषं वीक्षणम्**
**सर्वामंगलसूचकं कथय भो भोगिन्सखे किं न्विदम् ॥४९५॥**

" हे सर्पा ! तुझ्या मस्तकावर पहावे तो उत्तम रत्ने चमकताहेत, तुझें निवासस्थान पर्वताच्या गुहा हात त्याग ( पक्षी, दान ) तर स्वतः आपल्या त्वचेचाही तू करतोस. नहर्मांची तुझी वृत्ति पाहिली तर अयत्न सुलभ जो वायु त्यावर तुझा निर्वाह चालता -एकीकडे पहावे तो तुझी एकदर चर्या अशी, पण दुसरीकडे पहा काय आहे ते '—कुटिलगति ( कपटाचरण ) दोन जिभा ( चहाडी ), तोंडात विष ( कटु भाषण ) आणि अत्यंत अमंगलदायक दर्शन, तव्हा तुझा त्यगा प्रकार तरी कोणता म्हणावा ? '

---

**काकस्य कति वा दंता मेषस्यांडं कियत्पलम् ॥**
**गर्दभे कति रोमाणि इयर्थैषा तु विचारणा ॥ ४९६ ॥**

" कावळ्यास दात किती असतात, मेंढाच्या अंडात किती मास असत, गाढवाच्या अंगावर किती रोम असतात --इत्यादि गोष्टींची विचक्षणा करीत बसणे म्हणजे मूर्खपणा आहे '

---

**नैषां सन्ध्याविधिरविकलो नाच्युतार्चाऽपि सांगा**
**न स्वे काले हवननियमो नापि वेदार्थचिंता ॥**
**न क्षुद्वेलानियतमशन नापि निद्रावकाशो**
**न द्वौ लोकावपि तनुभृतां राजसेवापराणाम् ॥ ४९७ ॥**

" जे राजसेवेत नियुक्त झाले त्यांची संध्या पुरती व्हावयाची नाहीं, देवपूजा धड उरकायाची नाहीं, यथाकाली होम घडायाचा नाहीं, वेदार्थाचे मनन करण्यास त्यास अवकाश नाही. वेळेवर जेवण नाहीं व झोंपही नाही. सारांश. त्या हतभाग्यास इहलोकींचें सुख लाभत नाहीं व परलोकींचें नाहीं ! '

---

**निर्वृत्ताध्वरकृत्य ऋत्विजमहो नीर्णापगो नाविकम्**
**युद्धांते सुभटं च सिद्धविजयो वोढारमामस्थल ॥**

**वृद्धं वारवधूजनं च कितवो निर्धूतयौवनो**
**ध्वस्तातंकचयश्चिकित्सकमपि द्वेष्टि प्रदेयार्थिनम् ।। ४९८ ॥**

" यज्ञकर्म उरकून गेले असता यजमानास ऋत्विज नकोसा होतो, नदी आलांडून गेलेल्या उतारूस नाविक तृणवत् वाटू लागतो, युद्ध समाप्त झाले की योद्धा म्हणजे कःपदार्थ होऊन जातो, एकदा स्थळ मिळाले म्हणजे मग वराम कोणी विचारीत नाही, व्यसनी लोक हे वारवधूंचा बहार भोगून मोकळे झाले म्हणजे मग त्यास पुरतनासे होतात आणि रोगास दूर करून आपला झालेला पैसा वैद्य मागू लागला की तो माजी रोग्यास दुस्मान वाटू लागतो ! "

---

**स्वाधीना दयिता सुतावधि सुतोऽसौ षोडशाब्दावधि**
**स्यात्कन्या करपीडनावधि सुतस्त्रीस्तद्दशात्वावधि ॥**
**जामाता बहुलार्पितावधि सखा साधुप्रलापावधि**
**शिष्यो गुह्यनिरूपणावधि परे चैते धनित्वावधि ॥४९९॥**

" जोपर्यंत मुलगा झाला नाही तोपर्यंत नायको आपल्या स्वाधीन, मुलगा सोळा वर्षापर्यंत, मुलगी लग्न होई तोपर्यंत, सून तीस यौवनदशा प्राप्त होई तोपर्यंत, जावई जोपावतो पुष्कळ पोचते आहे तोपर्यंत, मित्र लोक आपणास बरे म्हणताहेत तोपर्यंत, शिष्य गुरुविद्या मागून दिली नाही तोवर आणि सामान्यतः इतर लोक जवळ पैसा आहे तोपर्यंत ! "

---

**तापं लुंपसि सर्वतो वितरसे मुक्ताफलं शुक्तिषु**
**क्षेत्रं सिंचसि किंच पल्लवयसि श्रीखंडमुख्यान्द्रुमान् ॥**
**क्षारं क्षारमिदं जलं जलनिधेरादाय जीमूत हे**
**विश्वं जीवयसि ब्रवीतु जगति प्रौढोऽपि कस्ते गुणान् ॥ ५००**

' हे मेघा ! तू साऱ्या जगाचा ताप घालवितोस, समुद्रातील शिंपात मोती उत्पन्न करतोस, शेते शिंपतोस, चंदनादि वृक्षास पल्लवित करतोस, समुद्राचे अतिशय खारट जे पाणी ते शोषून घेऊन विश्वाचे पुनरुज्जीवन करतोस, तेव्हा कोणी केवढाही प्रौढ वक्ता झाला तरी तुझ्या गुणाचे यथास्थित वर्णन करणे केवढे दुरापास्त आहे ! "

स्निग्धेंद्रोपलसुंदर कचभरो वक्त्रं सगांत्रं विधा-
र्वक्षोजौ मणिकुंभडंबरमुषौ मध्योऽस्ति वा नास्ति वा ॥
श्रोणिमंडलमूरुदुर्वहमहो शोणाब्जतुल्ये पदे
मन्ये मंजुगिरां मरालमहिलाध्येयो गतेर्विभ्रमः ॥ ५०१ ॥

" तुळतुळीत इंद्रनीलाप्रमाण सुंदर केशपाश, चंद्रासारखें रमणीय मुख, रत्नकलशाच्या डौलाचे स्तन, मध्यभाग ( कटिप्रदेश ) हा सरासरी आहे किंवा नाहीं, भाऱ्यास न झेपणारा असा जघनभार, रक्तकमलतुल्य पावलें, मधुर कंठाचा आणि हंसस्त्रियांनीं ध्यास पाहून धरावे असा गतिविलास ! "

---

देवो हरिर्वहतु वक्षसि कौस्तुभं त-
न्मन्ये च काचन पुनर्द्युमणेः प्रतिष्ठा ॥
यत्पादसंगतिसमर्पितसौरभाणि
धत्ते स एव शिरसा सरसीरुहाणि ॥ ५०२ ॥

"विष्णु हा कौस्तुभास स्वहृदयीं धारण करो; पण त्याच्याहून दिनमणीची प्रतिष्ठा मला फार अधिक वाटते. का तर, त्याच्या पादस्पर्शानें विकास प्राप्त होऊन ज्याचा सुगंध प्रगट झाला आहे अशीं कमळें विष्णु आपल्या शिरीं धारण करतो ! "

---

राज्यं येन पटांतलग्नतृणवत्त्यक्तं गुरोराज्ञया
पाथेयं परिगृह्य कार्मुकवरं घोरं वनं प्रस्थितः ॥
स्वाधीनः शशिमौलिचापविषये प्राप्तो न वै विक्रियाम्
पायाद्वः स बिभीषणाग्रजनिहा रामाभिधानो हरिः ॥ ५०३ ॥

" ज्यानें वस्त्राच्या दशेला अडकलेल्या तृणाप्रमाणें आपल्या पित्याच्या आज्ञेवरून राज्य सोडून दिलें, जो धनुष्य हेंच काय तें पाथेय ( शिदोरी ) बरोबर घेऊन घोर अरण्यांत गेला, जो स्वतंत्र आहे, ज्याला शंकरचापाच्या दर्शनेंकरून भीति वाटली नाहीं, तें ज्यानें सहज मोडून टाकलें आणि बिभीषणाच्या थोरल्या भावाचा ज्यानें वध केला तो रामनामधारी विष्णु तुमचें रक्षण करो. "

**कुलाचला यस्य मही द्विजेभ्यः प्रयच्छत सीमदृषत्वमापु ॥**
**बभूवुरुत्सर्गजलं समुद्रा स रैणुकेय श्रियमातनोतु ॥५०४॥**

ज्याच्या पृथ्वीप्रदानसमयीं अष्टकुलाचल हे ब्राह्मणाच्या दानविषयक भूमीचे धोंडे झाले आणि समुद्र दानोदक झाले, तो रेणुकापुत्र तुम्हांस श्रेयस्कर होवो !'

---

**पदव्यक्तीव्यक्तीकृतसहृदयानंदसरणी**
**कवीनां काव्येन स्फुरति बुधमात्रस्य धिषणा ॥**
**नवक्रीडावेशव्यसनपिशुनो य कूलवधू-**
**कटाक्षाणां पंथाः स खलु गणिकानामविषय ॥ ५०५ ॥**

शब्दश्रवणमात्रेकरून महृदयाच्या ठायीं उत्पन्न होणारा जो आल्हाद तो कवीच्या काव्याचे ठायीं जाल्यास मात्र बुद्धिगोचर होतो. कसा ? तर ज्याप्रमाणे नूतन समागमाच्या योगानें प्राप्त झालेल्या रसिकत्वाचे दर्शक जे कुलवधूचे कटाक्ष ते गणिकाजनांस अगम्य असतात'

---

**ते पृथ्वीपतयो जयंति नतयो येषां द्विषद्भूभृताम्**
**ते वंद्या यतयो विशंति मतयो येषां परं ब्रह्मणि ॥**
**ते श्लाघ्या कवयो वयोमदभरव्याजृंभमाणांगना-**
**दृक्पाता इव तोषयंति हृदय येषां गिरां संचयाः ॥ ५०६ ॥**

" ते राजे धन्य, की ज्यांच्या पायावर त्यांच्या शत्रूस डोके घांसावे, लागते; ते यति धन्य, कीं ज्याच्या पायावर परब्रह्म हे गोचर झाले आहे, आणि ते कवि धन्य, कीं ज्यांचे वाग्विलास तरुणीच्या मदपूर्ण कटाक्षाप्रमाणे रसिकाच्या हृदयास हृष्ट करतात ! "

---

कृष्णावतार समाप्त झाल्यावर अर्जुनाची जी दुर्दशा उडाली तिचें तो खेदपूर्वक वर्णन करतो:--

**त एवामी बाणास्तदपि हरलब्धं धनुरिदम्**
**स एवाहं पार्थः प्रमथितसुरारातिनिचयः ॥**

**इमास्तास्ता गोप्यो हरिचरणचित्तैकशरणा**
**ह्रियंते गोपालैर्विधिरपि बलीयान्न तु नरः ॥ ५०७ ॥**

" अरेरे ! तेच ना हे माझे बाण, तेच हे शिवापासून प्राप्त झालेले धनुष्य, तोच हा मी अर्जुन, की ज्यानें दानवांचा सुद्धा संहार केला; आणि ही सर्व जुनीच सामग्री असता कृष्णाच्या पायाशीं ज्यांचा एकभाव अशा त्या गोपी या वनचरांनीं हरून न्याव्या काय ? तस्मात् दैव हें प्रबल होय. नराचा आपल्या पौरुषादिपर्यंचा अभिमान सारा खोटा ! "

---

**उत्सिक्तः कुसुमासवं कुमुदिनीं राजप्रियां पुष्पिणी-**
**मालिंगन्निशि निर्भयं परिचयं कुर्वन्पुनः पल्लवैः ॥**
**यावत्पंकजसौरभत्वमखिलं गृह्णल्लँघु प्रस्थित-**
**स्तावत्कल्य उपस्थिते मरुदयं दिग्व्यग्भयाद्धावति ॥ ५०८ ॥**

" पुष्पमधूने ( पक्षीं, मद्याने ) झिंगून गेलेला असा वायु राजप्रिया ( राणी पक्षीं, चंद्रवल्लभा ) जी कुमुदिनी ती पुष्पिणी ( फुललेली; पक्षीं, अस्पर्शा ) असता तिला आलिंगन देऊन तिच्या पल्लवाशीं ( पक्षीं, पदराशीं ) निर्भयपणे परिचय करीत होसाता समग्र सुगंधाचें हरण करून जों हळूंच जावयास निघाला आहे तों प्रभातकाळ समीप आलासा पाहून घाबऱ्या घाबऱ्या चोहोंकडे धावतो ! "

---

**अलंकरोति हि जरा राजामात्यभिषग्यतीन् ॥**
**विडंबयति पण्यस्त्रीमल्लगायकसेवकान् ॥ ५०९ ॥**

" राजाचे मंत्री, वैद्य व संन्यासी यास जरा ही भूषण आणते, तीच वारांगना, मल्ल, गायक व सेवक यास विडंबनेस पात्र करते ! "

---

**गर्जन्हरिः सांभसि शैलकुंजे प्रतिध्वनीनात्मकृतान्निशम्य ॥**
**पदं बबंध क्रमितुं सरोषः प्रतर्कयन्नन्यमृगेंद्रनादम् ॥ ५१० ॥**

" पर्वतावरील एका कुंजातील जलाशयाच्या काठीं असता सिंहानें मोठ्यानें गर्जना केली व तिजसरसे चोहोंकडे प्रतिध्वनि उठले; ते ऐकून सिंह त्वेषास चढून अन्य सिंहाच्या शंकेनें त्यावर झांप घालण्यास तयार झाला !"

उपानीत दूरात्परिमलमुपाघ्राय मरुता
समायासीदस्मिन्मधुरमधुलोभान्मधुकर ॥
परो दूरे लाभः कुपितफणिनश्चंदनतरोः
पुनर्जीवन्यायाद्यदि तदिह लाभोऽयमतुल ॥ ५११ ॥

" हा मधुकर वाऱ्यावर वाहत आलेल्या परिमलास हुंगून मधुर मधूच्या लोभाने या चंदनाकडे आला आहे. आता यास वरील लाभ होणे तर दुरापास्तच आहे, पण वरील वृक्षावर जो क्रुद्ध सर्प आहे त्याच्या तडाक्यातून वाचून हा जिवंत माघारा जावो म्हणजे यास मोठी मिळकतच ! "

---

दष्टे जगद्वपुषि कालभुजंगमेन
तत्रांधकारमिषमाविरभूद्विषं यत् ॥
संजातलक्ष्मणि तदिंदुमणौ निपाय्य
ज्योत्स्नामये पयसि तत्क्षिपति स्म धाता ॥ ५१२ ॥

" कालरूप भुजंगमाने ( पक्षी कृष्णसर्पाने ) जगद्रूप शरीरास दंश केला असता अंधकाराच्या रूपाने जे विषार चोहोंकडे पसरले ते पाजविल्याने ज्याला काळेपणा आला आहे असा चंद्र आला असता, नंतर त्यास चंद्रिकारूप दुग्धराशींत ब्रह्मदेव जणो काय टाकता झाला ! "

---

सुधाधाम्नः कांतिस्तव वदनपंकरुहगुणै-
र्जितेव म्लानत्वं व्रजति सहसा प्राणदयिते ॥
वदत्येवं कांते दिवसविरहातंकचकिता
तदंगे संलग्ना तव दिशतु राधा प्रियशतम् ॥ ५१३ ॥

" हे प्राणप्रिये ! तुझ्या मुखकमलाच्या कांतीने जणू काय लज्जित झालेली अशी ही चंद्राची शोभा म्लानत्व पावत आहे असे वाटते, याप्रमाणे कृष्णाचे भाषण ऐकून प्रातःकाल झालासा पाहून आता आपणास याचा विरह होणार म्हणून घाबरलेली व आपल्या वल्लभाच्या अंगावर जिने अंग टाकून दिले आहे अशी राधा तुझे बहुत कल्याण करो ! "

---

श्लेषे केचन शब्दगुंफविषये केचिद्रसे चापरेऽ-
लंकारे कतिचित्सदर्थविषये चान्ये कथावर्णके ॥

आः सर्वत्र गभीरधीरकविताविंध्याटवीचातुरी
संचारे कविकुंभिकुंभभिदुरो बाणस्तु पंचानन. ॥५१४॥

" कोणी कवि श्लेषातच निपुण असतात, कोणी शब्दशय्येत, कोणी रसात कोणी अलंकारात, कोणी प्रौढ अर्थाचें निबंधन करण्यात, किंवा कोणी कथानक बांधण्यांत, पण कवितारूप गहन विंध्याटवींत संचार करण्याविषयीं अत्यंत कुशल असा म्हटला म्हणजे कविराजांचा गर्व परिहार करणारा एक बाणरूप सिंहच होय ' "

---

ये संतस्तु विवादिनः परयशःशल्येन शूलाकुला
कुर्वंति स्वगुणस्तवेन गुणिनां यत्नाद्गुणाच्छादनम् ॥
तेषां रोषकषायितोदरदृशां कोपेक्षणानिःश्वासिनाम्
दीप्ता रत्नशिखेव कृष्णफणिनां विद्या जनोद्वेगिनी ५१५

" जे सभेत नेहमीं वाग्जल्प करणारे, दुसऱ्याच्या कीर्तिश्रवणाने ज्याच्या पोटात शूळ उठतो व जे आपल्या गुणाची प्रशंसा करून दुसऱ्याच्या गुणाचें आच्छादन करण्याविषयीं नेहमीं उत्सुक असतात, अशाची विद्या रागाने ज्यांची दृष्टि लाल झाली आहे व जे उष्ण निःश्वास टाकताहेत. अशा कृष्ण सर्पाच्या शिरोरत्नाप्रमाणें लोकास अत्यंत भयावह होय ' "

---

ज्योतिःशास्त्रमहोदधौ बहुतरोत्सर्गापवादात्मभि
कल्लोलैर्निबिडे कणान्कतिपयाँल्लब्ध्वा कृतार्था इव ॥
दीर्घायुःसुतसंपदादिकथनैर्दैवज्ञपाशा इमे
गेहं गेहमनुप्रविश्य धनिनां मोहं मुहुः कुर्वते ॥ ५१६ ॥

" बहुत नियम व अपवाद या तरंगानीं व्याप्त असा जो ज्योतिःशास्त्र रूप महासागर त्यातले थोडेसे कण प्राप्त झाल्यानें केवळ कृतार्थ होऊन बसलेले असे जे छोटेखानी ज्योतिषी ते दीर्घायुष्य, संतति, संपत्ति, इत्यादिकाविषयीं धनिकास आशीर्वाद देत दारोदार हिंडतात ! '

---

उपचारः कर्तव्यो यावदनुत्पन्नसौहृदाः पुरुषाः ।
उत्पन्नसौहृदानामुपचारः कैतवं भवति ॥ ५१७ ॥

" जोपर्यंत कोणाशीं मैत्री जडली नाहीं तोपर्यंत त्यास आदरसत्कारादि उपचार करावे; पण एकदा मैत्री जुळल्यावर मग वरील उपचार करणें हे ढोंग दिसते ! "

---

/ मांसं मृगाणां दशनौ गजानां मृगद्विषां चर्म फलं द्रुमाणाम् ॥
स्त्रीणां स्वरूपं च नृणां हिरण्यमेते गुणा वैरकरा भवंति ॥५१८॥

" मृगाचें मांस, हत्तींचे दांत, सिंह व वाघ यांचें कातडें, वृक्षाचें फळ, स्त्रियांचें सौंदर्य आणि धनाढ्याचें द्रव्य,--हे सर्व गुण प्रत्येकाच्या नाशास कारणभूत होतात. "

---

दारेषु किंचित्स्वजनेषु किंचिद्गोप्यं वयस्येषु सुतेषु किंचित् ॥
युक्तं न वा युक्तमिदं विचिंत्य वदेद्विपश्चिन्महतोऽनुरोधात् ५१९

" कांहीं गोष्टी बायकोपासून गुप्त ठेवाव्या लागतात, कांहीं चाकरमाणसांपासून, कांहीं मित्रांपासून व कांहीं पुत्रापासून. एकंदरींत कोणतीही गोष्ट युक्त आहे कीं अयुक्त आहे याचा विचार करून शहाण्या मनुष्यानें मोठें धोरण ठेवून चालत असावें. "

---

/ राष्ट्रस्य चित्तं कृपणस्य वित्तं मनोरथं दुर्जनमानुषाणाम् ॥
स्त्रियाश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं देवा न जानाति कुतो मनुष्यः ५२०

" राष्ट्राची चित्तवृत्ति, कृपणाचें धन, दुर्जनाचें मनोप्सित, स्त्रियाचें कामचरित आणि पुरुषाचा भाग्योदय.-या पांचांचा देवाससुद्धां थांग लागत नाहीं, मग माणसाचा काय पाड ! "

---

सतश्चेदमृतेन किं यदि खलस्तत्कालकूटेन किम्
दातारो यदि कल्पशाखिभिरलं यद्यर्थिनः किं तृणैः ॥
किं कर्पूरशलाकया यदि दृशः पंथानमेति प्रिया ॥
संसारेऽपि सतींद्रजालमपरं यद्यस्ति तेनापि किम् ॥ ५२१ ॥

" जर सज्जनाचा समागम आहे तर अमृत कशाला पाहिजे ? दुर्जनाशीं संबंध आहे तर कालकूटाचें काय प्रयोजन ? दाते आहेत तर कल्प-

वृक्षांची काय गरज आहे ? याचकापुढे तृणाची काय मातब्बरी आहे ? प्रिया दृष्टीस पडली असता कापराच्या काडीने डोळे किती गार होणार ? संसाराच्या विचित्र पसाऱ्यापुढे गारुड्याचा खेळ झक मारतो ! ''

---

कलहांतानि हर्म्याणि कुवाक्यांतं च सौहृदम् ॥
कुराजांतानि राष्ट्राणि कुकर्मांतं यशो नृणाम् ॥ ५२२ ॥

'' कलह लागला की घर बुडाले, दुर्वचनाचा प्रयोग झाला की मैत्री आटपली, वाईट राजा आला की राष्ट्राची इतिश्री समजावी, दुष्कर्म घडले की अब्रु खाली झाली !

---

वित्तं परिमितमधिकव्ययशीलं पुरुषमाकुलीकुरुते ॥
ऊनं शुक्रमिव पीनस्तनजघनायाः कुलीनायाः ॥ ५२३ ॥

'' जो हाताचा सढळ त्याला थोडा आदा असला म्हणजे फार पीडा होते; की त्याप्रमाणे स्तन व जघन याचा विस्तार कुलीन स्त्रियेस आखुड वस्त्रामुळे संकोचदायक होतो !

---

येनांचलेन सरसीरुहलोचनाया-
स्त्रातः प्रभूतपवनादुदये प्रदीपः ॥
तेनैव सोऽस्तसमयेऽस्तमयं विनीतः
क्रुद्धे विधौ भजति मित्रममित्रभावम् ॥ ५२४ ॥

'' कमलाक्षीच्या ज्या पदराच्या योगाने वाऱ्यापासून दीपाचे प्रथम संरक्षण झाले, तोच पदर पुढे त्यास अस्तास पावविण्यास कारणीभूत झाला. तेव्हां दैव प्रतिकूल झाले असता मित्रही शत्रु बनतो !

---

सहजमलिनवक्रभावभाजां भवति भवः प्रभवात्मनाशहेतुः ॥
जलधरपदवीमवाप्य धूमो ज्वलनविनाशमनुप्रयाति नाशम् ५२५

'' जे स्वभावतःच मलिन व वक्र त्यास उन्नति प्राप्त झाली असता ते आपल्या व जनित्याच्या नाशास सुद्धा कारण होतात, पहा की, धूम हा मेघ बनला की, अग्नीच्या उपशमास कारण होऊन नंतर स्वतः लय पावतो ! ''

---

कल्पवृक्षोऽपि कालेन भवेद्यपि फलप्रद ॥
को विशेषस्तदा तस्य वन्यैरन्यमहीरुहैः ॥ ५२६ ॥

" कल्पवृक्षही जर अवकाशाने फलप्रद होऊ लागला. तर मग त्याच्यांत व इतर रानवट झाडात काय अंतर राहिले ? "

---

वर दारिद्र्यमन्यायप्रभवाद्विभवादपि ॥
शरीरे कृशता रम्या स्थूलता न तु शोफतः ॥ ५२७ ॥

' अन्यायाने मिळविलेल्या वैभवापेक्षा दारिद्र बरें, जसें, सुजेनें आलेल्या स्थूलपणापेक्षा सडपातळपणा बरा ! "

---

अंतर्विशति मार्जारी शुनी वा राजवेश्मनि ॥
बहिष्ठस्य गजेंद्रस्य किमर्थः परिहीयते ॥ ५२८ ॥

" माजरी व कुत्री या दोघी खुशाल राजवाड्यांत प्रवेश करतात, आणि हत्ती पाहिला तर त्यास जागा बाहेर ! पण असे असल्यानें हत्तीचें काय कमी होत आहे ? "

---

पीयूषेण सुराः श्रिया मुररिपुर्मर्यादया मेदिनी
शक्रः कल्परुहा शशांककलया श्रीशंकरस्तोषितः ॥
मैनाकादिनगा निजोदरगृहे यत्नेन संरक्षिता-
स्तच्चूलीकरणे घटोद्भवमुनिः केनापि नो वारितः ॥ ५२९ ॥

" समुद्राने देवास अमृत दिले, विष्णूस लक्ष्मीचे दान केले, पृथ्वीस मर्यादा दिली, इंद्रास कल्पवृक्ष दिला, शंकरास चंद्राची कला देऊन संतुष्ट केले आणि मैनाकादि पर्वतास आपल्या उदराचे ठायी ठाव दिला; पण ज्या वेळेस अगस्त्याने त्याला प्राशनार्थ अंजलींत घेतले त्या वेळेस वरच्यापैकीं एकानेंही त्याचें रक्षण केलें नाहीं ! "

---

रत्नाकरं परिहृता वसतिः किमन्य-
दंगीकृतः कठिनवेधनदुःखभारः ॥
वक्षोजकुंभपरिरंभणलोलुपेन
किं किं न तेन विहितं नवमौक्तिकेन ॥ ५३० ॥

" मौक्तिकाने समुद्रातली आपली वसती सोडून दिली, फार तर काय ? पण वेधनसंस्काराचें महादुःखही सहन केलें ! हें सर्व कशाकरतां ? तर कुचकुंभपरिरंभणाविषयीं जी त्याची उत्कट इच्छा ती तृप्त करण्याकरतां !"

---

यथा देशस्तथा भाषा यथा राजा तथा प्रजा ॥
यथा भूमिस्तथा तोयं यथा बीजं तथांऽकुरः ॥ ५३१ ॥

" जसा देश तशी भाषा; जसा राजा तशी प्रजा, जशी भूमि असेल तसें उदक असणार आणि जसें बीं असेल त्यामानानें झाड निपजणार !"

---

सद्य फलति गांधर्वं मासमेकं पुराणकम् ॥
वेदा फलंति कालेषु ज्योतिर्वैद्य निरंतरम् ॥ ५३२ ॥

" गायनविद्या तत्काल फलद्रुप होते, पुराणाची प्राप्ति महिन्यानं होते; वेदाचें फल कालांतरानं दृष्टीस पडतें आणि ज्योतिष व वैद्य हीं निरंतर लाभप्रद होतात !"

---

न देवाय न धर्माय न बंधुभ्यो न चार्थिने ॥
दुर्जनेनार्जितं द्रव्यं भुज्यते राजतस्करैः ॥ ५३३ ॥

"दुर्जनानें मिळविलेलें द्रव्य, देवकार्य, धर्मकृत्य, सबंधीजन किंवा याचक यांच्याकडे खर्च व्हावयाचें नाहीं, तर त्याचा उपभोग राजा किंवा तस्कर यांजकडून व्हावयाचा !"

---

नेता स्वयमुपभोक्ष्यसि मोक्ष्यसि चेज्जलद यत्र कुत्रापि ॥
तत्किं तत्र न मुंचसि मुक्ता मुक्ता भवंति यत्राऽऽप ॥ ५३४ ॥

" हे मेघा ! जर हा जलसंचय तूं स्वतः उपभोगणार आहेस असें नाहीं व कोठें तरी यदृच्छेनें टाकून देणार, तर ज्या ठिकाणीं जलबिंदु सोडले असतां ते मौक्तिकरूप होतात तेथें त्या संचयाचा तूं कां विनियोग करीत नाहींस ?

---

पाथोनिधिमाश्रि पाथो वितरसि पाथोद किं तेन ॥
दिनकरकराभितप्तं चातकपोतं न तोषयसि ॥ ५३५ ॥

" हे मेघा ! तू समुद्रावर वृष्टि करतोस, पण त्यापासून काय लाभ आहे ? सूर्यकिरणांपासून सताप पावलेल्या बालचातकांस तू कां संतुष्ट करीत नाहींस ? '

---

**सरलयोः किल सख्यमुदाहृत कुटिलयोर्घटनैव कदाचन ॥**
**यदि भवेत्सरलेन खलेन वा न चिरमास्ति धनुःशरयोरिव ॥ ५३६ ॥**

" खरें सख्य ज व्हावयाचें तें दोघा सरळ स्वभावाच्या पुरुषांत होऊं शकतें, कधीं कधीं तें कुटिल स्वभावाच्या मनुष्यांतही सांपडतें. पण एक खळ आणि एक सरळ अशांची संगति घडली असता ती फार वेळ टिकत नाहीं; यास उदाहरण कुटिल जें धनुष्य व सरळ जो बाण यांचें होय ! "

---

**राज्ये नहि सुखं दुःखं संधिविग्रहचिंतया ॥**
**पुत्रादपि भयं यत्र तत्र सौख्यं हि कीदृशम् ॥ ५३७ ॥**

" राज्यांत सुखलाभ मुळीं नाहीं, निरंतर संधि ( तह ) व विग्रह ( लढाई ) यांची चिंता असते. शिवाय जेथें प्रत्यक्ष पुत्रापासूनही भय तेथें सुख तें काय "

---

**छायामन्यस्य कुर्वंति स्वयं तिष्ठंति चाऽऽतपे ॥**
**फलंति वै परार्थे च नाऽऽत्मनोऽर्थे महाद्रुमाः ॥ ५३८ ॥**

" मोठाले वृक्ष हे दुसऱ्याकरतां छाया करतात आणि स्वतः उन्हांत राहतात; तसेंच केवळ दुसऱ्याकरताच ते फलद्रूप होतात ! "

---

**कः कं कं कं कान्हसाने च हसतो हसंति तन्वंग्या. ॥**
**दृष्ट्वा पल्लवमधरः पादौ पद्मं च कोरकान्दंताः ॥ ५३९ ॥**

" सुंदर स्त्रीचे कोणकोणते अवयव कोणकोणाला हसतात ? अधर पल्लवाला हसतो, पाय कमलांस व दांत कळ्यांस ! "

---

**अंतस्तिमिरनाशाय शाब्दबोधो निरर्थकः ॥**
**न नश्यति तमो नाम कृतया दीपवार्तया ॥ ५४० ॥**

" केवळ शाब्दिक बोधाने आतले अज्ञान नष्ट होत नाहीं; जसें 'दिवा दिवा ' असा उच्चार केल्याने अंधाराचा उजेड होत नाहीं ! "

---

लोके कलंकमपहातुमयं मृगांको
जातो मुखं तव पुनस्तिलकच्छलेन ॥
तत्रापि कल्पयसि तन्वि कलंकरेखाम्
नार्यः समाश्रितजनं हि कलंकयंति ॥ ५४१ ॥

" चंद्र हा आपणास जडलेला कलंक दूर व्हावा म्हणून मुखाच्या रूपाने प्रगट झाला, पण हे स्त्रिये त्यासही पुनः गोंदण्याच्या मिषाने तू कलंकित करतेस, तस्मात् ज्यानें तुझा आश्रय केला तो कलंकयुक्त व्हावयाचाच ! "

---

वासः प्रधानं खलु योग्यताया वासोविहीनं विजहाति लक्ष्मीः ॥
पीतांबरं वीक्ष्य ददौ तनूजां दिगंबरं वीक्ष्य विषं समुद्रः ॥ ५४२ ॥

" लोकांत मानमान्यता होण्यास वस्त्र हें प्रधान आहे, जो वस्त्रकळाहीन आहे त्याला लक्ष्मीचा लाभ दुरापास्त होय. पहा कीं, पीतांबर जो विष्णु त्याला समुद्राने आपली मुलगी अर्पण केली. आणि शिव हा केवळ दिगंबर, यास्तव त्यास विष दिलें ! "

---

आनंदतांडवपुरे द्रविडस्य गेहे
चित्रं वसिष्ठवनितासममाज्यपात्रम् ॥
विद्युल्लतेव परिनृत्यति तत्र दर्वी
धारां विलोकयति योगबलेन सिद्धः ॥ ५४३ ॥

" आनंदाचें वसतिस्थान असें जें द्रविडाचें घर त्याच्या घरीं तुपाची तपेली केवढी होती म्हणाल तर, अरुंधतीच्या येवढी ! * तींत पळी कशी

---

* सप्तऋषींचे उत्तरेकडे जे ठळक सात तारे आहेत त्यांतील सहावा वसिष्ठ त्याच्या शेजारीं अरुंधती बारीक लुकलुकत असते. ही दिसेनाशी झाली म्हणजे सहा महिन्यांनीं मनुष्य मरतो ही एक लौकिक कल्पना आहे हे आमच्या वाचकास माहीत असेलच !

खडखडत होती तर विद्युलतप्रमाण ! आणि तुपाची धार जी पानावर पडत होती ती सिद्धानेंच योगबलेकरून पहावी. इतरास अगोचर होय ! ''

---

**स्वगृहे पूज्यते मूर्खः स्वग्रामे पूज्यते प्रभुः ॥**
**स्वदेशे पूज्यते राजा विद्वान्सर्वत्र पूज्यते ॥ ५४४ ॥**

'' मूर्खास मान म्हटला म्हणजे त्याच्या घरातल्या घरात, अधिकाऱ्यास त्याच्या गावात, राजास त्याच्या देशात परंतु विद्वानास तो जिकडे जाईल तिकडे ! '

---

**अर्थाहरणकौशल्यं किं स्तुमः शास्त्रवादिनाम् ॥**
**अव्ययेभ्योऽपि ये चार्थान्निष्कासयंति ह्यनेकशः ॥ ५४५ ॥**

'' जे शास्त्रवेत्ते आहेत त्याची अर्थनिष्पादनाविषयीं जी निपुणता असते ती काय सांगावी ! प्रत्यक्ष अव्ययापासूनहि ते अर्थ काढू शकतात ! या श्लोकात ' अर्थ व ' अव्यय हे व्यर्थी शब्द होत हे उघडच आहे.''

---

**वक्त्रं पूर्णशशि सुधाऽधरलता दंता मणिश्रेणय**
**कांतिः श्रीर्गमनं गजः परिमलस्ते पारिजातद्रुमः ॥**
**वाणी कामदुघा कटाक्षलहरी तत्कालकूटं विषम्**
**मन्ये सुंदरि हा श्रमाय मथितो मूढैः सुरैः सागरः ॥५४६॥**

'' मुख हे पूर्णचद्र होय. अधरपल्लव हा सुधामय, दांताची पक्ति ही जणू रत्नेच होत, शरीरसौंदर्य हे लक्ष्मीच होय.' गजगात गमनाचे ठायीं आहे, निःश्वासाचे ठायीं पारिजाताचा सुवास अधिष्ठित आहे, वाणी केवळ कामधेनुच आणि कटाक्ष हे कालकूटतूल्य होत;—मग इतके सर्व आयतें सिद्ध असता जेव्हां देवानीं समुद्रमंथनाचा येवढा खटाटोप केला तेव्हा ते मूर्ख नव्हेत ? ''

---

**इंदुं निंदति चक्रवाकयुगुलं भास्वंतं निधिं कौशिकः**
**स्वादु क्षीरमरोचकी सुकृतिनं पापी [illegible] पंडितम् ॥**
**त्यक्तं सर्वजनैः खलः कटुवचा ग्राम्यः पुमान्नागरम्**
**कः पैतामहगोलकेऽत्र निखिलैः संमानितो वर्तते ॥५४७॥**

" चक्रवाकाचा जोडा चंद्रास निंदतो, दिवाभीत सूर्याचा तिटकारा करत, ज्याच्या तोंडाला रुची नाहीं तो मधुर जे दुग्ध त्यास नाव ठेवतो, पापी पुण्यवंताची व मूर्ख पंडिताची निंदा करतो, कटुभाषण करणारा जो खल तो सर्वांनीं सोडलेल्यास दोष देतो आणि गांवढळ मनुष्य शहरवासी पुरुषास वाईट म्हणतो—तेव्हा या ब्रह्मांडगोलांत सर्वांनीं समानित असा कोण आहे बरें ? "

---

" सीता हनुमतानें खालीं टाकलेल्या मुद्रिकेकडे पाहून खेदानें म्हणते:—

**श्रिया गेह मयाऽरण्ये रामस्त्यक्तस्त्वया पथि ॥**
**बत मुद्रे पुरध्रीणां प्रत्ययं कः करिष्यति ॥ ५४८ ॥**

" हे मुद्रे ! राज्यलक्ष्मीनें रामाला गृहींच सोडलें, मीं त्यास वनांत टाकून दिलें, आणि तूं त्यास मार्गांत सोडून आलीस, तेव्हा आतां स्त्रियांवर कोण विश्वास ठेवील ? "

---

**तुंगपीनकुचकुंभशोभिताध्वस्तसश्चलितचैलपल्लवा ॥**
**वेणुनादहृतचित्तवृत्तयश्चित्रवच्चलदृशोऽवतस्थिरे ॥ ५४९ ॥**

" मुरलीच्या नादानें ज्यांच्या चित्तवृत्ति हरण झाल्या आहेत आणि उत्तुंग व पुष्ट अशा कुचकुंभावरून स्रस्त झालेल्या पल्लवाचें ज्यांस भान राहिलें नाहीं, अशा गोपी चित्रासारख्या तटस्थ उभ्या राहिल्या !"

---

**किं द्रुतपदं प्रयासि प्रतीच्छ मुग्धे च्युत ह्यलंकारम् ॥**
**मृगयाम्यच्युतमेव भ्रष्टैरेतैर्न मे हानिः ॥ ५५० ॥**

" हे मुग्धे ! एवढ्या घाईनें काय चाललीस ? हा तुझा दागिना गळून पडला, तरी त्याची तुला शुद्ध नाहीं काय ? " ती उत्तर करिते, " मीं मुळीं अच्युताच्याच* शोधांत आहे. हे दागिने कितीहि सांडले तरी मला त्याची पर्वा नाहीं ! "

---

* ' अच्युत ' म्हणजे ' न सांडलेला, ' पक्षीं, कृष्ण ' '

**अहंकारो धियं ब्रूते मा सुप्तं प्रतिबोधय ॥**
**उदिते परमानंदे न त्वं नाहं न वै जगत् ॥ ५५१ ॥**

" अहंकार बुद्धीस सांगतो कीं, आत्मज्ञानजन्य जो परमानंद त्यास जागा करूं नको. तो जागा झाला कीं मी तूं व जगत् हीं तिन्ही नष्ट होऊन जातील !"

---

कोणी एखाद्या थोर मनुष्याच्या भेटीला कोणी गरीब मनुष्य गेला असतां त्याची हेटाळणी येणेप्रमाणे चालते--

**केचिन्निद्रागता केचित्कथयंति बहिर्गता ॥**
**केचिदंतर्गता केचिन्नो जाने क्व गता इति ॥ ५५२ ॥**

" कोणी म्हणतात यजमान निजले आहेत, कोणी सांगतात, बाहेर गेले आहेत म्हणून; कोणी म्हणतात, आंत कामांत आहेत, कोणी मुळींच कानावर हात ठेवतात !"

---

**सीताचिंताकुले रामे निद्रा निरगमद्रुषा ॥**
**कथमेकाकिनं जह्यामित्येवं न जहौ निशा ॥ ५५३ ॥**

" रामास सीतेविषयीं चिंतातुर पाहून निद्रा ही सवतीमत्सराने निघून गेली; आणि रात्रीस वाटले कीं, हा अगोदरच विरहातुर झाला आहे, तर याला एकट्याला सोडून कसे जावं ? म्हणून तीही जाईना. सारांश, रामास सीताविरहामुळे झोंप येईना व काहीं केल्या रात्रही जाईना !"

---

कोणी अद्वैतवादी परमेश्वरास म्हणतो:---

**देहबुद्ध्या तु दासोऽहं जीवबुद्ध्या त्वदंशकः ॥**
**तत्त्वबुद्ध्या त्वमेवाहमिति मे निश्चिता मति ॥ ५५४ ॥**

" देहबुद्धीने पाहतां मी तुझा दास आहे, जीवबुद्धीनें पाहतां तुझा अंश आहे, आणि तत्त्वबुद्धीने पाहतां मी आणि तूं स्वरूपतः एकच आहोंत, असा मीं सिद्धांत करून ठेवला आहे !"

---

**हे हेमकार परदुःखविचारमूढ**
**किं मां मुहुः क्षिपसि वारशतानि वन्हौ ॥**

**दग्धे पुनर्मयि भवंति गुणातिरेका**
**लाभः परं खलु मुखे तव भस्मपातः ।। ५५५ ।।**

" हे सुवर्णकारा ! तू परदुःखाविषयीं केवळ निश्चिंत आहेस. तूं मला शभरदां अग्नींत कां टाकतोस ? त्याच्या योगाने काय होतें आहे, कीं माझ्या ठायीं अधिकाधिक गुण उत्पन्न होत आहेत, पण तुला स्वतःला लाभ म्हटला म्हणजे तोंडात राख जात आहे येवढाच काय तो ! "

---

कोणी कवि लक्ष्मीस म्हणतोः—

**ई ! पद्प्रणयभाजि मुहूर्तमात्रम्**
**प्राणप्रियेऽपि कुरु मानिनि मा प्रसादम् ॥**
**जानातु मत्प्रभुरसौ पद्योर्नतानाम्-**
**अस्मादृशामिव मनोरथभंगदुःखम् ॥ ५५६ ॥**

" प्रभूने तुझ्या पायावर मस्तक ठेवले असतां घटकाभर मन घट्ट करून तू तसाच कोप धारण कर; असे केले असता माझ्यासारख्या भक्तजनाचा मनोरथभंग केला असता कसे दुःख होते हें तरी अंमळ राजश्रीस कळूं दे ! "

---

**गुणिनि गुणज्ञो रमते नागुणशीलस्य गुणिनि परितोषः ॥**
**अलिरेति वनात्कमलं न दर्दुरस्त्वेकवासोऽपि ॥ ५५७ ॥**

" जो गुणज्ञ असतो त्यास गुणिजनाच्या सहवासापासून आनंद होतो, व ज्याला गुणाची परीक्षा नाहीं त्याला त्याची पर्वाही नसते. कसें ? तर भ्रमर हा वनातून कमलाकडे झेंप घेत आदरून येतो, आणि नित्य ज्याचा त्याशीं सहवास असा जो मंडूक त्याच्या कधीं ध्यानींमनींही ती गोष्ट येत नाहीं ! "

---

**सरसो विपरीतश्चेत्सरसत्वं न मुंचति ।।**
**साक्षरा विपरीताश्चेद्राक्षसा एव केवलम् ॥ ५५८ ॥**

" जो सरस ( रसिक ) आहे तो विपरीत झाला तरी त्याचे सरसत्व जात नाहीं; पण जे नुसते साक्षर ( ' ज्ञानलवदुर्विदग्ध ' ) आहेत ते विपरीत झाले असतां केवळ राक्षस बनतात ! " पक्षीं ' सरस ' या अक्षरस-

याचा विपर्यय ' सरस '—हाच होय; व ' साक्षराः' याचा विपर्यय 'राक्षसाः' असा होतो. ''

---

उत्कृष्टमध्यमनिकृष्टजनेषु मैत्री
यद्वच्छिलासु सिकतासु जलेषु रेखा ॥
वैरं क्रमादधममध्यमसज्जनानाम्
यद्वच्छिलासु सिकतासु जलेषु रेखा ॥ ५५९ ॥

" उत्तम, मध्यम आणि निकृष्ट लोकाशीं सख्य हे शिलेवर, वाळूवर आणि पाण्यावर काढलेल्या रेषेप्रमाणे आहे. आणि त्यांशीं वैर हें वरच्याच्या विपरीत क्रमाप्रमाणे दृष्टीस पडते ! ''

---

यन्मनीषिपदांभोजरज कणपवित्रितम् ॥
तदेव भवनं नो चेद्भकारस्तत्र लुप्यते ॥ ५६० ॥

" जें गृह विद्वज्जनान्च्या चरणरजानीं पावित्रित झालेलें तेंच भवन; नाहीं तर ' भवन ' शब्दातला भकार काढून टाकावा ! ''

---

क्व सरसि वनखडं पंकजानां क्व सूर्यः
क्व च कुमुदवनाली कौमुदीबंधुरिंदु ॥
चिरपरिचयबंधाः प्रायशः सज्जनानाम्
नहि विचलति मैत्री दूरतोऽपि स्थितानाम् ॥ ५६१ ॥

" सरोवरात असणारा कमलांचा समुदाय कोठें आणि सूर्य कोठें ! कुमुदाचें वन कोणीकडे आणि चद्र कोणीकडे ! तेव्हां चिरपरिचयाच्या योगेंकरून दृढ झालेली जी सज्जनाची मैत्री ती दूर असल्यानेंही विकार पावत नाहीं ! ''

---

अपराधादधिकं मां व्यथयति तव कपटरचनेयम् ॥
शस्त्राघातो न तथा सूचीक्षतवेदना यादृक् ॥ ५६२ ॥

" तू माझा अपराध केलास याबद्दल मला इतकें वाईट वाटत नाहीं, पण तुझ्या कपटप्रयोगाच्या फार सताप येतो; शस्त्राचा घाव तितकी वेदना देत नाहीं, कीं जितकी वेदना सुईच्या बोचण्यानें होते ! '

पश्यात्र नलिनीपत्रे बलाका परिदृश्यते ।।
हरिन्मणिमय पात्र शुक्तिकेव प्रतिष्ठिता ।। ५६३ ॥

" कमलपत्रामध्यें ही बगळी पहा कशी शोभते आहे, कीं, जशी पाचे-च्या भाड्यावर शिंप ठेवावी तशी ! "

---

किटिस्तु धरणीधर कति न सति भूगरका
गिरिस्तु कनकाचलः कति न संति भूभारकाः ।।
मरुत्तु मलयानिलः कति न सति झंझानिलाः
प्रभुस्तु विबुधाश्रय कति न संति कुक्षिंभराः ॥ ५६४ ॥

" आदिवराह हाच एक धरणीधर होय, नाहीं तर भूमीस विदारणारे डुकर काय थोडे आहेत ? पर्वतात पर्वत मेरु हाच होय, नाहीं तर भूभार-भूत असे पुष्कळ आहेत ! मलयानिल हाच वायु होय, नाहींतर झंझावात काय थोडे आहेत ? तसेच, जो पडितास आश्रय देतो तोच प्रभु म्हणावा; नाहीं तर उदरभरि राजे पुष्कळ आहेत ! "

---

रवेरस्तं तेज. समुदयति खद्योतपटली
मरालाली मूका कलकलमुलूका विदधते ॥
इद कष्ट द्रष्टु शुचिरसहमानांऽबुजवती
मिलद्भृंगव्याजात्कवलयति हालाहलमहो ।। ५६५ ॥

" सूर्याचे तेज अस्तगत झाले आणि काजव्याची मडळी चमकू लागली, हंसांचें कूजित बद झाले आणि दिवाभीत शब्द करायाला लागले, ही परम शोचनीय स्थिति न साहून शुद्ध जी कमलिनी ती भ्रमराच्या मिषानें जणों काय विष प्राशनच करीत आहेसी भासते ! "

गतः स कालो यत्रासन्देवाः सेवानुवर्तिनः ॥
दशानन दशां पश्य तरंति दृषदोऽभसि ॥ ५६६ ॥

" हे रावणा ! ज्या काळीं प्रत्यक्ष देव हे तुझे सेवक झाले होते तो काळ गेला; आताच्या काळाचा महिमा पहा. कीं पाण्यावर दगड तरू लागले आहेत ! "

**काकैः सह विरुद्धस्य कोकिलस्य कलागिरः ॥**
**खलसंगेऽपि नैष्ठुर्यं कल्याणप्रकृतेः कुतः ॥ ५६७ ॥**

" कावळ्यांचा आणि कोकिळांचा जरी विरोध आहे तरी कोकिलानें मधुर-वाणी टाकली आहे कीं काय ? नाहीं. खलांचा संसर्ग पडला असतांही सुस्वभाव मनुष्य निष्ठुरत्व धारण करीत नाहीं ! "

---

**सखे साहजिकं प्रेम दूरादपि विजायते ॥**
**चकोरीनयनद्वंद्वमानंदयति चंद्रमाः ॥ ५६८ ॥**

" हे मित्रा ! साहजिक जं प्रेम तें दूर अंतरावरूनही जडते; पहा, चकोरीच्या नेत्रयुग्मास आकाशस्थ चंद्र आल्हाद देतो ! "

---

**किं तया सुमहत्याऽपि श्रिया देशांतरस्थया ॥**
**रिपवो यां न पश्यंति सुहृद्भिर्या न भुज्यते ॥ ५६९ ॥**

" दूरच्या देशांत असलेल्या संपत्तीचा काय उपयोग ? कीं जी पाहून शत्रु झुरत नाहींत आणि मित्र जिचा उपभोग घेत नाहींत ! "

---

**सौहार्दस्वर्णरेखाणामुच्चावचभिदाजुषाम् ॥**
**परोक्षमिति कोप्यास्ति परीक्षानिकषोपलः ॥ ५७० ॥**

" मैत्रीरूप भिन्न भिन्न सुवर्णरेखांची परीक्षा करण्याचा एक मोठा उत्कृष्ट निकष आहे; तो कोणता ? तर परोक्ष ! " म्हणजे कोणाचें आपणावर किती प्रेम आहे हे परोक्ष भाषणावरून तेव्हांच कळते !

---

**द्यूतेः पणः प्रणयकेलिषु कंठपाशः**
**क्रीडापरिश्रमहरं व्यजनं रतांते ॥**
**शय्या निशीथसमये जनकात्मजाया**
**प्राप्तं मया विधिवशादिदमुत्तरीयम् ॥ ५७१ ॥**

" जे सीतेचें उत्तरीय ( शेला ) द्यूताचे वेळेस पण लावावयास उप-योगीं पडत असे, प्रणयक्रीडेच्या वेळीं जे कंठपाश होत होतें, सुरतानंतर जें श्रमपरिहार करणारें व्यजन होत होतें आणि मध्यरात्रीं प्रसंगवशात् शय्याही होत असे, तें आज मला सुदैवेंकरून प्राप्त झालें ! "

**दातुरापत्तिसंप्राप्तौ याचके समुपस्थिते ॥**
**नास्तीति वाग्जीवितयोर्बहिर्निःसरणं रणः ॥ ५७२ ॥**

" याचक याचना करायाला आला आणि दात्याला तर आपत्ति प्राप्त झालेली. तेव्हा ' नाहीं ' म्हणताना दात्याच्या जीविताचा आणि वाणीचा झगडा होतो; म्हणजे वरील शब्द उच्चारणें त्यास मरणप्राय होऊन जातें ! "

---

**मौखर्यं लाघवकरं मौनमुन्नतिकारकम् ॥**
**मुखरं नुपूरं पादे कंठे हारो विराजते ॥ ५७३ ॥**

" वाचाळपणा हा लघुत्व आणणारा आहे आणि मौन हें उन्नति देणारें आहे; पहा कीं, निरंतर शब्द करणारीं जीं नूपुरें त्याचें अधिष्ठान पायांवर आणि मुका जो मौक्तिकहार तो कंठाचे ठायीं धारण केला जातो ! "

---

**त्वयि वर्षति पर्जन्ये सर्वे पल्लविता द्रुमा ॥**
**अस्माकमर्कवृक्षाणां जीर्णे पत्रेऽपि संशयः ॥५७४॥**

" हे पर्जन्या ! तू वृष्टि केली असता सारे वृक्ष पल्लवीत झाले; पण आम्ही जे अर्कवृक्ष ( रुई ) त्या आम्हास जीर्णपत्राविषयीं सुद्धा वानवा !"

---

**जिह्वे प्रमाणं जानीहि भोजने भाषणेऽपि च ॥**
**अतिभुक्तिरतीवोक्ति सद्य प्राणापहारिणी ॥ ५७५ ॥**

" हे जिव्हे ! भोजन व भाषण या दोहोंतही परिमित असत जा; का का, अतिभोजन व अतिभाषण हीं दोन्हीं तात्काळ प्राणहरण करणारीं होत ? " म्हणजे मर्यादा सोडून दोन्हीही केलीं असतां घात होतो !

---

कोणी विनोदी कवि तुपाच्या धारेचें वर्णन करतोः--

**संचारिणी कांचनवल्लरीव विद्युल्लता वा पतिता नभस्तः ॥**
**घृतस्य धारा पतिता न जाने दिवं गता वाऽथ भुवं गता वा ॥५७६॥**

" ही धार इतकी चचल आहे कीं, जणों काय हलणारी सुवर्णवल्लीच, किंवा आकाशांतून पडलेली विद्युल्लताच; शिवाय तिचें रूप इतकें सूक्ष्म

आहे कीं, ती पडली केव्हां तीही समजली नाहीं, मला तर असाही भ्रम झाला कीं, ती आकाशांत गुप्त झाली किंवा भूमींत गडप झाली, कोण जाणे ? '

---

नेपथ्यादपि राजते हि नितरां व्यालुप्तभूषाननम्
संभोगश्रममीलितं विजयते चक्षुः कटाक्षादपि ॥
गाढालिंगनकौतुकादपि नवं दोर्वल्लिविस्रंसनम्
प्रत्यालापरसादपि प्रियतरं मौनं कुरंगीदृशः ॥ ५७७ ॥

" रतिप्रसंगेकरून ज्यावरची पत्रादिरचना विलुप्त झालेली आहे असें मुख पाहिल्यापरीस अधिक खुलतें, संभोगश्रमास्तव निमीलित झालेलीं नेत्रें कटाक्षाहून अधिक शोभा देतात, गाढालिंगनाच्या सुखापेक्षा बाहुद्वयाचें शिथिलत्व हें विशेष रमणीय वाटतें आणि प्रत्युत्तरापेक्षाही श्रांतताजन्य जें मौन तें प्रियकर होतें ! '

---

सरसिरुहोदरसुरभावधरितबिंबाधरे मृगाक्षि तव ॥
वद वदने मणिरदने तांबूलं केन लक्षयाम वयम् ॥ ५७८ ॥

" हे मृगनयने ! कमलाच्या गाभ्याप्रमाणें सुवासिक आणि तोंडल्याचा गर्व हरण करणारा ज्याचा अधरोष्ठ आहे, तसेच ज्यातील दंतपंक्ति रत्नांप्रमाणें झळकते, अशा तुझ्या मुखाचे ठायीं तांबूल आहे कीं नाहीं हें आम्हीं कशावरून ओळखावें ? " म्हणजे तांबूलाच्या योगानें प्राप्त होणारे जे धर्म—सुवास, अधररक्तिमा, आणि दंतशुभ्रता,—ते तुझ्याठायीं स्वभावसिद्धच आहेत, तेव्हां अर्थातच तांबूलचर्वण हें पुनरुक्त होय !

---

गुरुषु मिलितेषु शिरसा प्रणमसि लघुषून्नता समेषु समा ॥
उचितज्ञाऽसि तुले किं तुलयसि गुंजाफलैः कनकम् ॥ ५७९ ॥

" हे तुले ! गुरूंशीं तू नम्रभाव प्रगट करतेस, लघूंशीं उन्नतीनें वागतेस आणि सामान्यांशीं बरोबरीनें राहतेस, ही तुझी उचितज्ञता प्रशंसा करण्यासारखी आहे खरी; पण गुंजेची आणि सोन्याची तुलना करतेस हें किती असमंजस आहे ! "

ग्रंथिलतया किमिक्षोः किमपभ्रंशेन भवति गीतस्य ॥
किमनार्जवेन शशिनः किं दारिद्र्येण दयितस्य ॥ ५८० ॥

" ऊंस गाठ्याळ असला म्हणून काय झाले ? गाण्यात वर्णापभ्रंश झाला म्हणून माधुर्याची काय हानि आहे ? चंद्राची कोर वाकडी असली म्हणून काय बिघडले ? वल्लभाच्या दारिद्र्यास्तव अनुरक्त स्त्रीचा प्रेमा उडेल काय ? "

---

अप्युत्तमात्प्रलपतो बलाच्च परिजल्पत ॥
सर्वतः सारमादद्यादश्मभ्य इव कांचनम् ॥ ५८१ ॥

" उत्तम भाषण करणारापासून किंवा मोठ्या कष्टाने जो बोलतो त्यापासून सार काढून घेत असावे, कसे तर दगडातून सोने काढतात त्याप्रमाणें ! "

---

किं पुष्पं किं फलं चास्य करीरस्य महात्मन ॥
येन वृद्धिं समासाद्य न कृत पत्रसंग्रहः ५८२ ॥

" या महात्म्या करीराची काय थोरवी सांगावी ? कीं ज्यानें वृद्धिसमयीं नुसता पत्राचाही संग्रह केला नाहीं, मग पुष्पाची किंवा फलाची गोष्ट तर दूरच ! "

---

पुराणांते श्मशानांते मैथुनांते च या मतिः ॥
सा मतिः सर्वदा चेत्स्यात्को न मुच्येत बंधनात् ॥ ५८३ ॥

" पुराणश्रवणानंतर, स्मशानयानाच्या नंतर आणि मैथुनावसानीं जी मनाची स्थिति होते ती जर सदोदित राहील, तर संसारबंधनापासून कोण मुक्त होणार नाहीं ? "

---

दूरस्थाः पर्वता रम्या वेश्या च मुखमंडने ॥
युद्धस्य वार्ता रम्या च त्रीणि रम्याणि दूरत ॥ ५८४ ॥

" डोंगर दुरून साजरे, वेश्येचें रमणीयत्व तेवढे चेहरेपट्टीवर पाहून घ्यावें, आणि युद्धाची वार्ता मात्र रम्य; या तिहींचा साक्षात प्रसंग करण्याच्या भरीस कोणीं पडू नये ! "

न स्वल्पमप्यव्यवसायभीरोः करोति विज्ञाननिधिर्गुणं हि ॥
अंधस्य किं हस्ततलस्थितोऽपि प्रकाशयत्यर्थमिह प्रदीपः ॥ ५८५॥

" ज्याला कृति करून दाखविण्याचा दम नाहीं त्याच्यापाशीं केवळ ज्ञानाचें मोठें कोठारही जरी असलें तरी त्यापासून कांहीं निष्पन्न होणार नाहीं. पहा कीं, अधळयाने आपल्या हातावर जरी दिवा घेतला असला तरी त्यापासून त्यास पदार्थदर्शन होणार आहे काय ? "

---

व्यजनमरुत श्वासश्रेणीमिमामुपचिन्वते
मलयजरसो धाराबाष्पं प्रपंचयितुं प्रभुः ॥
कुसुमशयनं कामास्त्राणां करोति सहायताम्
द्विगुणगरिमा कामोन्माथः कथं नु विरंस्यति ॥ ५८६ ॥

" विझण्याचा वारा हा निश्वासवातास वाढवितो, चंदनाचा रस हा अश्रुधाराची वृद्धि करतो आणि पुष्पशय्या ही कामायुधास साह्य मात्र होते, मग अशा योगाने कामाची बाधा ही दुणावली असता ती दूर कशी व्हावी ! "

---

आदाय वारि परितः सरितां मुखेभ्य
किं तावदर्जितमनन दुरर्णवेन ॥
क्षारीकृतं च वडवादहने हुतं च
पातालकुक्षिकुहरे विनिवेशितं च ॥ ५८७ ॥

" चोहोंकडून नद्यांच्या मुखापासून जलौघ घेऊन दुष्ट समुद्राने काय मिळाविलें बरें ? येवढे मात्र कले कीं, मूळचे गोडें पाणी होतें तें खारट करून टाकलें, कांहीं वडवाग्नीच्या मुखीं घातले आणि कांहीं पाताळाच्या खबदाडींत ठेवून दिले !"

---

शक्रादरक्षि यदि पक्षयुगं तथाऽपि
मैनाक संति तव नेह गतागतानि ॥
निःसत्वता च निरपत्रपता च किंतु
पाथोनिधौ निवसता भवताऽर्जिताऽत्र ॥ ५८८ ॥

" हे मैनाका ! तुला समुद्रानें आपल्या पोटांत घेतल्यामुळें तुझ्या पंखाचा बचाव झाला हें खरें; पण पूर्वीप्रमाणें आता तुला आकाशात संचार कोठें करता येतो आहे ? त्याप्रमाणेच सागराश्रय केल्याने तुझें दुर्बलत्व व निर्लज्जत्व जगप्रसिद्ध झालें हे तू कसे जाणत नाहींस ? "

---

**तृषां धरायाः शमयत्यशेषां यः सोऽबुदो गर्जति गर्जतूच्चैः ॥**
**यस्त्वेष कस्यापि न हरति तृष्णां स किं वृथा गर्जति निस्त्रपोऽब्धि ॥**

" जो मेघ पृथ्वीची सारी तृषा शमवितो तो गर्जतो हे ठीकच आहे, तो खुशाल मोठ्याने गर्जना करो; पण जो अदत्त कोणाचीही ताहान भागवीत नाहीं तो समुद्र निर्लज्जाप्रमाणे व्यर्थ गर्जना करतो हे काय ?"

---

**क्रौंचः क्रीडतु कुर्दतां च कुररः कंकः परिष्वज्यताम्**
**मद्गुर्माद्यतु सारसश्च रसतु प्रोड्डियतां टिट्टिभः ॥**
**भेकाः संतुः बका वसंतु चरतु स्वच्छंदमाटिस्तटे**
**हंहो पद्मसरः कुतः कतिपयैर्हंसैर्विना श्रीस्तव ॥ ५९० ॥**

" हे पद्मसरोवरा ! तुझ ठायीं क्रौंच हा क्रीडा करो, कुरर खिदळो, कंक तुला आलिंगन देवो, मद्गु तुझ्या उदकाचे सेवन करून मत्त होवो, सारस शब्द करो, टिट्टिभ उडो, बेडूक व बगळे हे तुझ्या आश्रयाने असोत व आटि हा तुझ्या तीरीं स्वच्छंदेकरून विहार करो; पण हे सर्व असूनही कांहीं हंस जर तुझ्याजवळ नाहींत तर तुला कोठली शोभा ? "

---

**यावद्यावद्भवति कलया पूर्णकामः शशांक-**
**स्तावत्तावद्द्युतिमयवपुः क्षीयते सा मृगाक्षी ॥**
**मन्ये धाता घटयति विधुं सारमादाय तस्या-**
**स्तस्माद्यावन्न भवति सखे पूर्णिमा तावदेहि ॥ ५९१ ॥**

" चंद्राची एकक कळा जों जो वाढत जाते तों तों मृगनयनेच्या कांतिमय शरीराचा ऱ्हास होताना दृष्टीस पडतो, यावरून असें वाटतें कीं ब्रह्मदेव हा तिच्या शरीरलावण्यापासून चंद्रास निर्माण करतो; तर हे मित्रा जोंवर पूर्णिमा दूर आहे तोंवर तू तिला जाऊन भेट ! "

**सञ्चारो रतिमंदिरावधि सखीकर्णावधि व्याहृतम्**
**चेतः कांतसमीहितावधि महामानोऽपि मौनावधि ॥**
**हास्यं चाधरपल्लवावधि पदन्यासावधि प्रेक्षितम्**
**सर्वं सावधिः नावधिः कुलभुवां प्रेम्णः परं केवलम् ॥ ५९२ ॥**

" कुलस्त्रियाचा सञ्चार म्हटला म्हणजे रतिमंदिरापर्यंत, भाषण सखीच्या कानीं पडेतोपर्यंत, मनाचा व्यापार पतिवांछित जाणण्यापर्यंत, अतिशयित मान म्हटला म्हणजे मौनधारण, हसणें अधरपल्लवावेरी आणि पाहणें पाऊल टाकण्यापर्यंत, एका गोष्टीस मात्र त्याच्या ठायीं मर्यादा नाहीं, ती गोष्ट कोणती ? तर पतिविषयक प्रेम ! "

---

**सत्यमेव गदितं त्वया विभो जीव एक इति यत्पुराऽवयोः ॥**
**अन्यदारनिहता नखव्रणास्तावके वपुषि पीडयंति माम् ॥ ५९३ ॥**

" हे प्राणनाथा ! आपण जें मला सांगितलें, कीं तुझा व माझा देह हे एकच आहेत हे सर्वथा खरें आहे. यास प्रत्यंतर पहा कीं अन्य स्त्रीनें आपल्या शरीरास केलेलीं नखक्षतें तिसऱ्या ठिकाणीं मला येऊन टोंचलीं !"

---

**विप्रियमप्याकर्ण्य ब्रूते प्रियमेव सर्वदा सुजनः ॥**
**क्षारं पिबति पयोधेर्वर्षत्यंभोधरो मधुरमंभः ॥ ५९४ ॥**

" सज्जन पुरुष अप्रिय भाषण श्रवण करूनही नेहेमीं प्रियच बोलत असतात, ज्याप्रमाणें मेघ हा समुद्राचें क्षारोदक पिऊन मधुरजलाचाच वर्षाव करतो ! "

---

**मेरुर्दूरगतो महान्हिमगिरिः प्रालेयमात्रोऽभवच्चंद्र**
**श्रीसहितोऽपि याचकभयात्क्षीणत्वमालंभत ॥**
**कौपीनं धृतवान्हरोऽपि सहसा विष्णुर्जले संस्थितो**
**वारां राशिरपेयतामुपगतः को नाम दातुं क्षमः ॥ ५९५ ॥**

" मेरु याचकास भिऊन दूर सरला, हिमालय हिमाच्छादित होऊन बसला, चंद्र हा लक्ष्मीयुक्त खरा, पण तोही वरील भयानें क्षीण झाला, शिवानें कौपीन धारण केलें. विष्णु पाण्यांत जाऊन दडला आणि समुद्र हा अपेय झाला, तेव्हां आतां दाता उरला तरी कोण ? "

कृष्णा ते कचसंहतिरंबुजनयने तवाधर शोण ॥
त्वं सुरतरंगिणी कथमभितस्तापी न ते वियोग स्यात् ॥ ५९६ ॥

" हे कमलनयने ! तुझी वेणी ही कृष्णा ( नदीविशेष, पक्षीं, काळी ) आहे तुझा अधरोष्ठ हा शोण ( नदीविशेष, पक्षीं, आरक्त ) आहे आणि तू स्वतः सुरतरंगिणी ( देवनदी, पक्षीं, कामिनी ) आहेस, मग तुझा वियोग हा तापी ( नदीविशेष, पक्षीं, ताप देणारा ) कसा नसेल? "

---

स्निग्धमालप सुरूक्षमेव वा त्वत्कथैव सखि मे रसायनम् ॥
शीतलं सलिलमुष्णमेव वा पावकं हि शमयेदसंशयम् ॥ ५९७ ॥

" हे सखि ! तू गोड बोल किंवा कठोर भाषण कर, तुझें भाषण हेंच मला आल्हाद देते. पहा कीं, उदक हे थंड असो अगर ऊन असो अग्नीचा उपशम करणारच ! "

---

सुमध्ये वाग्भंगैर्वचनविधिमंगीकुरु न वा
स्मितज्योत्स्नाकांतं कुरु वदनमेतन्मयि न वा ॥
त्रिलोकीमूर्धन्या यदि विविधपुण्याधिकतया
मया दृष्टाऽसि त्वं तदिह सफलं मेऽजनि जनु ॥५९८॥

" हे सिंहमध्यें ! तू कुटिलोक्तीचें भाषण कर अथवा न कर, किंवा मजकडे पाहून स्मितचंद्रिकेने विराजमान असे मुख कर किंवा करू नको; माझें जन्म येवढ्यानेच सफल झाले, कीं त्रैलोक्यात सौंदर्याने श्रेष्ठ अशी जी तू ती माझ्या विविध पुण्याच्या कमाईने आज माझ्या दृष्टीस पडलीस ! "

---

भानुबिंबमिदमस्तगामि च प्रोद्यनं कुमुदबंधुमंडलम् ॥
दृश्यते रतिपते प्रवासिनां क्रोधरक्तमिव लोचनद्वयम् ॥५९९॥

"एकीकडे अस्तास जाणाऱ्या सूर्याचें बिंब व दुसरीकडे उदय पावणारें चंद्रबिंब दिसत आहे, हीं प्रवासिजनाम रतिपतीचीं दोन आरक्त झालेलीं नयनेंच काय अशीं भासतात ! "

---

सहते शरशतघातानाजानेय कशां नैव ॥
सहते विपत्सहस्रं मानी नैवापमानलेशमपि ॥ ६०० ॥

" जातिवंत घोडा हा रणांगणावर शेंकडो बाणाचे घाव सहज करतो, पण चाबकाचा फटकारा त्यास बिलकुल सहन होत नसतो; तसेंच जो मानी आहे तो हजारों विपत्तींस दाद देत नाहीं, पण कोणाचें फट म्हटलेलें त्यास खपत नाहीं ! "

---

दृढतरगलबन्धनिबंधः कूपनिपातोऽपि कलश ते धन्यः ॥
यज्जीवनदानैस्त्वं तर्षामर्षं नृणां हरसि ॥ ६०१ ॥

" हे कलशा ! तुझ्या मानेला फास लावून लोक तुला विहिरींत ढकलून देतात असें जरी आहे तरी तू धन्य आहेस; का कीं तृषेने पीडलेल्यास तूं जीवनाचे दान करतोस ! "

---

प्राप्य प्रमाणपदवीं को नामाऽऽस्ते तुलेऽवलेपस्ते ॥
नयसि गरिष्ठमधस्तात्तदितरमुच्चैस्तरां कुरुषे ॥ ६०२ ॥

" हे तुले ! तुला सर्व लोक प्रमाण समजू लागले येवढ्यानें तुझ्या अंगीं हा केवढा ताठा आला पहा ! कीं वजनदाराचें पारडें खालीं बसवून हलक्यास तू उच्च पदवीला पोंचावितेस ! "

---

को हि तुलामधिरोहति शुचिना दुग्धेन सहजमधुरेण ॥
तप्तं विकृतं मथितं तथाऽपि यत्स्नेहमुद्गिरति ॥ ६०३ ॥

" स्वभावेंकरून मधुर जे दुग्ध त्याची सर कोणास येणार आहे ? पहा कीं, त्यास तापविलें, त्यात विरजण घातलें, त्याचें मथन केलें, तरी शेवटीं काय ? स्नेहाचा ( लोण्याचा ) च आविर्भाव करते ! "

---

जगति विदितमेतत्काष्ठमेवासि नूनम्
तदपि च किल सत्यं कानने वर्धिताऽसि ॥
नवकुवलयनेत्रीपाणिसंगोत्सवेऽस्मिन्मुसल
किसलयं ते तत्क्षणाद्यन्न जातम् ॥ ६०४ ॥

" हे मुसळा ! साऱ्या जगास माहितच आहे कीं तूं काष्ठ आहेस, शिवाय तूं मुळींच अरण्यांत वाढलेले आहेस; तेव्हा या नवकुवलयनेत्रीच्या

करस्पर्शाचा महालाभ तुला झाला असता जे तत्क्षणीं अकुर फुटले नाहींत तें ठीकच आहे ! ''

---

भेकेन क्वणता सरोषपरुषं यत्कृष्णसर्पानने
दातुं कर्णचपेटमुज्झितभिया हस्तः समुल्लासितः ॥
यच्चाधोमुखमक्षिणी विदधता नागेन तूष्णीं स्थितम्
तत्सर्वं विषमंत्रिणो भगवतः कस्यापि लीलायितम् ॥ ६०५ ॥

'' कृष्णसर्पावर रागानें जळफळून व त्यास टाकून बोलून त्याच्या मुसकाडींत देण्याकरिता बेडकानें जो बेलाशक आपला पजा वर उचलला आणि अशा समयीं नागाने खालीं मान घालून डोळे मिटून वरील प्रकार जो सहन केला,--हें सर्व हे महामांत्रिका ! तुझ्या अद्भुत सामर्थ्याचें फल होय ! ''

---

तृषार्तैः सारंगै प्रति जलधरं भूरि विरुतम्
घनैर्मुक्ता धारा सपदि पयसस्तान्प्रति मुहुः ॥
खगानां के मेघा क इह विहगा वा जलमुचा-
मयाच्यो नाऽऽर्तानामनुपकरणीयो न महताम् ॥ ६०६ ॥

'' तृषार्त झालेल्या पक्ष्यांनीं मेघाकडे पाहून फार आक्रोश केला आणि मेघानींही त्यांजवर दया करून जलधारांनीं त्याचा संताप शमविला; आता वस्तुतः पाहता मेघ हे पक्ष्याचे कोण व मेघाचे पक्षी हे कोण ? पण जे दुःखित होतात त्यास सर्वांपाशीं याचना करणें आहे व थोर आहेत त्यांस उपकार करताना आप्त किंवा अनाप्त हा काहीं एक विचार नसतो ! ''

---

शिला बाला जाता चरणरजसा यत्कुलशिशोः
स एवायं सूर्यः सपदि निजपादैर्गिरिशिलाम् ॥
स्पृशन्भूयो भूयो न खलु कुरुते कामपि वधूम्
कुले कश्चिद्धन्यः प्रभवति नरः श्लाघ्यमहिमा ॥ ६०७ ॥

'' ज्या सूर्याच्या कुलांत उत्पन्न झालेल्या एका कुमारानें आपल्या पादस्पर्शेकरून शिलेची स्त्री केली, तो नित्य प्रतिपर्वतावर पादन्यास करून

भ्रमण करीत असतो, पण अद्याप त्याच्या प्रभावानें एकही स्त्री बनली नाहीं;—तेव्हां हेंच खरें कीं, एकाची सर दुसऱ्याला येत नाहीं; नाव करून जाणारा असा पुरुष एकेक कुलात एकेकदाच होऊन जातो !"

---

दीप्यंतां ये दीपवे घटिता मणयश्च वीरपुरुषाश्च ॥
तेजः स्वविनाशाय तु भवति तृणानामिव लघूनाम् ॥ ६०८ ॥

" जसे रत्नदीप प्रकाशार्थ निर्माण केलेले असतात त्याप्रमाणें जे वीर्य-संपन्न पुरुष आत्मप्रभाव गाजवण्याकरता या भूलोकावर सृष्टिकर्त्यानें पाठविलेले असतात ते आपले शौर्य प्रगट करीत, पण त्याचे पाहून हलक्यानें आपली मर्दुमकी दाखवू पाहणे हें पेटलेल्या गवताप्रमाणें आहे,—केवळ आत्मविनाश हेंच त्याचें फळ !"

---

शमयति गजानन्यान्गंधद्विप कलभोऽपि स-
न्भवति सुतरां वेगोदग्रं भुजंगशिशोर्विषम् ॥
भुवमधिपतिर्बालावस्थोऽप्यलं परिरक्षितुम्
न खलु वयसा जात्येवायं स्वकार्यसहो भरः ॥ ६०९ ॥

" गधगज हा तरुण असताही इतर हत्तींचा पराभव करतो, त्याप्रमाणेंच नागाच्या पोराचे विष वेगेंकरून तीव्रतर असतें; तेव्हां यावरून स्पष्ट आहे कीं, राजा हा बाल्यावस्थेत असला तरी त्याच्या अंगीं पृथ्वीला आळा घालण्याचे सामर्थ्य अ तें, ते वयेंकरून प्राप्त होत नसते, तर हा जातिगुणच समजायाचा !"

---

जिह्वैकैव सतामुभे फणवतां स्रष्टुश्चतस्रश्च ता
स्ताःसप्तैव विभावसोर्नियमिताः षट् कार्तिकेयस्य च ॥
पौलस्त्यस्य दशाभवन्फणिपतेर्जिह्वासहस्रद्वयम्
जिह्वालक्षशतैककोटिनियमो नो दुर्जनानां मुखे ॥ ६१० ॥

" सज्जनास जिव्हा एकच असते, सर्पास दोन असतात, ब्रह्मदेवास चार आहेत, अग्नीस सात कार्तिकस्वामीस सहा आहेत,रावणास दहा होत्या आणि शेषास दोन हजार आहेत; पण दुर्जनांच्या तोंडात किती लक्ष किंवा कोटी आहेत याचा कांहींच नेम सांगवत नाहीं !"

यः पृष्ठं युधि दर्शयत्यरिभटश्रेणीषु या वक्रता-
मस्मिन्नेव बिभर्ति यश्च किरति क्रूरध्वनिं निष्ठुरः ॥
दोषं तस्य तथाविधस्य भजतश्चापस्य गृह्णन्गुणम्
विख्यातः परमेष एव नृपतिः सीमा गुणग्राहिणाम् ॥६११॥

" हे राजा ! तुझ्या गुणग्राहकत्वाचे काय वर्णन करावे ? पहा, हें तुझें धनुष्य युद्धाचे ठायीं शत्रूवीरसमुदायास आपली पाठ दाखवितें, तुझेंच ठायीं आपलें वक्रत्व प्रगट करतें आणि निष्ठुर होऊन क्रूरध्वनि करतें; पण तें असें दोषयुक्त ( पक्षीं, भुजाचा आश्रय करणारें ) असताही त्याचा तूं गुण ( पक्षीं, दोरी ) ग्रहण करतोस ! "

---

नाऽऽलिंगंति कुचद्वयं भवदिभप्रोत्तुंगकुंभद्वय-
त्रासाद्वेणिलतासु नैव दधति प्रीतिं तवासिभ्रमात् ॥
भ्रूभंगान्भवदीयदुर्धरधनुर्भीत्या भजंते न ते
वैरिक्षोणिभुजो निजांबुजदृशां भूमंडलाखंडल ॥ ६१२ ॥

" हे पृथ्वींद्रा ! तुझे शत्रू तुझ्या हत्तींच्या उच्च गंडस्थळाच्या भ्रमानें आपल्या स्त्रियास आलिंगन करीतनासे झाले, तुझ्या खड्गाच्या भ्रमानें त्यास स्त्रियाच्या कबरीभाराकडे पाहण्याची भीति वाटू लागली आणि तुझ्या भयंकर धनुष्याच्या भ्रातीनें त्यास स्त्रियाच्या भ्रुकुटि भयप्रद होऊं लागल्या आहेत ! "

---

मधुरमिव वदंति स्वागतं भृंगनादै-
र्नतिमिव फलनम्रैः कुर्वतोऽमी शिरोभिः ॥
ननु ददत इवार्घ्यं पुष्पवृष्टिं किरंतः
कथमतिथिसपर्यां शिक्षिताः शाखिनोऽपि ॥ ६१३ ॥

" हे आश्रमवृक्षही अतिथींची पूजा करावयास शिकले आहेत काय ? पहा हे भृंगाच्या गुंजारवानीं जणू काय मधुर भाषणयुक्त स्वागत करतात, फलानीं नम्र झालेल्या माथ्यानीं हे जसे काय नमन करतात आणि पुष्पवृष्टी-च्या मिषानें अर्घ्यप्रदानच्च करिताहेतसे दिसतात ! "

---

मकरीविरचनभङ्ग्या राधाकुचकलशपीडनव्यसनी ॥
ऋजुमपि रेखां लुंपन्वल्लववेषो हरिर्जयति ॥ ६१४ ॥

" पत्रावलीची विरचना करण्याच्या मिषानें राधेच्या कुचपीडनाविषयीं लालस आणि सरळरेषा आली असताही ती मोडून टाकणारा, असा बल्लवरूपी हरि जय पावतो ! "

---

दंभोलिस्फूर्जदंभोधरविपुलतडिद्दंभगंभीरनादै-
रंभःसंभारसंभावनकुतुकि कुलं च.तकानामनृत्यत् ॥
ऊर्ध्वं विन्यस्त्यचंचूपुटमुपरिपरिभ्राम्यदुत्पातवातैरंभोदो-
न्मुक्तमंभःकणमपि न चिरात्प्राप्य नम्रं मिथोऽभूत ॥ ६१५ ॥

" मेघाचा गडगडाट व विजाचा चमचमाट पाहून चातकसमुदायास मोठी आशा उत्पन्न झाली की, आता जलवृष्टीची रगाडीच रगाडी होऊन जाईल; यास्तव ते उडू बागडू लागले व वर आपल्या चोंचा करून झंझावाताबरोबर मिसळून भ्रमण करू लागले, पण सरतेशेवटीं मेघापासून बिचाऱ्यास एकही जलकण न प्राप्त होऊन लज्जायमान होत्साते सर्व जागच्या जागीं चीप बसले ! "

---

पततु नभसो गच्छत्वस्तं निमज्जतु वारिधौ
व्रजतु वरुणागारद्वारं प्रभाभिरनादृतः ॥
तदपि तरणिर्दत्त्वा पादं शिरःसु महीभृताम्
दलिततिमिरव्रातः प्रातः पुन सकृदेष्यति ॥ ६१६ ॥

" सूर्य हा आकाशापासून पतन पावो, अस्ताप्रत जावो, समुद्रांत बुडो किंवा निष्प्रभ होऊन वरुणगृहाच्या द्वारीं जावो. तरी येवढें निश्चित आहे कीं, तो अंधकारसमुदायाचा नाश करून व पर्वतांच्या शिखरावर पाय ठेवून पुनः उदयास येणार ! "

---

पक्षद्वंद्वविराजितोऽहममलं मीनान्प्रसेवे सदा
पुष्टांगः स कलादिभिः परिवृतश्चंद्रः समः किं मम ॥
सर्वस्थ णुशिरोगतोऽयममलं चंद्रं बको हासते
मात्सर्येण दुरात्मकोऽपि सुजनं दृष्ट्वा सदा हासते ॥ ६१७ ॥

" मी चद्राप्रमाणें पक्षद्वयाने ( दोन्ही अर्थ उघडच आहेत ) विराजमान आहे, मी नेहेमीं मीनराशी ( मत्स्यसमूह; पक्षीं, राशींविषयीं ) भोगीत असतो, शिवाय मी पुष्टाग आहे आणि चंद्राला तर कळा लागतात (नेहमी न्यूनाधिक होत असतो ), मग चद्र माझी बरोबरी कशी पावेल ? तसेच मी सर्व स्थाणूंच्या (वृक्षांचीं खोडें, पक्षीं, शिव ) शिखरीं वास करतों;— याप्रमाणें स्वच्छ जो चंद्र त्यास बगळा हा हांसतो ! सारांश, दुर्जन हा मत्सरभावानें भलत्याशींच बरोबरी करून त्याचा उपहास करीत असतो ! '

समाप्तश्चायं सभाषांतरः सुभाषितसमुच्चयः ।

श्रीरस्तु.

